नोहर ग्रंथमाला प्रकाशन ४४ वें

# उपायन

## कथा आणि ललित निबंध

लेखक :

मनोहर महादेव केळकर

किं. २॥ रु.

शके १८६८ ] प्रथमावृत्ति [ सन १९४६

ती. सौ. आई व अप्पासाहेब
यांना हें **उपायन**
अर्पण असो.

१३।१०।४६

नाना

# अनुक्रमणिका

# प्रस्तावना

माझे स्नेही श्री. मनोहर महादेव केळकर यांचा ' उपायन ' हा कथा आणि ललित–निबंध–संग्रह वाचून माझ्या मनाला आश्चर्याचा धक्का बसला. पुस्तक संपूर्ण वाचून झाल्य नंतर आपली कांहीं चूक होते आहे का हें पहाण्याकरितां मी पुन्हा पुस्तकावर लेखकाचें नाव पाहिलें. " लेखक-मनोहर महादेव केळकर " असेंच पुस्तकावर छापलें होतें. मी पुस्तक मिटून बाजूला ठेवलें आणि माझ्या मनाला वाटलेलें आश्चर्य पचविण्याकरितां डोळे मिटून स्वस्थ पडलों.

मनानें गतकालच्या स्मृतींत प्रवेश केला आणि मनोहर केळकरांची आणि माझी पहिली ओळख कशी झाली तो प्रसंग माझ्या डोळ्यांसमोर आला. " मला प्रकाशनाच्या धंद्यात पडावयाचें आहे. मी नुकताच बी. ए. झालो आहे–तेव्हां तुमची कांहीं पुस्तकें मला विक्रीकरतां द्या " या प्रसंगानें आमची पहिली ओळख. नंतर त्यांनीं 'मनोहर ग्रंथमाला' काढली. तेव्हां 'या पुस्तकाची किंमत किती ठेवूं ? प्रती किती काढूं ? राजगुरु छापखान्यांत तेवढें माझें पुस्तक लौकर छापून द्यायला सांगा'–ही आमची ओळख दृढ होण्याचीं कारणें. नंतर त्यांनीं ' वाङ्मय–शोभा ' मासिक काढलें–तेव्हां ते मधून मधून माझ्याजवळ लेखन सहाय्य मागत–आपणही हें लिहिणार आहांत तें लिहिणार आहांत असें सांगत–आणि दोनचार वर्षांपूर्वी एकदां मनोहरपंत मला म्हणाले होते कीं, " माझें पहिलें पुस्तक निघालें तर त्याला तुम्ही प्रस्तावना लिहाल काय ? "

अर्थात् त्या वेळीं मी होय म्हटलें. पण त्या वेळीं ' उपायन ' सारख्या एका चांगल्या पुस्तकाला प्रस्तावना लिहिण्याचा प्रसंग येईल याची मला खचित कल्पना नव्हती !

याला कारण माणसाचा स्वभावदोषही असेल कदाचित्. आपण ज्यांना स्नेही किंवा मित्र म्हणतो त्यांची संपूर्ण माहिती आपणाला फार क्वचित् असते. संपूर्ण माहिती मिळविण्याची आपल्याला सवड नसते म्हणा–

आपले तिकडे दुर्लक्ष होतें म्हणा किंवा आपण घरात कौतुकाकरिता जसे ' पोपट ' पाळतो तसे आपण आपल्या कित्येक मित्रांकडे केवळ ' पोपटा ' इतक्याच भावनेनें किंवा वृत्तीनें अजाणता पहात असतो.

पोपटाच्या पिंजऱ्याशीं गेले कीं आपण हांक मारावी, त्यानें हाक द्यावी—थोडा वेळ करमणूक—कीं लागलों आपण आपल्या उद्योगाला—असें आपलें कित्येक मित्रांच्या बाबतींत होतें, हें आपण थोडा बारकाईनें विचार केला कीं आपल्याला प्राजळपणानें कबूल करावें लागेल.

मनोहरपंतांच्या बाबतींत आमचे इतर ऋणानुबंध, आम्ही एकमेकांचे नातेवाईक आहोंत असें वाटण्याइतकें जोपासले गेले असले—तरी लेखनाच्या बाबतींत आमची आतां पर्यंत 'पोपट मैत्रीच' होती, हें त्याचा ' उपायन ' हा संग्रह वाचून मला प्रांजळपणानें कबूल करणें भाग आहे.

आणि कित्येक वेळेला असेंही होतें कीं, प्रत्येक बाबतींत आपण कांहीं कांहीं नांवाना प्राधान्य देऊन ठेवलेलें असतें; कांहीं सांगोवांगीं आणि कांहीं आपण आपल्या मनानें. जसें डोंगरे बालामृत—डाल्डा—सनलाईट सोप—प्रभात चित्र—गंधर्व मंडळी—कार्लेकर सर्कस—खाडेकर—माटे—काणेकर—आणि हीं नावें एकदां मान्य केल्यानंतर आपण त्याच्या प्रगती—परागतीचा आढावा कधींच घेत नाहीं—आणि शिवाय त्यांतील नवीनाकडे आपण दुर्लक्ष करतों.

आणि अशा आपल्या मानवी ' स्वभावदोषामुळें ' क्वचित् जे चांगले अपेक्षाभंग होतात तसा 'अपेक्षाभंग' 'उपायन' हा संग्रह वाचून माझा झाला.

'उपायनमधील'—पहिलाच 'आधारवड' हा लेख वाचून कोणाही वाचकाची माझ्या म्हणण्याबद्दल खात्री पटेल. नंतर ' मुग्ध वात्सल्यावर ' नजर टाका, तिथें तुम्हांला एक चांगल्यापैकीं मानवी स्वभावदर्शन घडेल.

' मे वेस्टची पूर्वेवर संक्रांत ' वाचा. तुमच्या मनाला एक विशिष्ट जाणिवेची 'जाग' मिळेल—हें एक भाषांतर आहे आणि भाषांतराला हा लेख निवडण्यांत केवळ वाङ्मयीन नव्हे तर एक जाणिवेची दृष्टी आहे. ' गूढ—निरास ' ही सत्यकथा आहे की नाहीं मला माहीत नाहीं पण वाटतें मात्र सत्यकथा. दुःखानें पिचलेले जीव खोट्या समाधानाच्याही भावनेला किती आसवालेले असतात—

' वि. दा. सावरकर—' आणि लगेच नंतरचाच ' महात्म्यांचें भाग्य '

हे दोन लेख एक बैठकींत वाचा. म्हणजे त्यांत कोणत्याही मतांचा अभिनिवेश न दिसतां जेथें जेथें सत्य प्रचीती येईल तेथें तेथें 'कर माझे जुळती' ह्या मनोहरपंताच्या चांगल्या वृत्तीचा तुम्हांला परिचय घडेल.

'फसवणूक' आणि 'सगळ्या मिळून सर्व कांहीं' या भाषांतरित कथाही मनोरम वाटतील.

'शापित वरदान' आणि 'ही कुणाची कर्मदशा' या दोन कथांतून 'मास्तरांच्या जातीवर' प्रकाश पडलेला दिसेल.

'संस्कृति आणि बर्फ' ही गोष्टही चांगली आहे आणि 'दीपावलीची गुज-गोष्ट' 'गेलीं सहा वर्षे' 'कोजागिरीची रात्र' 'युद्धकाळांत आम्ही कसे जगलो' इत्यादि लेख वाचून मनोहरपंतांविषयीं वाचकांना विचार करावासा वाटेल इतके ते लेख चांगले आहेत.

भाषेचा साधेपणा—वृत्तीचा सरळपणा—प्रतिपादनांतील सच्चेपणा—खोट्या अभिनिवेशाचा अभाव इत्यादि किती तरी मनोरम गुणांनीं 'उपायन' हा संग्रह नटलेला आहे.

'आधारवड'पासून सुरुवात होऊन—'विस्तार वेलावर' हा संग्रह संपलेला आहे. म्हणजे मनोहरपंत केळकरांच्या जीवनाला आणि लेखनाला प्रगतीची ओढ आहे.

'उपायन' या संग्रहांत गोष्टी आहेत, निबंध आहेत, विचार आहेत. निर-निराळ्या परिपक्व फळांच्या फोडींचे ताट चाखतांना जी गोडी येते तीच 'उपायन' हा संग्रह वाचतांना मला प्रतीत झाली.

'मनोहरपंत—केळकर' या नांवाचे आतांपर्यंत माझे एक प्रकाशक स्नेही होते. आतां 'लेखक मनोहरपंत केळकर' या एका नव्या स्नेहाचा, 'उपायन' ह्या पुस्तकाच्या वाचनानें मला लाभ झाला आणि निष्काळजीपणानें आतां-पर्यंत 'मनोहरपंतांच्या' 'लेखक भूमिकेचा' माझ्याकडून जाणीवेचा आदर व्हायला पाहिजे होता तो झाला नाहीं याबद्दल दिलगिरी प्रदर्शित करून 'आज तुमच्या पुस्तकाला प्रस्तावना लिहिली उद्यां कदाचित् तुमचे पुस्तकही प्रकाशित करीन' असें आश्वासन देऊन मला दिलेल्या 'उपायनाचा' सादर स्वीकार करतो.

•

यशवंत गोपाळ जोशी

# स्वीकार

वाङ्मयशोभा मासिकाचे संपादक श्री. मनोहर महादेव केळकर यांचें हें 'उपायन' म्हणजे मराठींतील धावत्या वाङ्मयांत एक मोठी चोखट भर आहे. आधारवड, शापित वरदान, विनायकराव सावरकर, भाषाशुद्धीविषयीं कांहीं विचार ही प्रकरणं चांगलीं आहेतच पण मला या पुस्तकांतील विशेष आवडलेला भाग म्हणजे 'मनोगतं' हा होय. कुटुंबसंस्थेतील आनंदाचे निर्झर कोठून आणि कसे वहात असतात हे रा. केळकर यांनीं या 'मनोगतांत' हृदयंगम रीतीनें दाखविलें आहे. हें प्रकरण वाचतांना मनाला हुरहूर आणि सुख या दोहोंचाही लाभ एकदमच होतो. फार दूरचे जागतिक विषय आणि अगदीं जवळचे आपल्या आळींतील विषय हे दोन्ही शेजारीं शेजारीं आणून लेखनांत एक सौम्य तऱ्हेचा विनोद, केळकर यांनीं आपल्या 'मनोगतात' उत्पन्न केला आहे. प्रगट विनोदापेक्षां हा विनोद मला फारच हृद्य वाटतो. एकंदरीनें पहातां श्रीधरपंत देशपांडे म्हणणात तेंच खरें आहे कीं "केळकर कुटुंबीयांच्या बोटांतून रक्ताऐवजीं शाईच वहात असली पाहिजे."

श्रीपाद महादेव माटे

* * *

श्री. म. म. केळकर हे मनोहर ग्रंथ मालेचे प्रकाशक व 'वाङ्मयशोभा' मासिकाचे संपादक या नात्यानें मराठी वाचक वर्गाला आज सात आठ वर्षें चांगले परिचित आहेत. ते संपादकाप्रमाणें चांगले लेखकही आहेत हें वाङ्मयशोभेच्या वाचकाना सांगावयास नको. पण वाङ्मयशोभेंतील आपल्या कांहीं लेखांचे ते आज 'उपायन' नांवाच्या पुस्तकरूपानें प्रकाशन करीत असल्यानें सर्वसाधारण वाचक वर्गाच्या पुढें ते आज लेखक म्हणून येत आहेत. यांचा कोणताही लेख वाचला तरी सुंदर भाषा आणि विषयाशीं एकरूप होण्याची

त्यांची मनोवृत्ति या त्यांच्या लेखांतील दोन विशेषांचा वाचकांस अनुभव-येतो. पहिला लेख ' आधारवड ' व शेवटचा ' विस्तारवेल ' या दोन लेखांत आपल्या लहानपणचें व आपल्या मुलाच्या लहानपणचें त्यानीं जें वर्णन केलें आहे त्यांत ते विषयाशीं कसे एकरूप होतात हें उत्तमपणें लक्षांत येतें. सावरकर व गांधी या दोघांच्यावर त्यानी जे लेख लिहिले आहेत त्यात त्यांची स्वतंत्र विचारप्रवृत्ति दिसून येते. ' उपायन ' या पुस्तकामध्यें बऱ्याच गोष्टीही आहेत. त्यापैकीं ' फसवणूक ' ' उद्यांची काळजी ' वगैरे गोष्टी थोडक्यांत चटकदार वाटतात.

द. के. केळकर

* * *

' उपायन ' वाचतांना एका मननशील मित्राच्या रम्य सहवासाचा आनंद होतो. श्री. मनोहरपंत केळकर यांना प्रथितयश व्यक्तींच्या कुटुंबांत जन्म घेण्याचें भाग्य लाभलें आहे. त्यामुळें घरच्याघरीं त्यांना जगाचें विविध दर्शन होऊं लागलें. त्यांत व्यवसायाच्या निमित्तानें त्यांना भोवतालच्या जीवनाचेंहि अवलोकन करतां आलें आहे. या गोष्टींचा अतिशय चित्तवेधक मिलाफ या ग्रंथांत झालेला आहे. कांहींसे गंभीर असे विषय आणि विचार मांडण्याची त्यांची पद्धति पाहिली कीं त्यांत प्रस्तुत विषयाचा विस्तार त्यांच्या डोळ्यासमोर एकदम उभा कसा राहतो हें कळतें आणि याबाबतींत श्री. तात्यासाहेब केळ-कर यांची आठवण होणें अपरिहार्य आहे. परंतु त्या विषयासंबंधीं विवेचन करतांना मनोहरपंत यांचा जो दृष्टीकोण आहे त्यांत त्यांचें वैशिष्ट्य स्पष्ट दिसतें. लेखनांतील या व्यक्तित्वाबद्दल मनोहरपंतांचें मी अभिनंदन करतो.

गं. भा. निरंतर

* * *

# माझें पान

या महिनाअखेर ग्रंथ प्रकाशनाचे व्यवसायांत मी पाऊल टाकल्याला दहा वर्षे पूर्ण होतील. मनोहर ग्रंथमालेचें चवेचाळिसावें प्रकाशन म्हणून माझ्या एकवीस कथा-लेखांचा हा संग्रह मनोहर ग्रंथमालेच्या वाचकांच्या हातीं देतांना मला आनंद वाटत आहे. आपण देत असलेलें हें उपायन रसिकांना प्रिय होईल असा मनोमन विश्वास वाटल्यामुळेंच हें धाडस केलें आहे.

माझे परम स्नेही श्री. य. गो. जोशी यांनीं प्रस्तावना लिहिली आणि प्रा. भाटे, केळकर व निरंतर यांनीं या उपायनाचा आपलेपणानें स्वीकार केला याबद्दल मी त्यांचा ऋणी आहें.

'आदर्श' मुद्रणालयाचे श्री. आबा सरदेशपांडे यांनीं पुस्तक उत्तम व लौकर छापून दिल्याबद्दल व माझे सहकारी श्री. इनामदार व श्री. वष्ट यांनीं हरएक प्रकारची मदत केल्याबद्दल मी त्यांचा आभारी आहें.

'राजगुरू' मुद्रणालयाचे व्यवस्थापक श्री. गानू यांनीं दिवाळीच्या गर्दीतही तिरंगी मुखपृष्ठ सुंदर छापून दिल्याबद्दल त्यांचाही मी आभारी आहें.

गेलीं कांहीं वर्षे माझे स्फुट लेखन ज्यांनीं साक्षेपानें वाचून तत्संबंधीं सूचना केल्या व मला प्रोत्साहन दिलें त्यांचा नामनिर्देश न करतांच 'यांचे-बद्दल मी कृतज्ञता व्यक्त करतो.

२।१२।१९४६ मनोहर महादेव केळकर

# आधारवड १

पुण्याच्या रत्नाकर मासिकानं १९३२ सालीं तात्याच्या षष्ट्यब्दपूर्ती-समारंभानिमित्त केळकर–अंक प्रसिद्ध केला होता. त्यांत तात्यांच्या ‘ अंधार वड ’ या कादंबरीचं पहिलं पान छापलेलं आहे. तें पान मला अतिशय आवडलं. ती कादंबरी अजून अपुरीच आहे. पण तेव्हांपासून ‘ अंधार वड ’ हें नांव मात्र मला अतिशय आवडतं. त्या शब्दाच्या उच्चाराबरोबरच कुठल्या तरी भीषणरम्य कल्पनागुंफेंत माझं मन प्रवेश करतं. आणि मग तो शब्दच मी मनोमय आळवीत बसतों. आमच्या कौटुंबिक जीवनांतील तात्यांच्या स्थानाबद्दल विचार करतांना माझ्या मनांत वटवृक्षाचीच कल्पना येते. पण ती अंधार वडाची मात्र नव्हे—पण आधारवडाची. आणि तें नांवहि मला मनापासून आवडतं. प्रचंड वृक्षाच्या छायेखालीं इतर लहान झाडें खुरटतात असें म्हणतात. पण आमच्या केळकरांच्या कुटुंबांत तात्यांच्या कीर्तिविस्तारानं इतर कुणाचेहि यशोमार्ग कुंठित झाले नाहींत. उलट वडाच्या पारंब्या जमिनींत शिराव्यात आणि त्यांनीं मूळ धरतांच त्यांतूनच नवा वृक्ष फोफावावा तसंच झालेलं आहे. आणि या नव्या झाडाला जर कांहीं मिळालं असेल तर तो या आधारवडाचा जीवनरसच.

आमच्या आजी-आजोबांनीं अत्यंत कष्टाचा आणि काटकसरीचा पण तितकाच समाधानाचा आणि नेकीचा संसार करून आपले तीन मुलगे वाढवले. ते चांगले निघतील एवढीच फार तर त्यांची अपेक्षा असेल. पण संसाराच्या या डावाचं आपलं दान आपल्याला इतकं चांगलं पडलं असेल अशी मात्र त्यांना कल्पनाहि नसेल.

सगळींजणं पूर्ण मार्गाला लागेपर्यंत अप्पासाहेबांनीं संसाराचा बोजा संभाळला. पण त्याचा सगळ्यांनीं सदुपयोगच केला. आमच्या आजीनें तर केळकरांचं घराणं थोर लौकिकाला चढलेलं आपल्या ह्यातींत बघितले.

लेखन–भाषण–संभाषण यांतील कुशलता हें तर केळकराच्या सगळ्या लौकिकाचें आदिकारण. माझे थोरले चुलते नाना, काव्येतिहास-संग्रह नावाच्या एका मासिकाचं संपादन करीत आणि ते अकालीं निधन न पावते तर साहित्यक्षेत्रांत त्यांनींहि उत्तम लौकिक मिळवला असता. माझी आई गुजराथेंत जन्मली आणि थोडं फार तेथेंच शिकली. पण केळकराच्या घरात पाऊल टाकतांच मराठींतील पहिली स्त्री नाटककार, कथालेखिका आणि व्याख्याती असा तिनें लौकिक मिळवला. आणि तात्यांचं नांव म्हणजे तर आमच्या कुटुंबाचा हुकुमाचा एक्काच. तात्यांनीं लिहिलेलं वाङ्मय जितकं विपुल, तितकंच गुणांनींहि श्रेष्ठ आहे. आणि पुढल्या काळात ज्यावेळीं आजच्या राजकारणाचाहि विसर पडलेला असेल त्यावेळींहि मराठी वाङ्मयाच्या इतिहासांत तात्यांचं स्थान अढळ राहील.

श्रीधर मला अनेक वेळां म्हणतो कीं, '–आपल्या केळकर कुटुंबियांच्या बोटांतून रक्ताऐवजीं शाईच वहात असली पाहिजे. कारण त्याशिवाय कांहीं आपल्या घरातल्या इतक्या जणांना लिहायचा नाद लागला नसता.' आमच्या तात्यांनीं इतकं वीस हजार पानं वाङ्मय लिहिलं ना, तरी ते म्हणतात कीं, रोज एक पान रोजनिशी लिहायची मला संवय असती तर अजून दहा हजार पानं वाचण्याजोगा मजकूर माझ्या हातून लिहून झाला असता. कारण रोज असे अनेक विचार डोक्यांत येतात कीं, त्यांतून एक पान मजकूर सहज लिहून व्हावा. आणि हा लिहिण्याचा आग्रह ते इतरांनाहि करतात. 'अमका तमका गृहस्थ किती विद्वान् आहे, काय सुरेख व्याख्यानं देतो.' असं म्हटलं म्हणजे ते म्हणतात, 'त्यानं कांहीं लिहिलं आहे का ? त्याच्या विद्वत्तेचा जगाला कांहीं उपयोग होणार आहे का ? लिहायचं मनांत आणलं तर अगदीं सामान्य माणसाला देखील उत्तम आत्मचरित्र लिहितां येईल आणि वाचकांनाहि तें आवडेल. कारण प्रत्येकाच्या आयुष्यांत कितीतरी घडामोडी आणि प्रसंग येऊन गेलेले असतात. मनांत साठलेलं लिहून काढायची बुद्धि मात्र पाहिजे.'

'प्रसंगीं अखंडीत वाचीत जावें' हा समर्थांचा उपदेश मनापासून कोणी आचरिला असेल तर तात्यांनींच. कुठल्याहि कठीण प्रश्नांची चटकन् उकल करणारी तीक्ष्ण बुद्धि, रसिकता आणि सूक्ष्म विनोददृष्टि यामुळें कुठलाहि विषय तात्या जितक्या लवकर समजून घेतात तितक्याच लवकर विशदहि करून सांगतात. एकदां देवघरांत मी संध्या करायला बसलों होतों. ताईनीं मला सांगितलं, 'हातातलं घड्याळ तेवढं बाहेर काढून ठेव हो. त्याला चामड्याचा पट्टा आहे ना?' मी उलट म्हटलं, 'तुम्हाला हरणाजिन, व्याघ्राजिन हीं चालतात, तें नाहीं वाटतं कातडं?' तात्या जवळच उभे होते. ते हंसत म्हणाले, 'अरे असा प्रत्येक नियम घासायला लागलं तर आपल्यालाच बाहेर रहावं लागेल. कारण आपल्या अंगावर देखील कातडंच आहे. तेव्हां असं कीं, ज्याच्या ताब्यांत देवघर त्याचे नियम वाद न घालतां पाळावे.'

'हास्य-विनोद-मीमांसा' या ग्रंथाच्या लेखनाचें काम सुरू होतें. तेव्हां तर घरांत मोठी मौज असे. त्यातल्या तात्विक विवेचनाचे दृष्टीनें तात्यांचें अनेक ग्रंथाचें परिशीलन चालूच होतें, पण एरवींहि अनेक विनोदी प्रसंग, चुटके, कोट्या वगैरेंचा पंचनामा सारखा सुरूच असे. आतां स्वतः तात्यांनाच या गोष्टींत गोडी असल्यानें आम्हीं मुलं नवीन नवीन कोट्या, चुटके वगैरे ऐकलेल्या अगर वाचलेल्या जेवतांना सांगत असूं. मग त्यावर प्रतिकोट्या झडत आणि हंशा होत असे. त्यावेळीं ज्ञानप्रकाशचा बातमीदार घरीं असता तर रोज त्याला कॉलमभर मजकूर 'कंसांत हंशा' घालण्याकरतां मिळाला असता. Tragic या शब्दाला एकदां प्रतिशब्द खेदक' असा कुणी सुचवला, तेव्हां साहजिकच Comic ला 'मोदक' असा शब्द दुसऱ्यानें सांगितला. त्यावर तात्यांनीं मग मोदक शब्द चूक नाहीं, पण योग्यहि नाहीं, तर प्रमोदक म्हणावें असा निर्णय दिला.

'मोदक' वरून आणखी एक गोष्ट आठवली. बापूजी अणे त्यावेळीं घरीं पाहुणे होते. गणेशचतुर्थीचा दिवस असावा म्हणून मोदक केले होते. आम्हीं जेवायला बसलों आणि जम्नादास मेहता आले. त्यांना तात्यांनीं विचारलें, 'जेवायचें आहे का?' ते नको म्हणाले. त्यावर बापूजी म्हणाले, 'पाहा बरं, आम्हीं काय खातों आहोंत, हें मागाहून कळलं म्हणजे पस्तावाल.' त्यावर त्यांच्या पानांतील मोदकांकडे पाहून जम्नादास म्हणाले, 'But the

external evidence is not very convincing.' त्यावर तात्या म्हणाले, 'The external evidence might be misleading and if you want to do justice you have to look to the internal evidence and that you can't know unless you do justice to the dish itself.'

तात्याच्या सहवासात असताना त्याच्या स्वभावाचे आणखी देखील एक दोन पैलू मला बघायला मिळाले. टाईम्सच्या एका युरोपियन बातमीदारानं त्यांची मुलाखत घेतली आणि त्यातील फक्त आपल्याला सोईस्कर अशी अर्धीच मुलाखत छापली. पुनः चार दिवसानीं कांहीं कारणाकरतां तो आला. तात्यांनीं त्याला या हातचलाखीचा खुलासा विचारला. तेव्हां आपल्याच गुमींत, 'मी तुमच्या म्हणण्याला 'टाईम्स' मधून प्रसिद्धी दिली, हीच विशेष गोष्ट आहे; जागा होती तेवढा भाग मी घातला.' असें तो म्हणाला. त्याबरोबर 'मला प्रसिद्धि देण्याकरिता माझीं स्वतःचीं दोन पत्रं आहेत. मला टाईम्सची गरज नाहीं; तूं येथून चालता हो. ज्या दिवशीं तूं चूक दुरुस्त करशील त्या दिवशीं परत माझ्याकडे ये.' असें सांगून तात्यांनीं त्याला बाहेरचा रस्ता दाखवला. तो मनुष्यहि चूक उमगला. त्यानें योग्य ती दुरुस्ती करतांच त्याला उलट चहाला थाबवून घेऊन तात्यांनीं आपल्या मनाचा सरळपणाहि दाखवला.

बापूजी अणे आणि तात्या यांचा स्नेह जवळून पाहायला मिळणें हीहि एक आमच्या भाग्याची गोष्ट आहे. बापूजी तर आम्हांला घरच्यापैकींच एक वाटतात. १९३३ सालीं ते कॉंग्रेसचे प्रेसिडेंट असतांना त्यांचा मुक्काम गांधीजींच्या पुण्यांतील वास्तव्यामुळें, दोन तीन महिने आमचेकडेच होता. तेव्हांपासून आतांपर्यंत मी पहात आलों आहे कीं, राजकीय मतभेदामुळें त्यांच्या परस्परांविषयींच्या स्नेहादरांत थोडेंसुद्धां अंतर पडलेलें नाहीं. या स्नेहाचा उल्लेख नुकताच बापूजींनीं मोठ्या कौतुकानें एका व्याख्यानांत केला होता. त्यावेळीं मतभेद आणि स्नेह याबद्दल तात्या म्हणाले, 'आमचा स्नेह हा अभ्रकाच्या पातळ पडद्याप्रमाणें आहे. त्यामुळें दोघांचे मतभेद कितीहि तीव्र असले तरी अभ्रकांतून ज्याप्रमाणें विजेचा प्रवाह जाऊं शकत नाहीं, त्याप्रमाणें परस्परांच्या विचारांचें अंतर जरी त्या पडद्यांतून दिसत असलें, तरी त्यांचा एकमेकाला धक्का लागत नाहीं.' बापूजी स्नानसंध्याशील असे कडवे ब्राह्मण, तात्या त्या मानानें सुधारक. तरीहि तात्या हिंदुसभेच

पाठपुरावा करणारे तर बापूजी काँग्रेसचा पाठपुरावा करणारे, असे अनेक विरोध आणि विरोधाभास असूनहि या दोघांचा स्नेह मात्र अकृत्रिम असावा हेंहि कौतुकाचेंच नाहीं काय ?

तात्या एरवीं अगदीं संथ आणि शांत; पण माझ्या लहानपणीं मी एकदां त्यांच्या डोळ्यात अश्रु उभे केले होते. ती गोष्टहि योगायोगानेंच घडली. आज एकोणीस वर्षं झाली त्या गोष्टीला. पण मला तो दिवस अजून स्पष्ट आठवतो. उन्हाळ्याच्या सुटींत ' पुण्याच्या घरीं ' राहायला जायचा पायंडा मी त्याच वर्षीपासून पाडला होता. पुण्याला रहायला जायची ओढ मला दुसऱ्या एका कारणानें असे. तें म्हणजे माझी आजी. ती त्या वेळीं पुण्याच्या घरीं असे. आणि साऱ्या बालपणाच्या आयुष्यांत मी जर कोणावर मनापासून भक्ति ठेवली असेल, तर ती आजीवर. आणि तिची माझ्यावरची मायाहि तशीच अलोट आणि अद्वितीय होती. तिचं चित्र आक्कानं ' आई ' या हंसऱ्या निर्माल्यांत उत्तम रेखाटलं आहे, हें खरं. पण कुठल्याहि चांगल्या शब्दांनीं वर्णन करण्यापलीकडचं तिचं कर्तृत्व आणि माया होती. आमच्या दोन्ही घरचा एक नाजूक पण बळकट दुवा म्हणजे आमची आजी. आणि तिची सगळ्या घरांत माझ्यावर माया म्हणून मीहि घरांतला कौतुकाचा विषय होतो.

जसजसे सुटीचे दिवस संपत आले व धुळ्याला परत जायचा दिवस जवळ येत चालला, तसा मी रोज आजीला म्हणे, ' आजी, आतां तुमच्या-जवळ रहायचा एक दिवस कमी झाला. आतां तीनच दिवस उरले...... आतां...दोनच दिवस उरले.' आणि मग जसा जायचा दिवस आला तसा मी मनांत अगदीं गडबडून गेलों. सकाळीं उठल्यापासून जेवण होईपर्यंत मी कसातरी वेळ काढला. जेवण करून कपडे घातले. बाहेर टांगा आला. आणि मी घरच्या पद्धतीप्रमाणें वडील मंडळींना नमस्कार केला. त्यांत फक्त आजीला वगळलं. आजी दारांत उभी होती. शेवटीं तिला नमस्कार करायला आलों मात्र आणि मनाचा बांध फुटला. ब्यायशीं वर्षांची माझी आजी एवढी करारी, मनानं खंबीर पण जवळ गेल्याबरोबर लहान मुलाप्रमाणेंच रडूं लागली. आमचे तात्या संथ, कित्येक खरोखरीच मोठे दुःखाचे प्रसंग त्यांनीं शांत मनानें सोसले, पण या प्रसंगीं त्यांचेहि डोळे भरून आले.

योगायोग असा कीं, मी सहज म्हटलेले शब्द खरे झाले. आजीच्या सहवासांतले ' फक्त दोन दिवस उरले, आतां एकच उरला ' म्हणून उच्चारलेले शब्द खरे झाले. मी धुळ्याला गेलों आणि तीनच महिन्यांनीं आजी स्वर्गवासी झाली.

पण तो क्षण तात्याहि विसरले नव्हते म्हणूनच पुढें प्रत्येक सुटींत आजी नव्हती तरी ' पुण्याच्या घरीं ' जायची माझी ओढ कायमच राहिली.

आपलं घर सगळयाना उघडं असावं, कुणालाहि आपली भेट घेतां यावी, कुणाचंहि होईल तें काम आपल्या हातून पार पडावं अशाच वृत्तींत तात्या व्यक्ति आणि संस्था यांशीं वागत आले. या कामीं मतभेद त्याच्या कधींहि आड आले नाहींत. उलट अनेक वेळा असं घडलं कीं, ज्यांनीं त्याचा हेवा, द्वेष अगर मत्सर केला त्यांचं बरं करायची वेळ येतांच जवळच्यांपेक्षां त्यांचंच त्यांच्या हातून अधिक बरं घडलं आणि म्हणून मी अनेक वेळां त्यांना म्हणतोहि कीं, ' तात्या, तुमचं शत्रुत्व पत्करलं तरच एखाद्याचं काम चटकन् होतं ! ' पण तें कसंहि असो; त्यांच्या जीवनाचं मोल आजच्या राजकारणांत कांहींहि ठरो, आणि उद्यांच्या वाङ्मयांत कांहींहि मोजलं जावो, आम्हां केळकर कुटुंबांतील मंडळींना तात्यांचं नांव हा एक जोडणारा धागा वाटतो. आमची आजी ही एक आमच्या घरगुती जीवनांत एकत्व राखणारी शक्ति, एक आधार, अशी आम्हाला वाटत असे. तसे आमचे तात्या आमच्या कौटुंबिक जीवनांतील एक दुवा आणि सामाजिक जीवनांतील मोठा आधार वाटतात आणि म्हणूनच मी त्यांना ज्या वटवृक्षाची उपमा दिली त्याचं नांव आधारवड !

—दीपावली, १९४६.

---

# मुग्धवात्सल्य २

विषबीज, निवडुंग आणि मूर्खपणा या गोष्टी जर एकदां रुजल्या तर त्याची वाढ किती झपाट्यानें होईल, याची कल्पनाच केलेली बरी. गैरसमज हें देखील असेंच एक विष आहे. गैरसमजाचें बीज जर वेळींच नाहींसें झालें नाहीं तर सुखाचे संसार मातीला मिळतील, मित्र दुरावतील, राष्ट्रं युद्धप्रवृत्त होतील. किशोर आणि कालिंदी या सुखी दांपत्याच्या जीवनाचें माळरान व्हायची वेळ गैरसमजामुळें आली होती. पण सुदैव त्या थोर मनाच्या प्रेमळ जोडप्याचें आणि त्यांच्या लाडक्या मालनचें कीं असं कांहीं विपरीत व्हायचें नव्हतें; म्हणूनच धीम्या आणि शांत स्वभावाच्या किशोरच्या भावना अनावर झाल्या; एरव्ही एवढा फर्डा लेखक तो पण त्या क्षणीं, त्या आवेगात त्याची लेखणी अडली. शेवटीं तो स्वतःवर चिडला; फांशीची शिक्षा सांगणाऱ्या न्यायाधीशाप्रमाणें त्यानें टांक टेबलावर पिचून मोडला. त्या क्षणीं त्याला कालिंदीनें बघितलें आणि म्हणूनच अकारण उद्भवलेले गैरसमज एका क्षणांत नाहींसे झाले.

* * * *

किशोर अत्यंत शांत आणि गंभीर वृत्तीचा मनुष्य. सागराला नेहमीं गंभीर म्हणतात. पण असें असलें तरी समुद्र हा खरोखरी गंभीर नव्हेच मुळीं. कारण उधाणाचा अनुभव त्याच्या बाबतींत दिवसांतून दोनदां येतो. आणि याच धक्काधक्कींत समुद्राच्या अंतःकरणांतील खळबळ फेसाच्या रूपानें बाहेर पडते. किशोरच्या बाबतींत मात्र हा अनुभव येण्यासारखा नव्हता. कारण तो खरोखरींच अत्यंत शांत वृत्तीचा होता. आणि म्हणूनच अनेकांना प्रश्न पडे कीं, या माणसाला भावना हा शब्द माहीत आहे कीं नाहीं?

आणि त्याचे जिव्हाळ्याचे मित्र खेरीज करून इतरांना वाटे कीं, या स्वारी-जवळ भावना व विकार औषधाला देखील सांपडणें कठीण. पण तसें वाटणें साहजिकच हे तें. त्याचा आयुष्यक्रम इतका साधासुधा व आखींव-रेखीव होता कीं, त्यांत कांहीं विशेष मर्म नि चारुता असेल अशी कोणाला शंका देखील येऊं नये. त्याच्या मनांत जर कांहीं खळबळ माजत असली तर ती इतकी गुप्त असे कीं, वरवर पाहाणाराला तिचा कांहींच थांगपत्ता लागत नसे. एखाद्या हुशार विद्यार्थ्यानें तोंडचे हिशोबच काय, पण मोठमोठीं उदाहरणें देखील मनांतल्यामनांत आंकडेमोड करून सोडवावींत, तसेंच त्याच्या बाबतींत घडे. रोजच्या आयुष्यांत येणारे प्रश्न त्याच्यापुढें येत नसतील, असें नाहीं व ते त्याला सोडवावे लागत नसतील, असेंहि नाहीं. पण येवढें बरीक खरें कीं, अशा प्रसंगीं त्याच्या तोंडून रागालोभाचे उद्‌गार क्वचितच निघत. अगर त्याच्या कपाळावर त्रासल्यानें आठ्यांचें जाळें क्वचितच दृष्टीस पडे. नाहीं म्हणायला त्याच्या चेहेऱ्यावर एक विचार मात्र सदोदित दृग्गोचर होत असे व तो म्हणजे समाधानाचें स्मित. आणि त्या स्मितांत अशीं कांहीं जादू असे कीं, त्याच्या कट्ट्या वैऱ्यांनीं देखील आदरानें वांकून त्याला नमस्कार करावा आणि उलट नमस्कार करायला किशोरचे हात नेहमींच तत्पर असत.

या त्याच्या स्वभावामुळें साहजिकच त्याला थोडे मित्र होते. फणस गोड खरा. पण जो त्याच्या अंतरंगांत जाईल त्याला. किशोरच्या धीम्या अबोल व कांहींशा तुटक भासणाऱ्या वृत्तीमुळें अर्थातच त्याच्याशीं जिव्हाळ्याचा स्नेह जमणें ही कांहीं सोपी गोष्ट नव्हती. तर उलट ज्या अनेकांना टवाळखोर वृत्तीमुळें अगर सहानुभूतीच्या अभावीं त्याचा स्वभाव म्हणजे एक न उलगडणारें कोडें वाटे, त्यापैकीं कांहींजण त्याचा अकारण हेवा व मत्सरहि करीत. त्यांनीं असं कां करावं याला बाह्यतः कारण देतां येणार नाहीं. कधीं कोणाचा अध्यामध्यांत नसणारा मनुष्य तो. व्यवसाय, संसार आणि स्नेही यांतच सदैव रमणाऱ्या वृत्तीमुळें इतरांच्या उलाढाल्या करायला त्याला मुळीं वेळच नसे; आणि त्यामुळेंच त्याचें वर्तन इतरांशीं जरा जास्तीच तुटक होई. तो ज्या वर्तमानपत्राच्या कचेरींत नोकर होता, त्या ठिकाणीं त्याच्या प्रभावी लेखणीमुळें त्याचा वरिष्ठाकडून विशेष गुणगौरव होई, हें

खरें. पण त्यामुळें त्याच्या वागणुकींत अहंकाराची छटाहि आली नव्हती. तर मग साहाजिकच प्रश्न पडे कीं, अशा सालस माणसाचा कोणी काय म्हणून उगाच मत्सर करावा? आणि एकच उत्तर शक्य दिसतें, तें म्हणजे त्याचा स्वभाव हें अनेकांना एक कोडें होतें. तो अबोल होता पण हंसतमुख होता. तुटक होता पण आईमागून रस्त्यावरून धावणारें भिकारणीचें पोर धांवताना पडलें तर त्याला उचलून त्याच्या घाणेरड्या कपड्यांना लागलेली माती झटकून त्याच्या आईजवळ देण्याइतका लाघवीपणाहि त्याच्याजवळ होता. प्रतिष्ठितांचे नमस्कार तो मोठ्या विनयानें परत करी. पण त्याबरोबरच पुढल्याच पावलीं त्याच्या कचेरीसमोर रस्ता झाडणाऱ्या झाडुवाल्यानें सलाम केला तर क्षणभर थांबून अगत्यानं त्याच्या आजारी म्हातारीच्या तब्येतीची चौकशी करून शक्य तेव्हां कांहीं पैशाची मदतहि करी व त्याचा दुवाहि घेई. कचेरींत अनेक वेळा 'चहा आणि चर्चा' यांचे कार्यक्रम होत. इतरांबरोबर हाहि त्यांत भाग घेई पण चहाचा पेला तोंडाला लावून इतरांचें म्हणणें ऐकण्याकडेच त्याची प्रवृत्ति असे. आणि चहा निवत टाकून 'मतांचा आणि म्हणण्याचा' काथ्याकूट तो अगदीं क्वचितच करी आणि जर मत विचारलेंच तर त्या प्रश्नांचें झटकन् पृथक्करण करून आपल्या बुद्धिमत्तेनें तो इतरांना चकित करी आणि मी या प्रश्नावर अशा रीतीनें लिहीन असें सांगून मोकळा होत असे. त्याची बुद्धिमत्ता आणि लेखणी यांबद्दल पूर्ण आदर असल्यामुळें वरिष्ठ देखील त्याच्याशीं जास्त वाद घालून त्याच्यावर आपलें मत लादण्याचा बहुशः प्रयत्न करीत नसत. त्याच्या स्वभावाचें कोडें सोडवावयाचा अनेकांनीं प्रयत्न केला पण जेव्हां त्यांचें समाधान होईना, तेव्हां त्याच्यावर अनेक टीका सुरू झाल्या. पुष्कळ सामान्य माणसांच्या बाबतींत आपणांस असें आढळून येतें कीं, एखाद्या गोष्टीचें त्यांना नीट आकलन झालें नाहीं, तर आपल्या बुद्धीचा कमीपणा मानून ते स्वस्थ राहणार नाहींत, किंवा ती समजून घेण्याचा नेटानें प्रयत्नहि करणार नाहींत; तर उलट त्या गोष्टीची टवाळी सुरू करून आपली उणीव झांकण्याचा प्रयत्न करतील. प्रत्येकाला प्रत्येक गोष्ट समजेलच किंवा ती समजलीच पाहिजे, असें नाहीं. पण त्यामुळें त्या गोष्टीचा त्यांनीं पाठपुरावा केलाच पाहिजे असेंहि नाहीं. पण हा समंजसपणा अनेकांच्या अंगीं नसतो. जणूं काय ती गोष्ट

आकलन न होण्यांत आपल्या बुद्धीचा अपमान झाला, असें उगाच समजून आपला कमीपणा झांकण्याकरतां टवाळीच्या महावस्त्रांचा ते उपयोग करतील. अर्थात् अशा कुचाळ्यानीं किशोरचें कांहींच वांकडें होण्यासारखें नव्हतें. पण ही टीका त्याच्या मित्रांच्या जिव्हाळ्यानेंच त्याला थोडीशी भोंवली.

त्याचें असें झालें कीं, किशोरच्या मित्राच्या कानावर जेव्हां प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष त्याची नालस्ती येई तेव्हां त्यांचे प्रेमळ मन व्याकूळ होई. कोणी निंदक त्याला घुम्या ठरवीत तर कोणी म्हणत हा बावळा आहे तर कोणी म्हणत बेट्याच्या अंतरात नाना कळा आहेत. गप्प बसून सगळयाचीं मतें ऐकून घेतो आणि मग त्यांतच थोडासा फेरबदल करून स्वतःचें मत म्हणून दडपून देतो. कोणी म्हणत हा भिकारणींच्या पोराना पेपरमिंट वाटतो खरा. पण मग हे संत तुकाराम स्वतःच्या पोरीपर्यंत हात हलवीतच पोंचत असतील. लगेच आणखी कोणी बडबडावें, 'हा तुकाराम कोठला? हा एकादा भाई असेल.' आणि हें सर्व ऐकलें कीं, त्याचे मित्र त्याला म्हणत, 'अरे तूं इतका सालस नि सरळ. मग आणखी थोडा मनमोकळा कां वागत नाहींस सर्वांशीं? म्हणजे या असल्या घाणेरड्या कुचाळ्या तरी आम्हांला ऐकाव्या लागणार नाहींत. कारण तुला बरा म्हणणारे आम्ही थोडे, आणि शिव्या देणारे फार. त्यांच्या आरडाओरडींत आमचा आवाज कुठच्याकुठें लोपून जातो.' त्यावर त्याचें उत्तर ठरलेलें असे; 'अरे बाबांनो, देईनात का ते शिव्या मी कसा आहें हें तुम्हाला माहीत आहे ना? मग त्यांच्या शिव्यांनीं तुमची उलट करमणूक व्हावी. हे चालायचंच! ज्याला एक मुक्त म्हणेल त्याला दुसरा कोणी तरी पशु म्हणणारा निघायचाच.' कधीं तो म्हणे, 'मला तुम्ही स्वभाव बदल म्हणता, पण तें कसें रे शक्य आहे? आणि जरी शक्य झालं तरी मी म्हणतों, तसं काय म्हणून करायचं? नांवं ठेवणारांना काय, आज असा वागतो म्हणून नांवें ठेवतील, उद्यां तसा वागतो म्हणून ठेवतील. मी माझ्याकडून सरळ वागतो आहे ना? केला आहे कां कधीं कुणाचा अवमान? दुखवलंय्-कां कुणाला? मग कां त्यांनीं बोटं मोडावीं उगाच? आणि तीच त्यांच्या आयुष्याची इतिकर्तव्यता असेल तर तुमच्या आमच्या बदलण्यानें कां ते थांबणार आहेत?' आणि असं कांहीं त्यानें म्हटलें कीं, त्याचे मित्र गप्प बसत. आणि अशा धीम्या वृत्तीमुळे त्यानेंहि कधीं मनाला त्रास करून

घेतला नाहीं. पण निंदकांनीं उत्पन्न केलेल्या या विषारी वातावरणाचा उपसर्ग त्याला थोडासा बाधलाच. तो देखील त्याच्या प्रेमळ मित्रांनीं सारासार बुद्धीचा पोंच न राखल्यानें कालिंदीच्या मनांत कलीचें बीष थोडें थोडें भिनूं लागलें म्हणून ! पण आमच्या कथेच्या आरंभींच उल्लेखिलेला प्रसंग आला म्हणून तें वेळींच नष्ट झालें.

इतरांशीं बोलतांना जरी त्याचें स्नेही त्याचे कौतुक करीत आणि त्याच्या तुटकपणाचें समर्थन, ' त्याचा स्वभावच जरा लाजाळू ' म्हणून करीत, तरी त्यांना देखील त्याचा तुटकपणा अगदींच जागवत नसे असें नाहीं. आणि आपसांत चर्चा करतांना अगर त्याच्या बायकोशीं बोलतांना ते त्याबद्दल उघड बोलत. त्याचा न कळत थोडासा परिणाम तिच्यावर होत असे. त्यांतल्या त्यांत तो स्वतःच्या मुलीकडे देखील द्यायला पाहिजे तितकें लक्ष देत नाहीं या मुद्यावर जेव्हां तिच्या मैत्रिणी भर देऊन बोलूं लागल्या तेव्हा मात्र तिच्या मनाचा बालेकिल्ला काबीज झाला प्रिय पति विरुद्ध लाडकें अपत्य अशी जेव्हां तिनें आपल्या मनांत माडणी केली आणि नंतर ती हीं बोलणीं ऐकूं लागली तेव्हा हळंहळु तिला खरोखरीच वाटूं लागलें कीं, किशोर मालनशीं तितक्या जिव्हाळयानें वागत नाहीं. ती मनांत म्हणूं लागली, ' आपल्याच नादांत ते माझ्याशीं थोडें फार तुटक वागले तर तें कांहीं मी तितकंसं मनावर घेणार नाहीं. पण त्या बिचाऱ्या मालनशीं, छकुलीशीं, असं वागणं म्हणजे खरोखरच मोठा गुन्हा आहे. किती गोड अन् प्रेमळ जीव आहे तो. दगडाला देखील त्याचा लळा लागेल. देवरायाच्या बगिचांतलं पारिजाताचं फूलच जणूं कांहीं मालनच्या रूपान आमच्या घरीं अवतरलं आहे. आणि हे देखील कांहीं तसें कठोर नाहींत ! वन्संच्या मुलाचं नाहीं कां परवां त्यांनीं किती कोडकौतुक केलं. मग काय जणूं स्वतःच्याच लेकराच्या बाबतींत हे असे उदासीन ! कां तें ? पण बाई हे कांहीं बरं नव्हे ! '

मग पुढें पुढें ती आपले हे विचार वागण्यानें आणि शब्दांनीं बोलून दाखवूं लागली. तिच्या तोंडून जेव्हां हें त्यानें प्रथम ऐकलें तेव्हां तिला तो म्हणाला, ' तुला पण झाली कां या विषाची बाधा ? मग ठीक आहे. मला वाटलं होतं कीं पांचसहा वर्षांच्या अनुभवानं तूं तरी निदान माझा

स्वभाव ओळखला असशील. कालिंदी, दिवसभर सारे उद्योग सोडून मी मालनशीं खेळत बसलों म्हणजेच माझं तिच्यावर प्रेम आहे असं सिद्ध होईल का ? ' पण येवढ्यानं कालिंदीच्या मनाचं समाधान होण्यासारखं नव्हतं. अजाण मालनला मात्र याची अणुमात्र जाणीव नव्हती. तिला पुष्कळ शब्दहि बोलतां येत नव्हते आणि तिची बुद्धीहि बालबुद्धीच होती. पण तिच्या संस्कारक्षम अंतःकरणाला मात्र सत्य परिस्थितीची पूर्ण जाणीव असावी असें वाटतें. कारण दिवसभर तिची जोपासना आणि कोडकौतुक करणाऱ्या-आणि अलीकडे जास्तच आईइतकीच किंबहुना कांकणभर अधिकच, तिला बापाची ओढ लागलेली असे. जणूं काय तिच्या अजाण मनालाहि तिच्या प्रेमळ पण अबोल पित्याच्या अंतःकरणांतील मुग्धवात्सल्याची पूर्ण जाणीव होती.

त्याचाहि आपला कार्यक्रम नेहमींसारखाच चालूं होता. अगदीं पहांटे उठून थोडेसें आन्हिक उरकून तो वाचीत अगर लिहीत बसे. जसें कांहीं निःशब्दतेंत आनंद मानणारें त्याचें हृदय त्या पहांटेच्या प्रशांत समयीं भोंवतालच्या वातावरणांत पूर्ण विलीन होऊन जाई. साधुसंतांनींहि क्वचित् प्रसंगीं हेवा करण्याइतकी त्याची ती तन्मयता विलोभनीय असे. आणि मग थोड्याच वेळानें सुरू होणारें पहांटचे मधुर निनाद, समोरच्या घड्याळाच्या टिक्‌टिक् आवाजाइतकेंच त्याच्या जाणिवेंत असत. कोंबडा आरवूं लागे. घराबाहेर पडणाऱ्या गुरांच्या गळ्यांतील घुंगुर निनादूं लागत, सडासंमार्जनाचे सड्‌सड् आवाज सुरू होत. धारेला आणलेल्या गाई-म्हशींच्या दुग्धधारा चरव्यांत किंचित् कर्कश आवाजांत पडूं लागत आणि जसजसें भांडें भरत येई तसतसें त्याच कर्कश आवाजाचें गंभीर नादांत रूपांतर होत असे. पण या प्रकाराची त्याला मात्र दादहि नसे. किंबहुना असें म्हटलें तरी चालेल कीं एकदा लागलेल्या समाधीची एकतानता वाढायला हें सर्व संगीत अप्रत्यक्ष कारणच होत असे. समोरच्या ग्रंथराजाचीं पानें उलटायचीं तेव्हां भराभर उलटलीं जात, त्यांतील एखाद्या सुभाषिताचें मनन चालूं असल्यास त्यांतहि खंड पडत नसे आणि लेखणी सारखी झरझर मार्ग आक्रमीतच असे.

पण कोंबड्याच्या आरवण्यानें जरी किशोरची समाधि भंग पावत नसे, तरी पहांटच्या या कार्यक्रमानंतर त्याची लाडकी मालन जेव्हां त्याला चहाला येण्याकरितां हाका मारावयाची व दुडदुड धावत येऊन त्याला बिलगायची तेव्हा मात्र तिची मधुर हांक पहाटेच्या कोंबडयाच्या आरवण्यापेक्षां अगर घुंगरांच्या निनादापेक्षा त्याला शतपट गोड वाटावयाची व तो भानावर येऊन तिला जवळ घ्यायचा. मग तिला कडेवर घेऊन एका हातानें तिचे भुरभुरणारे सोनेरी केस मागें सारीत चहा घ्यावयाला आत जाताना तिला विचारायचा, ' माल्या, बाप्पाला नमस्कार केलास का ? ' कीं लगेच एका बाजूला खांद्याला कान टेकेल इतकी मान वाकवून ती म्हणायची, ' हो शुद्धां ' आणि ' आईला पेढा दिलास का ? '

' हो शुद्धां ' दुसऱ्या खांद्यावर मान वाकवून पुन्हां तेंच उत्तर मिळे.

' आणि प्रार्थना झाली का आमच्या मालुताईची ? ' आणि या प्रश्नाला मात्र तिचें नेहमीचे ' हो शुद्धां ' हें उत्तर न देतां ती मानेनेंच ' नाहीं ' म्हणावयाची. यावर तिच्या गालावर टिचकी मारून तो विचारी ' का बरं ? ' कीं तिचें उत्तर तयार असे. ' आंत पाटावर बसल्यावर म्हन्नार आहे मी ! '—आणि ती असा काहीं पोक्तपणाचा आविर्भाव करावयाची कीं काहीं विचारूं नका. पाटावर येऊन बसलें कीं, मालीनें किलबिल्या डोळयानीं आई दुधाचा पेला केव्हां भरते, तो पुरता भरते कीं कमी, हें पहात हात जोडून बोबड्या शब्दानीं ' या कुन्देन्दुतुषारहारधवला ' हा श्लोक म्हणावयाचा. श्लोकाच्या शेवटीं असलेले 'निःशेपजाड्यापहा ' हें शब्द तिनें म्हटलें कीं, 'हें दूध आतां पहा ' असें त्याच सुरावर हंसत म्हणून कालिंदीनें तिच्यापुढें दुधाचा पेला करावयाचा. ज्याप्रमाणें ती एका श्वासांत सगळा श्लोक म्हणून टाकावयाची त्याचप्रमाणें भर्कन् एका दमांत दुधाचा पेलाहि रिकामा करावयाची, अन् मग किशोरला विचारायची ' तुमचा नाहीं, चहा संपला अजून ? चहा वाईट असतो ? ' कारण चहा वाईट असतो म्हणून लहान मुलांनीं पिऊं नये असं त्यानें तिला सांगितलें होतें. ' मग तो मोठ्या माणसानां कसा चालतो ' हें विचारावयाची अक्कल अजून तिला आली नव्हती. तरी ' चहा वाईट असल्यामुळें तो चवीला देखील वाईट असला पाहिजे व म्हणूनच तो संपवायला आपल्या वडिलांना वेळ लागत असला पाहिजे, ' असें समक

तिनें आपल्या मनाशीं ठरवून ठेवलें होतें. आणि म्हणूनच त्याचा न संपलेला चहा पाहून तो प्रश्न ती नेमका विचारावयाची. मग मुद्दामच तोंड वेडेवांकडे करीत ' खरंच किती वाईट, माल्या, आपल्याला एक पेढा दे ना ' असें त्यानें आर्जवून, दुधाचे थेंब तसेंच असलेल्या तिच्या ओठांचा एक पापा घ्यावयाचा. आणि मग स्वारी फिरून आपल्या उद्योगाला लागावयाची. आणि असंच दिवसांतून केव्हां तरी मुलीचें कौतुक करून त्याच्या प्रेमळ अंतःकरणाचें पूर्ण समाधान होई. त्याच्या स्वभावाची चांगली माहिती असलेल्या कालिंदाला आपल्या लाडक्या कन्येचें लालनपालन करताना पतीची येवढी मदत व उत्तेजन पुरत असे. व त्यांत तिलाहि समाधान वाटत असे. पण हें कुठपर्यंत? तिच्या मनात सैतानानें प्रवेश केला नव्हता तोंपर्यंत. पण नंतर मात्र तिला हें कौतुक अपुरें वाटूं लागलें—तिला वाटूं लागलें कीं, किशोरचें घरात असावें तितकें लक्ष नाहीं. संसारी माणसाला न शोभणारी विरक्तता त्याच्यामध्यें शिरत चालली आहे. पलीकडचे रामभाऊ त्यांच्या काळ्या आणि नकट्या बबीचें इतकें कौतुक करतात अन् मग अशी केतकीसारखी सुंदर मुलगी असतांना किशोरनें तिचें वास्तविक किती तरी कोड पुरवावे असेहि विचार तिच्या मनांत येत.

किशोरच्याहि लक्षांत हा बदल आला नव्हता असें नाहीं. मोजक्या शब्दात बोलावयाच्या त्याच्या संवयीप्रमाणें त्यानें वर लिहिल्याप्रमाणें तिचा गैरसमज दूर करावयाचा सौम्य शब्दांत प्रयत्नहि केला होता. पण नंतर मात्र तो गप्प बसला. कारण कांहीं बाबतींत योग्य वेळ येईपर्यंत गप्प बसणेंच गैरसमजांच्या निराकरणास श्रेयस्कर; प्रत्येक घटनेला योग्य काल दिला पाहिजे; उगाच आधींच जिवाचा आटापिटा करण्यांत अर्थ नसतो, अशा श्रद्धेचा तो माणूस होता व ती योग्य वेळ अनपेक्षितरीत्या पण लवकरच आली.

तो प्रसंग सांगावयासच आम्ही आरंभीं सुरुवात केली होती. पण तेवढ्याच प्रसंगाच्या वर्णनानंतर आम्हांला जें सांगावयाचें आहे त्याचें मर्म वाचकांना कदाचित् नीट समजलें नसतें आणि म्हणूनच तो प्रसंग तिथेंच सोडून आम्हांला त्यांना किशोर कालिंदीची ओळख करून द्यावी लागली.

बुद्धिमान् लेखनपटु किशोरची लेखणी अडली; सतरा वेळां प्रयत्न करूनहि त्याची हुकमी लेखणी आज त्याचा हुकुम मानावयाला तयार

होईना; एरवीं एकटाकी कॉलमचे कालम लिहिणारा फर्डा आणि नामवंत लेखक तो ! पण आज त्याच्या हातून चार ओळीहि रेटेनात. कारण तो प्रसंगच तसा होता. शांत आणि धीम्या किशोरच्या भावनाहि आज अनावर झाल्या. त्याचें गाभीर्य ढळलें, बुद्धीचें स्थैर्य ढासळलें; त्याच्या मनातली खळबळ त्या वेळीं त्याला काबूंत ठेवता येणें अशक्य झालें.

ती वेळ रात्रीची होती. साडेअकरा बारा वाजले असतील. चैत्राच्या वद्य पक्षांतली ती रात्र होती. बाहेर गडद अंधार होता. अजून चंद्रोदय व्हावयाचा होता. निशेचा अंमल सगळीकडे पसरला असल्याची साक्ष, त्या निःशब्द शांततेंतहि एखादें कुत्रें मधेंच केंकाटून देत होतें. पण रात्रीं तरी सुखानें झोंपायचें भाग्य सगळ्याच्याच कुठलें कपाळीं असायला. नाटक सिनेमाचे शौकीन देखील जागतात खरें. पण त्या जाग्रणात हौस असते. पण रात्रीं स्वस्थ झोपायचेंहि भाग्य नशिबीं नाहीं आणि जाग्रण करावयाचें तेंहि समाधानानें अगर हौसेनें नव्हे, अशी ज्यांच्यावर पाळी ते खरेंच दुर्दैवी नव्हेत कां ! किशोर आणि कालिंदी यांच्या नशिबातहि आज ते कष्ट होते. त्याची लाडकी मालन आज बरेच दिवस आजारी होती आणि मघाशीं डॉक्टर जे परत गेले तेहि जराशा उद्विग्न मनःस्थितींतच.

' डॉक्टर, मालन बरी होईल ना ? ' कालिंदीनें विचारलें. त्यांनीं तरी काय सांगावें ? त्यांची बुद्धि सांगत होती कीं, ' केस जरा सीरिअसच आहे. ' मनाला आशा होती कीं, आपल्या मित्राची मुलगी बरी होईल म्हणून. द्विधा मनःस्थितींत त्यांनीं उत्तर दिलें, ' वहिनी, माली बरी न व्हायला काय झालं ? एवढंच कीं आजची रात्र जरा जास्त काळजी घेतली पाहिजे. '

डॉक्टर गेले आणि किशोर कालिंदी त्यांच्या लाडक्या मालनजवळ बसून होतीं. हातानें उपचार आणि मनानें देवाचा धांवा यापलीकडे त्या प्रेमळ मातेच्या हातांत दुसरें काय होतें ? संध्याकाळपासून मालनचा ताप चढूं लागला व तिची बरीच तगमग होत होती. नऊ वाजतां तिचा ताप जरा कमी होऊं लागला पण मग ती मात्र निपचीतच पडून होती. हुशार डॉक्टर आणि प्रेमळ मातापिता यांना जें कांहीं करणें शक्य होतें तें सर्व करून झालें होतें. आणि आतां दैव काय कौल देतें तें पहाण्यापलीकडे करण्यासारखें

कांहींहि उरलें नव्हतें. कालिंदीकडे जर त्या क्षणीं कुणी बघितलें असतें तर मूर्तिमंत कारुण्य तिथें एकवटलेलें दिसलें असतें. मधून मधून ती किशोरच्या तोंडाकडे नजर टाकी. त्यावेळीं त्याच्या मुखावरील प्रशांत गांभीर्य पाहून तिला धीर वाटे. पण त्या क्षणींदेखील तिच्या मनाला सैतानानें डिंवचलेच. अशा परिस्थितींतहि हे इतके शांत कसे? किशोर देखील मधून मधून मालनचा ताप बघत होता. डोक्यावरची कोलन वॉटरची पट्टी नीट करी होता. पण आपल्या चेहेऱ्यावर आपले विकार दिसूं न देण्याची तो शक्य तितकी खबरदारी घेत होता. व नेहमींच्या अभ्यासाने तें त्याला साधलेंहि होतें. आणि खरोखरीच तें किती रास्त होतें. अशा वेळीं सगळ्यानींच धीर सोडला तर कसें व्हायचें? पण विषबीज एकदां मनात रुजल्यानंतर कालिंदीला या गांभीर्याचा विषाद वाटावा हें सहजच होतें. आपला पति संसाराविषयीं उदासीन आहे अशी शंका तिच्या मनांत उद्भवली होती. आणि ती अस्थानीं होती तरी त्या कल्पनेनें एकदां मनांत ठाणें दिल्यापासून किशोरच्या वागण्यांतील बारीकसारीक दोषांकडेहि ती विपरीत दृष्टीनें न कळतच बघूं लागली होती. आणि यावेळीं स्वतःची उद्विग्न मनःस्थिति लपवण्यात किशोरला अतिशय ताण सहन करावा लागत होता; तरी कालिंदीनें मात्र त्या उसन्या प्रशांतपणाचा विषादच मानला.

आणि किशोर मात्र मनांतून तळमळत होता, पण बाह्यतः गंभीर रहावयाचा प्रयत्न करीत होता व स्वतःचे दुप्पट हाल करून घेत होता. त्याचा बेचैनपणा दरक्षणीं वाढत होता. मग उगाच चाळा म्हणून तो कोलनवॉटरची पट्टीच ओली आहे कीं नाहीं तें बघ, मालनच्या अंगावरूनच हात फिरव, असें करीत होता. पण त्यामुळें त्याला जास्तच भडभडून येऊं लागलें. त्या बिकट परिस्थितींतून त्याला सोडविण्याकरितांच कीं काय——

बाहेर दारावर थाप बसली. किशोरनें बाहेर जाऊन दार उघडलें. दारामध्यें एक ‘ निशाचर ’ उभा होता. संपादकांच्याकडून चिठी घेऊन तो आला होता. रावबहादुर भोपळयांचा आणि त्यांच्या पत्राचा शब्दशः ऋणानुबंध होता. शिवाय ती एक गांवांतीलच नव्हे तर जिल्ह्यांतली प्रसिद्ध व्यक्ति होती. रावबहादुर त्यावेळीं मृत्युशय्येवर होते व दोन तीन तासांत बहुतकरून आटपतील असा अंदाज होता. आणि म्हणूनच दुसऱ्या दिवशींच्या

पत्रांत त्यांच्याबद्दल मृत्युलेख देणें अत्यंत जरूर होणार होतें. तो मृत्युलेख ताबडतोब लिहून पाठवावा असा संपादकांचा आग्रह होता. मधांशीं एकदां हा माणूस आला होता. पण मुलीचें जास्त आहे असें सांगून त्याला किशोरनें परत पाठविलें होतें. यावेळीं संपादकांनीं चिठींत मालनला लवकरच बरें वाटेल अशी आशा प्रदर्शित करून तो लेख लिहून देण्याबद्दल गळ घातली होती.

किशोरच्या मनांत आलें कीं, 'एवींतेवी आपणांला आंत बसून कालिंदीच्या चिंताव्याकुळ मुद्रेकडे बघवत नाहीं. अशावेळीं या निमित्तानें बाहेर बसायला मिळालें तर बरें. आंत बसून तरी आपण जास्त काय करणार? बरें जरूर लागलीच तर आपण कांहीं दूर नाहीं.' त्याला वाटलें हें रास्त होतें, असें आम्ही म्हणत नाहीं. पण प्रामाणिकपणानें त्याला तसें वाटलें खरें. त्या हेतूनें तो आंतल्या दाराशीं गेला व कालिंदीला म्हणाला, 'मी जरा लिहितों आहे, कांहीं लागलं तर मला हांक मार हं.' त्यावेळीं अशा कांहीं चमत्कारिक नजरेनें तिनें त्याच्याकडे बघितलें कीं, कालिंदीच्या प्रेमळ डोळयांत असला जळजळीतपणा असेल अशी कधीं त्याला कल्पनाहि नव्हती. ज्या सुंदर नेत्रांत प्रेम आणि वात्सल्य यांखेरीज दुसरा विकारहि दिसूं नये, त्या डोळयांत कट्टया वैऱ्याचे मनांतील भाव दिसलेले पाहून किशोर तर क्षणभर चपापलाच. पण नेहमींच्या धीम्या स्वभावास अनुसरून कांहीं लक्षांत न आल्याचें दाखवून तो बाहेरच्या खोलींतील टेबलाकडे वळला. दौतींत टांक बुडवून त्यानें लिहावयास सुरुवात केली. सुरुवातीच्या चार ओळी लिहून झाल्यावर दुसऱ्या परिच्छेदाच्या आरंभीं त्यानें लिहिलें, 'कै. रावबहादूर यांना लोकप्रियता मिळण्यास जे अनेक गुण कारणीभूत झाले त्यांपैकीं मुख्य गुण म्हणजे दातृत्व. हा गुण त्यांच्या अंगीं केवढ्या प्रकर्षानें वसत होता तें सांगावयाचें तर—' आणि येवढें लिहून होतांच किशोरची लेखणी अडली. त्याच्या डोळ्यासमोर आठ वर्षांपूर्वीचा प्रसंग उभा राहिला. वडिलांच्या मृत्यूनंतर नोकरीच्या शोधार्थ तो या गांवीं आला व रावबहादुरांची कीर्ति ऐकून दुसरी नोकरी मिळेपर्यंत राहाण्यास जागा व पोटास अन्न यांच्या मोबदल्यांत त्यांच्याकडे त्यांचा खासगी कारकून म्हणून राहिला. पुढें महिन्या दोन महिन्यांतच त्यांच्या दातृत्वाचा वीट येऊन

मास्तरची एक जुजबी जागा मिळतांच त्यांना साभार रामराम ठोकून तो स्वतंत्र राहूं लागला. त्याच रावबहादुराचें गुणवर्णनपर चरित्र तो पत्राचा नोकर होता म्हणून व व्यवहार म्हणून लिहिणें भाग होतें. हें सर्व चित्र, दातृत्व या शब्दानें डोळ्यासमोर उभें राहतांच त्याचा हात अडला, डोळे भरून आले आणि डोळ्यासमोर कागद दिसेनात. 'हिशेबीपणांत ज्यांचें आयुष्य गेलें, कुणाला किती जेवावयास घातलें व त्याच्या मोबदल्यांत तो किती राबला याचा हिशेबि' काटेकोरीनें करण्यांत ज्यांचा जन्म गेला, ज्यांना जाहीर रीतीनें दातृत्व आणि खागजी रीतीनें ज्यांचे दातृत्वादि गुणदेखील हिशेबीच होते, त्या रावबहादुरांचा मृत्युलेख मी लिहावयाचा आणि तो देखील माझी लाडकी मालन अत्यवस्थ असतांना? रावबहादुर केवढेहि मोठे असोत, त्यांचा मृत्युलेख मी न लिहिला तर पत्राचा अंक अडत नाहीं आणि अडला तरी मला त्याची पर्वा नाहीं. स्वतःचे मनोविकार आवरेनात म्हणून चारदोन घटकांचीच कदाचित् सोबतीण असलेल्या मालनला दृष्टीआड केली मी ? माले मला क्षमा करशील का ? अवघ्या दहावीस क्षणांत त्याच्या मनांत हे विचार येऊन गेले. येवढ्यांत ' आई, भाऊ कुठाहेत ? ' अशी मालनची हांक त्याच्या कानीं आली शुद्धीवर येतांच त्या लाघवी पोरीनें आपली प्रथम चौकशी केली आणि आपण मात्र—त्याला स्वतःचा संताप आला, रावबहादुरांचा आला आणि त्या टांकाचाहि आला. तो खूप चिडला आणि त्या भरांत तो टांक त्यानें मोडला. फांशीची शिक्षा सांगणाऱ्या न्यायाधीशाप्रमाणें दाबून पिचवून मोडला, आणि ' आः ऽ ऽ ऽ ' असा उद्गार काढून तळहातांत मस्तक घट्ट दाबून धरलें.

आपल्याकडे दुर्लक्ष करून किशोर लिहावयास गेला हें बघितल्यावर कालिंदीच्या डोळ्यांत क्षणापूर्वीच दिसलेली व क्षणभरच टिकलेली चमक कुठल्याकुठें नाहींशी झाली. तिला तो अपमान वाटला. तिला दुःखावेग असह्य झाला, आणी हुंदका आवरेना. 'बाबी, आपण कुणाला नकोत ग' असें हताशपणें म्हणून तिनें निपचित पडलेल्या मालनच्या अंगाभोंवतीं हात टाकले आणि तिच्या मुखावर मस्तक टेंकून ती अश्रू गाळूं लागली. पण त्याचक्षणीं तिचा भोग सरला म्हणून अगर आईच्या डोळ्यांतलीं आसवं फार कढत होतीं म्हणून किंवा तिचा गैरसमज घालवण्याकरितांच, मालन शुद्धीवर आली

खरी आणि तिनें वरील प्रश्न विचारला. एका क्षणांत कालिंदी आपलें दुःख विसरली. मुलगी मिळाल्याचा आनंद तिच्या मनांत मावेना आणि प्रश्न नीट समजावयाच्या आंतच ' आलें हं बाबी ' म्हणून ती बाहेर आली. ती पाठीशीं येऊन उभी राहिली तरी त्याचें लक्ष नव्हतें. समोर टेबलावर आरसा होता तरी त्याला ती दिसली नाहीं. तिनें हांक मारली ' किशोर ' आणि त्या हांकेनें एकदमच मघाच्या मालनच्या हांकेची जाणीवहि त्याला तेव्हां झाली. कालिंदीनें तो मोडका टांक बघितला. तिच्या न कळत तिचें समाधान दुणावलें. तिच्या गालावरचे अश्रू अजून वाळले नसले तरी आनंदी हास्याचें इंद्रधनु त्यांतच विलसत होतें. तिची हांक ऐकतांच किशोर उठला तिच्यासमोर उभा राहून तिचे खांदे घट्ट धरून अजीजीच्या स्वरांत तो म्हणाला, ' कालिंदी, मला क्षमा कर. तुझं मन मी दुखवलं. तुझ्या भावना—' त्याचे हात खांद्यावरून काढून हातांत घेत ती म्हणाली, ' किशोर, क्षमा कसली मागतां यावेळीं. चला पाहूं आधीं आंत. आपला माल्या हांक मारतो आहे.'

त्यानें मालनजवळ तोंड नेतांच तिनें हात वर करून त्याच्या गळ्याला मिठी मारली. त्यानें तिला मांडीवर घेतलें. बापलेकीचें तें प्रेम पाहून कालिंदीला वाटलें, आपला उगाच गैरसमज झाला. 'सोन्या, असं भलत्यावेळीं कां निजायचं ? ' असं म्हणून लेकीचें चुंबन घेण्याकरितां ती वांकली. तिच्या गालावरचे अश्रू पाहून मालननें विचारलें, ' आई तूं कां ललतेश?'

'बाळ तूं निजली होतीस ना, तेव्हां आम्ही भांडलों तूं कोणाची म्हणून. मी म्हटलं माझी. तर तुझी आई रडायला लागली.'

'मीं आईची आहे अन्, तूं माझ्या आहेश,' मालन म्हणाली. इतक्यांत दिशा उजळल्या आणि चंद्रमा क्षितिजावर आला. कुठेंतरी कोकिळेला चुकून वाटलं पाहांट झाली, आणि तिने 'कुहू' केलें. मालनलादेखील वाटलं कीं, उजाडलं. तिनें विचारलें, 'आई उजाडलं कां ग?' पण कालिंदीला भान कुठें होतें! गेल्या थोड्या घटकांत तिनें इतक्या विविध भावना अनुभवल्या होत्या आणि या वेळचे सुखाचे क्षण इतके मनोहर होते कीं, धांदरटपणानेंच ती म्हणाली, 'होय वाटतं!'

—वाङ्मयशोभा, जुलै १९३९

# मे. वेस्टची पूर्वेवर संक्रांत ३

[ प्रो. एडवर्ड थॉम्पसन् हे एक इंग्लिश सद्गृहस्थ इतिहासाचे अभ्यासक असून त्यांचा संस्कृतचा व्यासंग दांडगा आहे. हिंदुस्थानबद्दल प्रेम वाटणारे आणि भारतीय संस्कृति व परंपरा यांबद्दल आदर बाळगणारे जे थोडे परदेशीय लोक आहेत, त्यांत प्रोफेसर मजकुरांची गणना प्रामुख्यानें करावी लागेल. हिंदुस्थानांबद्दल ब्रिटिशांच्या काय कल्पना आहेत याची जाणीव नव्यानें करून द्यावयास पाहिजे असें नाहीं. ' हिंदुस्थान ही एक दुभती गाय आहे' ही राज्यकर्त्यांची भावना आणि ' हिंदुस्थानांत गांधी आहेत आणि वाघ आहेत' हे सामान्य जनतेचें हिंदुस्थानविषयींचें अगाध ज्ञान ! अशा परिस्थितींत प्रो. थॉम्पसन यांच्याबद्दल विशेषच आदर वाटतो.

हे सद्गृहस्थ हिंदुस्थानांत बरींच वर्षे हिंडलेले आहेत. बंगाली वगैरे कांहीं देशी भाषांचें त्यांचें ज्ञान चांगल्यापैकीं आहे आणि इतिहासकार, कादंबरीकार व अभिजात वाङ्मयाचे मर्मज्ञ टीकाकार, अशा अनेक गुणांमुळें त्यांच्या दृष्टीला व्यापकपणा आलेला आहे. त्यांचें दुसरें वैशिष्ट्य असें कीं, ते चिकित्सक असले तरी केवळ कारणपरंपरा ( Causality ) शोधित बसणारे तार्किक बुद्धिवादी नाहींत. तर त्यांच्या चिकित्सक बुद्धीच्या मागें एक प्रकारचें सूक्ष्म शहाणपण व सहृदयता आहे. आपल्या आदराच्या भावना ते जितक्या मोकळेपणानें व्यक्त करतील, तितक्याच स्पष्टपणानें आपली टीकाहि बोलून दाखवतील.

प्रो. थॉम्पसन यांनीं कांहीं दिवसांपूर्वी आकाशवाणीवरील एका व्याख्यानांतून पाश्चात्य देशांचे पूर्वेनें जें आंधळें अनुकरण सुरूं केलें आहे, त्याबद्दल खेद व्यक्त करणारे आपले विचार प्रगट केले आहेत. हें भाषण अत्यंत सुंदर, मननीय

व उद्बोधक असल्यामुळें त्याचा अनुवाद 'विविधवृत्ता' च्या वाचकांकरितां देत आहे. ]

## अखिल भारताला भीतिव्याप्त करणारा लहानगा मुलगा.

'माझें भाषण ऐकणाऱ्या प्रत्येकाला एका भयंकर संकटाची इशारत मला दिली पाहिजे. आणि तो इशारा एका लहानशा हिंदी मुलाबद्दल आहे. सरासरी ९-१० वर्षांचें त्याचें वय आहे; त्याची चालचलणूकहि मोठी मोहक आहे, आणि हा पुण्यांत राहणारा मुलगा सगळ्या हिंदी संस्कृतीचा सत्यानाश करणार आहे. मग ती हिंदी संस्कृति असो वा यावनी संस्कृति असो; शीखांची असो किंवा पारशी लोकांची असो! आणि हा सगळा सत्यानाश अवघ्या दहा वर्षांत होणार आहे!

पण हें आख्यान सांगण्यापूर्वी आज खुद्द माझ्या देशांत काय होत आहे त्याबद्दल दोन शब्द सांगतो. गेली सहासष्ट वर्षें ग्रेटब्रिटनमध्यें सक्तीचें शिक्षण सुरूं आहे. आणि म्हणून साहजिकच प्रत्येकाला वाचतां येतें. पण लगेच असा प्रश्न पुढें उभा राहतो कीं, तेथें या मौल्यवान सिद्धीचा उपयोग काय करतात? बहुजन समाजाचें वाचन कोणत्या प्रकारचें आहे? गतवर्षी या एकंदर प्रश्नाचें निरीक्षण करतांना मला असें आढळलें कीं, लोकांच्या हमेश वाचनांत येणारीं व त्यांच्या मनाची पकड घेणारीं रविवारचीं पत्रें असतात, त्यांचा प्रसार अतिशय मोठ्या प्रमाणावर होतो. त्या पत्रांची निवडक प्रसिद्धीपत्रकें पुढीलप्रमाणें असतात—

'मदनाच्या दहा आज्ञा.'

—लेखिका, मे. वेस्ट

'चटक चांदण्यांचें रोमहर्षक द्वंद्व'

'विद्युत्साहाय्यानें कसें फांशी देतात'

—लेखक, व्हायकाउन्ट ब्लॅक

'क्लार्क गेबलचे पुनश्च प्रियाराधन'

'शर्लि टेंपलचा जीवन वृत्तांत'

—लेखिका, शर्लीची आई

आतां नीट विचार केला असतां इतके भयंकर प्रश्न आज युरोपपुढें उभे आहेत; आणि धीमेपणानें पण अतिशय वेगानें आमच्यावर चाल करून

येणाऱ्या भयंकर व भयानक घटनांच्या छायेनें आम्ही व्याप्त झालों आहोंत. अंतरीची व्याकुलता आणि बाहेरील धोका यांनीं व्याप्त अशा या काळांत या वरील गोष्टी वाचून समाधान वाटेल का? यावेळीं बहुजन समाजानें आपली बुद्धि व कल्पनाशक्ति असल्या गोष्टींच्या अभ्यासांत खर्च करावी का?

आणि याच गोष्टींमुळें आज आमच्या ह्या 'सुधारणा युगा' मधील किती तरी उत्कृष्ट गोष्टींचा नायनाट झाला आहे. माहिती आणि ज्ञान ही जेवढीं चित्रपट पाहून आणि रेडिओ ऐकून मिळतील तेवढीच जो समाज मिळवील, तो समाज बौद्धिकदृष्ट्या मृत, आळशी आणि कींव येण्याइतका अज्ञ राहील. आमचे वाङ्मय आणि आमचे विचार कधींपासूनच अतिशय जलद अधोगतीला जात आहेत. इंग्लंड व अमेरिका येथील लोकप्रिय वर्तमानपत्रांत नेहमीं आढळणारे दोन शब्द म्हणजे नाट्य व प्रणय. (Drama and Romance) एखाद्या गोष्टींत एखादी बाई प्रामुख्यानें रेखाटली असली कीं, झाला तो प्रणयप्रसंग (Romance). मग ती स्त्री मूर्ख म्हणून वर्णिलेली असो, दुष्ट असो किंवा अगदींच कमी महत्त्वाची आणि कंटाळवाणी असो, पण त्यामुळें त्या गोष्टीला प्रणयप्रसंग म्हणण्यास कुठल्याहि तऱ्हेनें बाध येत नाहीं. कारण त्यांत रमणी आहे ना! जर ती नायिका आत्महत्या करील किंवा कोणाला मारील अगर स्वतःच मेलेली आढळेल, तर लगेच त्या प्रसंगाचें रूपांतर नाट्यांत होईल. असा मथळा तुम्हांला नेहमीं आढळेल: 'लंडनमधील नाट्यप्रसंग; नर्तकी एकाकी घरांत मृतावस्थेंत सांपडली.'

## पुण्यावरील संकट

श्रोते हो, आपण हिंदवासी आहांत आणि म्हणूनच आतांपर्यंत मी सांगितलेल्या गोष्टींनीं आपली मोठी करमणूक झाली असेल. कारण दुसऱ्यांच्या पापकर्मांच्या कथा ऐकण्याइतकें मजेदार असें दुसरें कांहीं नसतें. पण आतां तुमची पाळी आली आहे. पुण्यांतल्या त्या भयंकर लहानग्या मुलांविषयीं मी बोलणार आहे.

माझी त्याच्याशीं सुमारें महिन्यापूर्वी ओळख झाली. मी पुण्याहून हैद्राबादेस जात होतों आणि ह्या मुलाला—तेव्हां त्याची भयंकर वर्तणूक मला कळली नव्हती—मला कांहीं चॉकोलेट्स् विकावयाचीं होतीं; आणि

जरी मला खरोखरीच इच्छा नव्हती तरी त्याच्या चलाख आणि गोड वागणुकीनें खूष झाल्यामुळें मी एक पाकीट घेऊन त्याला त्याबद्दल बक्षिसी दिली. तरी देखील तो न जातां तेथेंच घुटमळत उभा राहिला. शेवटीं मीच कंटाळून पाहिलें तों, तो एकसारखा 'कूपन' हा शब्द उच्चारीत होता. मी पाकीट फोडून आंत सांपडलेलें कूपन त्याला दिलें. त्याबरोबर खूप आनंदून कूपनें सांठविलेलें एक भलें मोठें पाकीट त्यानें मला दाखविलें. हीं कूपनें त्यानें इंग्रज लोकांच्या गळ्यांत चॉकोलेट्स अडकवून त्यांच्याकडून मिळवलीं होतीं.

मला जरा वाईट वाटलें. माझ्या मनांत आलें, "हा लहानगा मुलगा दिवसभर खपतो कशाकरितां, तर मोफत कांहीं तरी मिळावें म्हणून. ही वृत्ति आनंददायक असते—कांहीं तरी म्हणजे एखादी सुंदर व उपयुक्त वस्तु; एखादें फाऊन्टनपेन किंवा तसें कांहीं तरी..." पण मी अगदींच चुकलों नव्हतों. थोडया दिवसांनीं एका वर्तमानपत्रांतील जाहिरात वाचतांना मला कळून चुकलें कीं, त्या मुलाला 'दुसरें कांहीं तरी' मिळवावयाचें नसून हॉलीवूडमधील सिनेमानटींचे पांच फोटो मिळवावयाचे होते. येथें क्षणभर थांबून आपण एकाग्रतेनें थोडा विचार करूं. प्रत्यक्ष काय परिस्थिति आहे याचें चित्र तुम्ही डोळ्यापुढें उभें करावें हें मला सांगावयाचें आहे. तो मुलगा कसल्या मोडक्या झोपडींत रहात असावा ह्याची तुम्हांला कल्पना असेलच. तेथें ना सोई, ना सुख. रात्रीं चॉकोलेट्स व सिगारेट्स यांची विक्री करून आल्यानंतर एका घाणेरडया रकळ्याच्या तुकडयावर तो अंग टाकतो. आणि सारा दिवसच नव्हे, तर बरीच रात्र होईपर्यंत अपरिमित राबतो व हें कां? तर सहृदय भासणाऱ्या पाश्चात्य सुंदर युवतींचीं उन्मादक स्मित असलेलीं छायाचित्रें मिळावीं म्हणून!

**चित्रपटांचें आगमन**

मी परवां जेव्हां येथें आलों, तेव्हां मला कोणी तरी सांगितलें कीं, 'गेल्या पंधरा वर्षांत हिंदुस्थानांत जर कुठलीहि घडामोड झाली असेल तर ती म्हणजे मोटर लॉऱ्यांची अपरिमित वाढलेली लोकप्रियता ही होय. त्याहून मोठी घडामोड तुमच्या आयुष्यांत होणार आहे. मोटारींनीं दूरदूरच्या खेड्यांत जाऊन मोटरच्या बॅटरीवर किंवा जसें जमेल तसें व जमेल त्या परिस्थितींत,

लोकांना सिनेमाची चटक लाविली जात आहे. सिनेमा कंपन्या सुमारें सहा वर्षांपूर्वी शंभरहि नव्हत्या. पण त्याच आज रोज एक, याप्रमाणें वाढत आहेत. आतापर्यंत सिनेमानें फक्त मोठालीं शहरें आणि त्यांतहि मुख्यतः तुमच्या-सारखा इंग्रजी जाणणारा सुविद्य वर्ग यांजवरच पगडा बसविला होता. पण पांच वर्षांचे आत सर्व हिंदुस्थानांतील खेडुताचीं मनेदेखील सिनेमानें भारावलीं जाऊन त्यांची घडण बदलणार आहे. मग ते खेडुत हिंदु, पारशी अगर इतर कुठल्याहि धर्माचे, पंथाचे अगर जातीचे असोत. तुमचें राष्ट्र हें पूर्णपणें निराळ्या प्रकारचें होणार आहे !

या सर्व घटनेंतून कोणची मनोवृत्ति निर्माण होणार आहे असा तुम्हांला प्रश्न पडेल आणि त्याचें उत्तर मघा वर्णिलेला लहान मुलगा व आमची पाश्चात्य पत्रें तुम्हांस देतील. आम्हां पाश्चात्यांना अशी एक संवयच लागली आहे कीं, आम्ही आमच्या कडील सर्व घाण मोठ्या कौशल्यानें तुमच्याकडे पाठवतों. तुम्ही सुद्धां हल्लीं हिंदुस्थानांत असे पुष्कळ चित्रपट तयार करतां कीं, जे केवळ अगदीं घाणेरड्या पाश्चात्य चित्रपटांची हिंदी वेषांतील आवृत्तीच होत ! मी अतिशयोक्ति करीत नाहीं, तर सत्य तेंच बोलत आहे. आणि विचारांतीं तुम्हांलाहि तें पटल्यावांचून राहणार नाहीं.

ह्या होणाऱ्या घडामोडीला आणि येणाऱ्या संकटाला आणखी एक बाजू आहे ह्याचा परिणाम हिंदुस्थानाबाहेरील जगावर काय होणार आहे ! मलां माहीत आहे कीं, प्रत्येक हिंदी माणसाला, मग तो एखादा संस्थानिक असो वा कॉंग्रेसवाला असो, हिंदुस्थानच्या परराष्ट्रीय कीर्तीबद्दल तीव्रतेची आत्मीय भावना असते. ही कीर्ति निदान आज तरी अतिशय खालच्या दर्जाला जाऊन पोहों-चली आहे. इतकी कीं, गेल्या शतकांत, म्हणजे मी हिंदुस्थानला आपलेपणानें ओळखूं लागल्यापासून, ती इतकी खालच्या थराला कधींच पोहोंचली नव्हती. बाहेरच्या जगांतील प्रत्येक देश जाणतो कीं, हिंदुस्थान म्हणजे जातिनिष्ठ भांडणें, अस्पृश्यता आणखी अशा एक ना दोन गोष्टी कीं ज्यांचा उल्लेख करणें मला आवडणार नाहीं. जर तुम्हीं वेळींच सावध झालां नाहींत, तर तुमचे चित्रपट, तुमची कीर्ति आणखी खालच्या दर्जाला नेतील. छापण्याच्या कलेचा शोध लागल्यानंतर सिनेमा इतका दुसरा कोणताहि महत्त्वाचा शोध लागला नाहीं. आज प्रत्येक राष्ट्राचा सन्मान चित्रपटकर्त्यांच्या हातांत आहे.

'आपला देश म्हणजे लुच्चे, ठग व बदमाश यांचें माहेरघर आहे. तेथील शिक्षणपद्धति ही पोरकट प्रेमाचे चाळे शिकविणारी आहे. अमेरिका हा देश आंधळे, दुर्वर्तनी आणि चैनी जीवनक्रमांत आयुष्याचा नाश करणारे व दुष्ट अशा तरु ांनीं भरलेला आहे,' अशी बदनामी आमच्या देशाची झाली आहे, असें म्हणून जळजळणारे अमेरिकन लोक मला भेटले आहेत. ह्याला कारण म्हणजे असली दुष्ट बदनामी जगभर पसरवणारे अमेरिकन बोलपट. जुन्या साम्राज्यवादी वृत्तीचें कित्येक इंग्रज सद्गृहस्थ व स्त्रिया मला अशी तक्रार करतांना आढळल्या आहेत कीं, 'ब्रिटिशांची इभ्रत' किंवा 'साहेबांची इभ्रत' ह्यांची किंमत अतिशय उतरली आहे. ह्याचें खापर वरील लोक चुकीचें शिक्षण आणि राष्ट्रद्रोही इंग्रज इतिहासकार आणि कादंबरीकार यांच्या माथ्यावर फोडतात.

### देशभक्तांपुढील कार्य

आज जर एखादा खरोखरीचा देशभक्त असा हिंदी कोट्याधीश असेल, तर तो काय करील हें तुम्हांला माहीत आहे ? तो आपला पैसा चित्रपट तयार करण्यांत खर्च करील आणि त्या चित्रपटाच्या द्वारें सर्व जगाला तो या भारत चा माहिती करून देईल. तो देश अस्पृश्यता, बालविवाह जाती-वैमनस्य वगैरे कलहांनीं पीडलेला नसून ज्यामध्यें ह्या वैविध्यपूर्ण देशाचें सौंदर्य आणि त्याच्या संस्कृतींतील व परंपरेतील उदात्ततम गोष्टी चित्रित केलेल्या असतील. मात्र हे चित्रपट तंत्रदृष्ट्या अत्यंत वरच्या दर्जाचे असले पाहिजेत. आपणांला असे चित्रपट मिळतील कीं, ज्यामुळें ह्या देशाला इंग्लंडांतील उत्तमोत्तम स्तुत्य गोष्टींची चांगली कल्पना येऊं शकेल. त्याच-प्रमाणें जर इंग्लंडलादेखील हिंदुस्थानांतील जें जें म्हणून उत्कृष्ट आहे त्याची चांगली कल्पना येईल, तर नुसतें हिंदुस्थान किंवा नुसतें इंग्लंड एवढ्यांचीच नव्हे, तर साम्राज्याची, किंबहुना सर्व जगाची केवढी मोठी सेवा होणार आहे बरें !

पण तें शक्य नाहीं. हिन्दी स्त्री-पुरुषांनो, मला तुमच्याबद्दल अत्यंत आदर व प्रेम वाटतें. पण माझ्या सव्वीस वर्षांच्या अनुभवानंतर मला कळून चुकलें आहे कीं, आम्हां इंग्लिश किंवा अमेरिकन लोकांपेक्षां तुमच्याजवळ जास्त सूज्ञपणा नाहीं. जेव्हां मी प्रथम युरोप सोडून हिंदुस्थानांत येण्यास निघालों,

तेव्हां मला वाटलें कीं, वेड्यांच्या इस्पितळांतून माझी सुटका होत आहे. पण त्यांतून मी सुटलों नव्हतों ! तर केवळ एका वेड्यांच्या इस्पितळांतून दुसऱ्या इस्पितळांत माझी बदली झाली होती ! माझ्या सभोंवार प्रत्येक ठिकाणीं सनातनी आणि अस्पृश्य यांचे वाद चालू आहेत; हिंदु, शीख व मुसलमान, सनातनी आणि सुधारक यांच्या सभा आणि समित्या यांचे गोंधळ चालू आहेत.

मध्यंतरीं तुम्ही सुधारणेच्या शेवटच्या दशकांत प्रवेश करीत आहांत. ज्यावेळीं तुम्हीं वादविवादांत गढलेले आहांत, त्यावेळीं एक लहान मुलगा पुण्यांत मोठा होत आहे; आणि तोच तुम्हां सर्वांच्या भवितव्याला धक्का देणार आहे. तो हिंदू व मुसलमान या दोन्ही संस्कृतींचा संपूर्णपणें नाश करणार आहे.

[वरील व्याख्यानावरून मी अनुवादाच्या आरंभीं प्रोफेसर मजकुरांसंबंधीं केलेल्या विधानाची सत्यता 'वृत्ता'च्या वाचकांना पटेल अशी आशा आहे. मी हें जाणून आहें कीं, वरील व्याख्यानांतील सर्वच विचार व अनुमानें सर्वांनाच पटतील असें नाहीं. त्यांत थोडासा कडकपणा व कडवटपणाहि आहे. पण त्या सर्वांच्या पोटीं मानवजातीबद्दल अपरंपार प्रेम, सद्भिरुचि इत्यादि सद्गुण दडलेले आहेत आणि म्हणूनच अशा सत्प्रवृत्त, परधर्मीय व परदेशीय विद्वानाबद्दलचा आदर द्विगुणित होतो.]

—विविधवृत्त, ५ सप्टेंबर, १९३७

## गूढनिरास ४

‘ कसलं ग पुस्तक तारे ? ’ शांतानें विचारलें.

‘ Intelligent Woman's Guide to Socialism ’ तारेनें उत्तर दिलें.

‘ आपल्या कॉलेजच्या लायब्ररींतूनच आणलंस ना ? ’

‘ हो, हें आतांच आणतें आहे. ’

‘ आश्चर्य आहे बाई ! साडेचाराच्या पुढें तुला आबा पुरंदऱ्यांनीं पुस्तक दिलं म्हणजे मोठं नवलच म्हणायचं !’

‘ कां ग, आश्चर्य कसलं त्यांत ? ’

‘ अग पुस्तकं साडेचारनंतर मिळत नाहींत. आणि त्यानंतर आबांनीं कोणाला पुस्तक दिल्याचं उदाहरण अलीकडे तरी कोणाला माहीत नाहीं. कांहीं कॉलेजांतून मुली म्हणून कांहीं सवलती मिळत असतील पण आबांच्या-जवळ मुलांमुलींसाठीं एक कायदा. म्हणून मी म्हणतें कीं, तुला कसं पुस्तक मिळालं ? तुला कांहींच म्हणाले नाहींत ते ? ’

‘ मी पुस्तक मागितलं तेव्हां गृहस्थानं कांहींच उत्तर दिलं नाहीं. डोकं टेबलावर टेकून आपल्याच तंद्रींत बसला होता. म्हणून मीं पुन्हां म्हटलं कीं, साडेचारपर्यंत प्रॅक्टिकल चाललं होतं म्हणून यायला वेळ लागला. तेव्हां त्यांनीं एकदम चमकून माझ्याकडे पाहिलं व पहिल्या झपाट्याला ‘ नाहीं ’ म्हणाले; पण पुढच्याच क्षणीं त्यांना काय वाटलें कोणास ठाऊक. लगेच ‘ थांबा, देतो हं ’ असें म्हणून स्वतः उठून त्यांनीं हें पुस्तक काढून दिलं. या चक्रमपणाचें मला जरा आश्चर्यच वाटलं. पण पुस्तक मिळाल्याच्या आनंदांत त्यावर फारसा विचार न करितां मी रिसीटबुकावर सही करायला खालीं वाकले. सही करून टांक ठेवतांना वर मान करतें तों पुरंदरे ड्रॉवर-

मधला एक फोटो काढून त्याकडे निरखून पहात होते. मला बाई त्यांच्या त्या चक्रमपणामुळें हंसूं आवरेना म्हणून मी झटकन् तिथून निघून आले.

'हो बाई, आपल्या कॉलेजातलीं मुलं नेहमीं गमतीनं म्हणतात कीं, ड्रॉवरमध्यें आपल्या आबांच्या प्रियतमेचा फोटो आहे म्हणून. तिनें दिल्यान् यांच्या हातावर तुरी. तेव्हांपासून आबा असे तिरसट झाले आणि आतां दिवसभर त्या फोटोकडे पाहूनच आपल्या जिवाचें समाधान करून घेतात.' शांता हंसत पुढें म्हणाली, 'तूं तर त्यांच्या प्रियेसारखी दिसत नाहींस ना ? संभाळ हो, नाहींतर तुलाच ते प्रिया समजायचे. करतां काय ! म्हातारचळ लागला म्हणजे बुद्धि फिरते म्हणतात.'

'चल चावट कुठली !' तारा म्हणाली.

'पण शांते, मला वाटतं, मुलं म्हणतात त्यांत फारसं तथ्य नसावं. आपण बघूं प्रयत्न करून कांहीं सुगावा लागतो का तो.'

* * *

वरील प्रसंगानंतर आठदहा दिवसांतली गोष्ट. शनिवारचा दिवस होता. साडेचारचा सुमार असेल. कॉलेजांत आंत क्वचितच विद्यार्थी दिसत होते. इतक्यांत शांता आणि तिची मैत्रीण लेडीज् चेंबरमधून बाहेर पडल्या त्या थेट लायब्ररीपाशीं आल्या. शांता पुढें गेली व तारा थोड्या अंतरावर आबांच्या दृष्टीआड उभी राहिली. शांतेनें एक कसलें तरी पुस्तक मागितलें व आबांनीं ठरल्याप्रमाणें 'आतां नाहीं,' म्हणून उत्तर दिल्यावर ती तेथून परत आली. आणखी पांच मिनिटांनीं तारा एकटी तेथें गेली व तिनेंहि पुस्तक मागितलें. तिचा आवाज ऐकल्यावर आबांच्या तोंडून नेहमींप्रमाणें 'आतां नाहीं' हे उद्गार बाहेर पडले नाहींत; त्यांनीं तिच्याकडे बघितलें आणि लगेच विवक्षित ड्रॉवर उघडून किल्ल्यांचा जुडगा काढून तिच्यापुढें टाकला. पण तो ड्रॉवर बंद करण्यापूर्वी क्षणभर त्यांतल्या त्या फोटोकडे बघितलें व तो बंद करतांना एक दीर्घ उसासा टाकला. हें मात्र तारेच्या लक्षांत आल्यावांचून राहिलें नाहीं. आणि किल्ल्या घेऊन ती पुस्तकाच्या कपाटाकडे गेली, तेव्हां देखील त्याच्या नजरेंत कारुण्याची छटा चमकून गेलेली कशी दिसली आणि तो उसासा देखील कसा दुःखपूर्ण वाटला याचाच विचार ती करीत होती. पण हें सर्व अवघ्या दहापांच सेकंदांत झालें.

'तुम्हांला हवं असलेलं पुस्तक त्या पांच नंबरच्या कपाटात असेल' असें किल्ल्या घेऊन कपाटांच्या भागांत जाणाऱ्या तारेला उद्देशून आबा म्हणाले, आणि मग दोन्ही हात पुढें टेबलावर ठेवून व त्यांत डोकें खुपसून ते स्वस्थ बसले. त्यांच्याकडे त्या वेळीं बघितल्यावर त्यांना खरोखरच कांहीं मोठें मानसिक दुःख होत असावें, असें तारेला वाटल्यावांचून राहिलें नाहीं. आणि तें कळून घ्यावयाची तिची उत्कंठा मग जास्तच तीव्र झाली. पण जरी तिला खात्री नव्हती तरी आणखी पाच दहा मिनिटांतच तिच्या मनातील गूढाचा निरास होणार होता.

ती पुस्तक पाहात होती तेवढ्यांत शांता आंत शिरली व तारेकडे जातांना आबांना ऐकूं जाईल एवढ्या मोठ्या आवाजांत म्हणाली, 'तारे, तुझ्या बाबतींत नियम लागूं नाहींत वाटतं ? मला वाटतं साडेचार वाजून गेले.' तिचा आवाज ऐकून आबांनीं वर बघितलें. हा टोमणा आपल्याला उद्देशून आहे, हें त्यांनीं ओळखलें. पण कांहींच न बोलतां ते नुसते थोडेसें हंसले. शांताच्या अज्ञानाची जणूं कांहीं त्यांना कींव वाटत होती. इतक्यांत किल्ल्या परत करायला आणि पुस्तक नांवावर लिहून घ्यायला तारा व तिच्या बरोबर शांता तेथें आली. तारेकडे व शांतेकडे पाहात 'तुम्हांला जर पाच मिनिटें वेळ असेल तर बसा तेथें' असें म्हणून त्यांनीं समोरच्या दोन खुर्च्यांकडे बोट दाखविलें. त्या दोघींना मनांतून उत्सुकता होतीच. व आज याचा थांग लागला तर पाहावा म्हणूनच त्यांनीं हा बेत योजिला होता. तो इतका सहजतेनें सफल होणारसें पाहून मनांतून अत्यंत आनंदून पण बाहेरून अगदीं सहज भासेल अशा रीतीनें 'आहे कीं वेळ' असें म्हणून त्या बसल्या. परंतु कधींहि न बोलणारा गृहस्थ आज कसा बोलला याचें त्यांना मनांतून अत्यंत आश्चर्य वाटत होतें.

इतक्यांत ड्रॉवरमधून ज्यासंबंधीं सर्वांना अत्यंत गूढ पडलें होतें, असा तो फोटो, त्यांनीं बाहेर काढून शांतेपुढें ठेवला. 'या फोटोंतल्या मुलीमध्यें आणि यांच्यांत कांहीं साम्य तुम्हांला दिसतं कां ?' तारेकडे निरखून पाहात ते म्हणाले. तो फोटो उचलून दोघींहि त्याकडे उत्सुकतेनें पाहूं लागल्या.

'अगबाई, ही दुसरी ताराच दिसते आहे!' शांता म्हणाली. तें साम्य पाहून तारेलाहि गंमत वाटली.

त्यांच्याकडून फोटो घेऊन त्याकडे पाहात आबा म्हणाले, ' आतां सांगायची गोष्ट म्हणजे येवढीच कीं, हा फोटो माझी मुलगी विमल हिचा आहे. कॉलेजांतले विद्यार्थी म्हणतात त्याप्रमाणें माझ्या प्रियतमेचा नव्हे.' त्यांच्या आवाजांत त्या वेळीं किंचित् तिरस्काराची छटा होती. पुढच्याच वाक्यांत ही छटा नाहींशी झाली.

' विमल माझी एकुलती एक पोर. तिच्यावर माझें अत्यंत प्रेम होतें. पत्नी वारल्यापासून मी असा एकलकोंड्या स्वभावाचा बनलों. पण विमल माझा विरंगुळा होती. नंतर ती सुद्धां सोडून गेली मला ! अवघी तेरा वर्षांची पोर होती. एक दिवस एकाएकीं साधा ताप आल्याचें निमित्त झालें, आणि म्हणतां म्हणतां चार दिवसांत मुलगी देवाघरीं गेली. आईला भेटायची ओढ लागली असेल तिला ! चांगलीं सात आठ वर्षें झालीं या गोष्टीला. पण विमल अजून डोळ्यासमोर आहेशी वाटते. विमलची आई गेल्यानें झालें नाहीं, इतकें दुःख माझी विमल देवानें नेल्यानें मला झालें; पण त्याला कांहीं उपाय नाहीं. दैवाधीन गोष्टी या !' इतकें बोलतांच त्यांच्या डोळ्यांतून दोन टिपें गळालीं. खोकायचें निमित्त करून खालीं मान घालून त्यांनीं तीं पुसलीं. ' कॉलेजांत अर्थात् ही गोष्ट कोणाला ठाऊक नाहीं. खोट्या गोष्टीच नेहमीं जगांत लवकर पसरतात. दुसऱ्यांचीं दुःखं हीच मुळीं ज्या जगाची करमणूक त्या जगाबद्दल कसलें वाटणार मला प्रेम !'

' विमल गेल्यापासून तर मी जास्तच त्रासिक बनलों, आणि तेव्हांपासून मी हा असा चमत्कारिक वागतों. माझा शुष्क आणि उदासीन चेहरा, कपाळाला आठ्या, त्रासिक स्वभाव, याचा झाला ना खुलासा ? आतां तुम्हांला कां पुस्तकें दिलीं, त्याचें कारण तुम्ही जरी थोडेंसें कल्पनेनें जाणलें असलें तरी सांगतों. मला वाटतें, तुम्ही या कॉलेजांत नवीन आलांत. प्रथम जेव्हां तुम्ही पुस्तक मागितलें त्या दिवशीं मी विमीच्या मनोमय मूर्तीच्या चिंतनानें स्वतःची करमणूक करून घेत होतों. तुमचा आवाज मला तिच्या आवाजासारखा वाटला, म्हणून मी चमकून वर पाहिलें. मी विमलचें स्मरण करायला व देवानें माझी विमल माझ्याकडे पुन्हां पाठवायला एकच गांठ पडली, असें मला वाटलें; आणि आपली विमल जरी देवानें हिरावून नेली असली, आणि त्याच देवाचे जगांतील तिची जिवंत प्रतिमा; प्रत्यक्ष कन्या

म्हणण्याचें भाग्य नसलें तरी ती दृष्टीस पडायचें भाग्य तरी लाभावें या हेतूनें मी तुम्हांला पुस्तकं देत आलों. तुमच्याकडे बघितल्यानें आणि तुमच्याशीं बोलल्यानें मला विमलच्या संगतीचा अंशमात्र लाभ घडतो असें वाटतें. त्या मनःस्थितींत त्यावेळीं आणि नंतर तुम्हाला जीं पुस्तकें दिलीं तीं लायब्रेरिअननें दिलीं नाहींत, तर विमलच्या वडिलांनीं दिलीं; समजलांत ना ? त्या क्षणिक सुखाच्या भासाकरितां का होईना, पण मी जर माझी कठोर वागणूक सोडली, माझा स्वभाव, माझे नियम विसरलों, तर ती मोठ्या नवलाची गोष्ट ठरण्याइतका कां तो सुखाभास कमी किंमतीचा, हीन आहे ? पण या गोष्टी जगाला कशा कळायच्या; आणि खरें कळण्याची जगाला तरी कुठें फिकीर असते ! मला यांचेजवळ एकदां खुलासा करावयाचा होताच, आणि तुम्हालांहि उत्सुकता दिसली; म्हणून सांगितलें इतकेंच.' एवढें भराभर बोलून आबा एकदम थांबले व फोटोकडे बघूं लागले. शब्दांचा ओघ थांबला. पण भावनेचा आवेग कुठें ओसरला होता; एका क्षणांत त्यांच्या मनांत किती विचार येऊन गेले असतील देव जाणे ! पुढल्याच क्षणीं त्यांच्या हातांतला फोटो गळून पडला, डोळे भरून आले आणि त्यांनीं दोन्ही कोपरें टेबलावर टेकून हातांच्या तळव्यावर खिन्न मनानें मस्तक टेकलें.

मनांतील कुतूहलाचें निरसन करून घेण्यास गेलेल्या त्या दोन मैत्रिणींनीं कालवलेल्या मनानें तें दृश्य बघितलें तेव्हां त्यांचेहि डोळे ओले झाल्याखेरीज राहिले नाहींत.

—वाङ्मयशोभा, सप्टेंबर १९३९

# विनायक दामोदर सावरकर ५

कुणी थोर साहित्यिकानं ' नांवांत काय आहे ' असा प्रश्न एकदां उपस्थित केल्यानंतर आजतागायत अनेक प्रसंगाचे निमित्तानें अनेकांनीं या वादाचा पूर्वपक्ष व उत्तरपक्ष केला आहे. इतका काथ्याकूट करूनही हें ' कलगी तुऱ्या 'चं भांडण निकालांत निघालेलं नाहीं. आज मलाही या वादाचा उत्तरपक्ष करायची लहर आलेली आहे.

' नांवांत कांहीं नाहीं ' असें कुणालाही वाटत असो, मला तर नांवांत किती तरी गोष्टी दिसतात. चांगलीं नांवं तर राहोतच, पण एखाद्या दगड्या अगर धोंड्या या नांवामागेंही असा इतिहास आढळतो. सुरेख नांवाचं मूल आपल्याला लाभत नाहीं असा जुन्या काळच्या आईबापांना अनुभव आला कीं, मुलाचें नांव वरीलप्रमाणें ' दगड्या' अगर तत्सम ठेवीन, असा ते नवस करीत. हा इतिहास कळला कीं, त्या नांवांतही आपल्याला केवढा सुंदर अर्थ दिसूं लागतो. आतां मग इतर नांवांचं विचारायलाच नको. नांवांत जर जगाला कांहींच अर्थ न वाटता, तर नुसते क्रमांक देऊनही जगानें नड भागवली असती. निदान एक गोष्ट खास कीं, मुलाचें पाळण्यांत घालून नांव ठेवतांना वडील माणसांच्या मनांतील सगळ्या नाजूक आणि स्नेहाळ भावना जागृत झालेल्या असतात. आणि त्या नांवामागें वात्सल्याच्या मधुर भावनेबरोबरच कुलदेवता अगर कुलपुरुष यांचें स्मरण कृतज्ञता बुद्धीनें गोंवलेलें अनेकदां आढळतें.

पण हें सर्वसाधारण नाममहात्म्य झालें. कांहीं नांवें अशींही असतात कीं, नांवें धारण करणाऱ्या व्यक्तींच्या पराक्रमानें त्या नांवांना कांहीं निराळाच गौरव प्राप्त होतो. आणि मग तें नांव उच्चारतांच त्या व्यक्तीचें कर्तृत्व

आपल्या मनःचक्षूंपुढें उभे राहतें. ' तिळा उघड ' म्हणतांच अरेबियन नाइट्समधील तें विवक्षित वैभवभांडार ' अलीबाबा ' च्या समोर सताड उघडलें गेलें, त्याप्रमाणेंच असें नांव उच्चारतांच त्या व्यक्तीनें गाजवलेली कर्तबगारी आणि निर्माण केलेला इतिहास आपल्या डोळ्यांसमोर साक्षात् उभा राहतो, आणि मग अशा प्रत्येक प्रसंगीं त्या नांवाचा गौरव अधिकाधिक वाढीस लागतो.

असा लौकिक प्राप्त झालेलीं आज जीं कांहीं थोडीं नावें आपल्या कानांवर आहेत त्यात विनायक दामोदर सावरकर हें नांव निश्चित आहे. थोरांच्या नावाला एखाद्या उपपदाचें बाशिंग बांधायची जनमनाला संवय असते व त्यात गैर कांहींच नसलें तरी मला मात्र असल्या कुठल्याही उपाधीपेक्षां तें साधेंसुधें नांवच उच्चारायला मनापासून आवडतें. मला वाटतें की बॅरिस्टर, डॉक्टर किंवा त्याहून अधिक अशी वीर, किंवा स्वातंत्र्यवीर अशी कुठलीही उपाधि लावून त्या व्यक्तीचें मोठेपण केवळ एकागी आहे असा अभास आपणच उत्पन्न करतो आणि तोच अनिष्ट आहे. सर्वपल्ली राधाकृष्णन् यांचेंच उदाहरण घेतलें तर हें लक्षांत येईल. या विद्वान् गृहस्थाचा मोठेपणा त्याच्या पायाशीं लोळणाऱ्या कुठल्याहि ' डॉक्टरेट् ' मध्यें नाहीं. किंवा सरकारनें दिलेल्या ' सर ' पदवींतहि नाहीं. या सर्व उपाधी अगदीं क्षुल्लक नव्हेत; त्यांनाहि त्यांचे परीनें महत्त्व आहे. पण राधाकृष्णन् हे इतके मोठे आहेत कीं, त्यांचें मोठेपण, त्यांचीं सगळीं बिरुदें क्षुल्लक वाटायला लावण्याइतकें तेजस्वी आहे. एस्. राधाकृष्णन् हें नांव उच्चारतांच ज्या श्रीशंकराचार्योची कीर्ति आजवर ऐकत होतो तेच आधुनिक काळांत आधुनिक स्वरूपांत अवतरले आहेत कीं काय असें वाटूं लागतें. गाढ विद्वत्तापूर्ण, अमोघ, पण अत्यंत सहजस्फूर्त अशा वक्तृत्वाचा लाभ या लहानशा मूर्तीनें साऱ्या जगाला करून देऊन त्या ज्ञानगंगेचे मधुघट भरभरून साऱ्या मुमुक्षूंना आकंठ तृप्त केलें. या दिगंतकीर्ति माणसाचें नांव कुठल्याहि विशेषणांच्या सोनेरी बेड्यांनीं जखडून टाकण्यापेक्षां सर्वपल्ली राधाकृष्णन् या नांवानें त्यांना संबोधण्यानेंच त्यांचा खरा गौरव होतो असें मला वाटतें.

तीच गोष्ट मला सावरकरांबद्दलहि सांगावयाची आहे. अभिनव भारता-

सारख्या चळवळीचे सूत्रधार, धिंग्राचा निषेध करणाऱ्या सभेंत छातीठोकपणें त्या सभेचा निषेध करणारा निर्भय देशभक्त, बोटींतून गुप्त होऊन फ्रान्सचा किनारा गांठणारा साहसी वीर, आंतरराष्ट्रीय कायद्याचा पहिल्याप्रथम आधार घेऊन, माझा खटला या कोर्टाला चालविता येत नाहीं असें छातीठोकपणें सांगून मतलबी कायद्याचीं लक्तरें जगाच्या वेशीवर टांगणारा बुद्धिवान् कायदेपंडित, अंदमानच्या अंधेरींतहि देशहिताचा ध्यास न सोडतां प्रतिभासंपन्न काव्यें रचून स्मरणपुटींत ठेवतां ठेवतां राजकारणाचें अनुसंधान कायम राखून पहिल्या महायुद्धाच्या वेळींच सैनिकीकरणाचा आदेश देणारा महान् मुत्सद्दी, रत्नागिरीच्या अर्ध्या तुरुंगवासांतही हिंदु समाजांतील दुष्ट रूढींचीं बंधनें तोडून टाकण्याकरितां आणि हिंदुधर्मावरील अस्पृश्यतेचा कलंक धुऊन टाकण्याकरितां जिवाचा आटापिटा करणारा खरा बुद्धिवादी समाजसेवक, बंधमुक्त झाल्यानंतर लोकप्रियता पायांशीं लोळत येत असतांही वाहत्या धारेच्या विरुद्ध जाऊन ' याल तर तुमच्यासह ' हा महामंत्र देऊन मुस्लीम अनुनयाची आमच्या अंगवळणीं पडलेली खोड नाहींशी करण्याकरितां देशबांधवांचा विरोध पत्करूनही झगडणारा खंबीर पुरुष, हीं जीं सावरकरांनीं आपलीं अनेक वैशिष्ट्यें निरनिराळया प्रसंगीं प्रकट केलीं त्या सर्वांचें एकदम दर्शन तुमच्या मनाला घडविण्याची ताकद कुठल्याहि विशेषणांत नाहीं. पण तें सामर्थ्य आज विनायक दामोदर सावरकर या नांवाला प्राप्त झालेलें आहे. ज्या ज्या वेळीं या थोर पुरुषानें कांहीं कर्तबगारी गाजविली त्या त्या वेळीं या कर्तृत्वाचा कर्ता विनायक दामोदर सावरकरच हें आपणांस कळत गेलें. आणि असे प्रसंग पुनः पुनः आल्यानें त्या नांवाला आपल्या दृष्टीनें प्रत्येक वेळीं नवें महत्त्व आणि नवा लौकिक प्राप्त होत गेला. पाणिनीच्या सूत्रांत संस्कृत वाङ्मयाचें सारें व्याकरण गोंवलेलें आहे असें म्हणतात. त्याचप्रमाणें कर्तृत्ववान् पुरुषांच्या जीवनाचा इतिहास त्यांच्या आयुष्यांतील निरनिराळ्या उदात्त घटनांत सामावला असला तरी अखेरीस त्या सर्व घटना अगदीं थोडक्यांत सामावण्याचें सामर्थ्य त्यांच्या नांवासच प्राप्त होतें आणि म्हणूनच तें नांव उच्चारतांच तो सगळा उज्ज्वल इतिहास आपल्या डोळ्यांसमोर उभा राहतो.

आज २८ मे १९४६ या दिवशीं सावरकरांना ६३ वें वर्ष पूर्ण होत

आहे. नुकतेंच जिवावरच्या दुखण्यातून ते उठले आहेत. वास्तविक गेल्या थोड्या महिन्यांत हिंदी राजकारणांत महत्त्वाचे बदल घडत आहेत. अशा वेळीं त्याच्या तात्कालिक मार्गदर्शनाची देशाला गरज होती, पण गेल्या सात आठ वर्षांतील अति-श्रमानें शेवटीं त्यांचा विकार अनावर होऊन गेले कांहीं महिने त्यांना दुखण्यानें अंथरुणास खिळवून ठेविलें होतें. आपल्या सुदैवानें ते काळाच्या दाढेंतून पुनः परत आले आहेत. तरी देखील त्यांचें प्रकृतिमान व वय लक्षांत घेतां धकाधकीच्या राजकारणांत ते भाग घेऊं शकतील असें वाटत नाहीं. आणि त्यांनीं तो घेऊंहि नये. राजकारणाच्या वेगापेक्षां राजकारणाचा कोलाहल हल्लीं इतका विलक्षण वाढला आहे कीं, त्या धुमाळींत कोणाची किंमत केव्हा वधारेल वा केव्हां घटेल याला नियम राहिला नाहीं.

पण या कोलाहलापलीकडील राजकारण वेगळें आहे हें ज्यांना समजतें, ज्यांचा राष्ट्रवाद हा सामुदायिक स्वार्थाहून मोठा आहे, जे क्षणिक कीर्ति-दुष्कीर्तीनें फुलणारे अगर घाबरे होणारे नाहींत, त्यांना सध्याच्या परिस्थितींतहि सावरकरांच्या थोरवीचें विस्मरण होणार नाहीं. सूर्य अस्ताचलास जाण्यापूर्वी एखाद्या पर्वताआड जाऊन दृष्टिआड झाला असला, तरी सोनेरी कडा प्राप्त झालेले हे ढग त्या सूर्याच्या तेजानेंच प्रकाशमान झालेले आहेत हें जाणत्याला समजतें. त्याचप्रमाणें आजच्या राजकारणांतहि ज्या गोष्टींना भाव प्राप्त झाला आहे तोहि सावरकरांच्या तत्त्वप्रणालीच्या तेजानेंच आलेला आहे, हें विचारवंतांना मान्यच करावें लागेल. नुकतीच तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांनीं सावरकरांना डोंगराआड झालेल्या ताऱ्याचीच उपमा दिली होती ती याच भावार्थानें. हिंदूंचें संघटन, हिंदु तरुणांचें सैनिकीकरण, शुद्ध हिंदी हीच राष्ट्रभाषा आणि नागरी हीच त्या भाषेची लिपी हा शास्त्रशुद्ध आग्रह, अखंड भारताचा पुरस्कार इत्यादि त्यांनीं आग्रहानें प्रचारिलेल्या गोष्टी आज प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष लोकमान्य पुढाऱ्यांनीं पत्करलेल्या आहेत. हिंदी संमेलनांत टंडनजी आणि श्री. मुनशी यांनीं पत्करलेलें धोरण आणि गांधीजींची केलेली उचलबांगडी, ज्या सुभाषबाबूंनीं मिळविलेले एक लाख रुपयेदेखील ब्रिटिश कोर्टाच्याच साहाय्यानें त्यांना लाभूं दिले गेले नव्हते, त्यांच्याच आझाद-सैनिकांकरितां लाखों रुपये खर्चून त्यांचे खटले लढवून त्यांच्या राष्ट्रीय वृत्तीचा केलेला जयजयकार, हिंदु सभेला हिणवण्याकरितां का होईना अखंड भारताचा जयजयकार करून

आणि 'भारत अखंडच राहील' असें हिंदु मतदारांना आश्वासन देऊन जिंकलेल्या निवडणुकी आणि सरतेशेवटीं स्वतःच्याच मुस्लीम अनुनयाचा तिटकारा येऊन अजूनहि तडजोड होत नसेल तर आतापर्यंत दिलेल्या सवलतीहि केवळ तडजोडीकरितांच—न्याय म्हणून नव्हे—मान्य केलेल्या असल्यामुळें यापुढें आमच्यावर बंधनकारक राहणार नाहींत, असें खणखणीतपणें बजावण्याइतकी झालेली प्रगति, हा सर्व सावरकरांच्या शास्त्रशुद्ध तत्त्वप्रणालीचाच विजय होय. त्यांनीं आपल्या अमोघ वाणीनें केलेल्या प्रचारामुळें जनमनाला जे धक्के बसले आणि जें वळण लागूं लागलें त्याची जाणीव तत्त्वतः त्यांच्या विरुद्ध असलेल्या पुढाऱ्यांना वेळींच झाल्यामुळें आणि त्यांची संघटनेचीं साधनें उमाप असल्यामुळें, त्या पुढाऱ्यांनीं त्याचा फायदा घेऊन आपलें वर्चस्व कायम टिकविलें. पांच वर्षांपूर्वी एका व्याख्यानांत सावरकरांनीं जें वाक्य उच्चारलें त्याची आठवण झाल्याशिवाय रहात नाहीं. आपल्या तीक्ष्ण बुद्धीनें त्या वेळच्या निरनिराळ्या राजकीय वादांतील फरक सांगून शेवटीं ते म्हणाले होते, 'माझें म्हणणें खोटें ठरलें तर मी वेडा ठरेन, पण माझें म्हणणें खरें झालें—आणि ते होणारच आहे—तर मात्र प्रॉफेट ठरेन मीच.'

आज हिंदुसभा मोडकळीस आलेली असली—या व्यावहारिक पराभवाचा विचार सभावाल्यांनीं अंतर्मुख होऊन करावा, तो आम्हांस येथें कर्तव्य नाहीं—आणि सावरकर ही व्यक्ति राष्ट्रीय क्षितिजावर स्पष्ट दिसत नसली तरी १६ मे च्या सरकारी घोषणेपर्यंतच्या राजकारणाचा आणि पाकिस्तानच्या कल्पनेचा अत्यंत स्पष्टपणें विचार करतां—आजहि हा तारा क्वचित् दृष्टिआड झाला असला तरी स्वतःच्या तेजानें तळपत असल्याची कोणाहि विचारवंताची खात्री पटेल. सावरकरांच्या ६४ व्या जन्म-दिवशीं त्यांच्या नांवाचें स्मरण होताच या सगळ्या गोष्टी मनासमोर यथाक्रम येतात. आणि मग वाटतें कीं, या इतक्या थोर पुरुषाला कुठलेंहि पक्षभेदमूलक किंवा एकांगी विशेषण न लावतां म्हणावें कीं, परमेश्वराचे कृपेनें विनायक दामोदर सावरकर दीर्घायुषी होवोत आणि त्यांच्या तत्त्वप्रणालीच्या अखंड तेवत्या दीपस्तंभाच्या दर्शनानें आमच्या राजकारणाची नौका त्यांच्या हयातींत सुखरूपपणें किनाऱ्याला लागो.

—वाङ्मयशोभा, जून १९४६

---

# महात्म्यांचें भाग्य ६

हरीपुरा काँग्रेस भरण्याच्या सुमाराची ही हकीकत आहे. हातांत वर्तमानपत्र पडलें कीं, हरीपुराची बातमी हुडकायची विलक्षण उत्सुकता असे. एक दिवस दुपारीं जेवण झाल्यावर हातांत टाइम्स घेऊन आराम-खुर्चीवर पडलों होतों. अगदीं अधीरतेनें काँग्रेसनगराची बातमी काढली. त्या दिवशीं हरीपुऱ्यास एका प्रदर्शनाच्या उद्घाटनप्रसंगीं गांधीजींनीं केलेलें हृदयस्पर्शी भाषण टाइम्समध्यें आलें होतें. टाइम्सचा रिपोर्ट इतका सुंदर होता कीं, जणुं काय तें भाषण इंग्रजीमध्यें प्रत्यक्ष कानांनीं आपण ऐकत आहों असेंच क्षणभर वाटलें. त्यांतूनहि विठ्ठलनगराची रसभरीत वर्णनें इतक्या वेळां वाचली होती कीं, क्षणभर आपण विठ्ठलनगरांतच असून श्रोत्याचें काम करतों आहों असा कल्पनेशी चाळा करायला कांहींच हरकत नव्हती.

महात्माजींचें भाषण खरोखरच हृदयाला पीळ पाडणारें होतें. दोन मंत्रिमंडळांनीं नुकताच राजिनामा दिला होता. त्याचा उल्लेख करून महात्माजी म्हणाले, “मंत्र्यांनीं लोकांच्याकरितां अधिकार स्वीकार केला. आज ते आमच्यांत परत आले आहेत. त्यांना परत यावें लागलें याचा अर्थ त्यांच्या पाठीमागें जनतेची पुरेशी शक्ति नाहीं.” नंतर जनतेसंबंधीं बोलतांना ते म्हणाले कीं, ‘आज वीस वर्षे मी घसा फोडून ‘खादीचें तत्त्वज्ञान’ सांगत आलों आहें, पण तें अजून आचरणांत आणणारे अनुयायी मला मिळत नाहींत. लाखों लोक ज्या वेळीं खादीनिष्ठ होतील त्या वेळीं जनतेचें बळ वाढेल. आणि मग स्वराज्य फार दूर नाहीं. ज्यावेळीं मी ‘तुम्ही खादीनिष्ठ व्हा’ म्हणतो त्या वेळीं नुसती वरकरणी खादी वापरणारे अनुयायी मला नको

असतात. तर खादीच्या मागें दडलेल्या सत्य, त्याग, सेवादि तत्त्वांचें पालन करणारे अनुयायी मला पाहिजे असतात." अशा आशयाचें भाषण करून शेवटीं ऐकणाऱ्याच्या मनाला परमावधीची विषण्णता आणणाऱ्या करुणोत्कट स्वरात ते उद्गारले, 'माझ्या मरणानंतर तुम्ही मला अग्नि द्याल आणि मजबरोबर माझ्या या खादीच्या तत्त्वज्ञानालाहि तुम्ही काडी लावाल!'

मी गांधीजींचा अनुयायी नाहीं. खादीभक्त तर नाहींच नाहीं. पण तें भाषण इतकें सुंदर होतें कीं, खरोखरच मला त्या वेळीं गांधीजींच्या अनुयायांचा अगदीं राग आला. येवढ्या थोर पुरुषाच्या सान्निध्यांत इतकीं वर्षें राहून व त्याच्या तत्त्वज्ञानाचा साऱ्या जगाला हरघडी उपदेश करीत राहून याना स्वतःला मात्र तें तत्त्वज्ञान मुळींच आकलन न झाल्याचें प्रशस्तीपत्र त्याना गांधीजींकडून मिळावें याचा अर्थ काय? त्यांचे अनुयायी अडाणी आहेत कीं लबाड? कीं तें तत्त्वज्ञानच इतकें अवघड आहे कीं कुणालाच तें आचरता येऊं नये! साम्राज्यशक्तीला काहीं काळ भिववून टाकणारा, एका प्रचंड देशांतील राजकीय चळवळीचीं सूत्रें एकटा संभाळणारा, तपस्वी, कर्मयोगी अशा पुरुषानें जिवाची वीस वर्षें आटापीट केल्यानंतर असले उद्गार काढावे म्हणजे केवढा दैवदुर्विलास!

माझ्या समोरच्या भिंतीवरलें घड्याळ टिकटिक करीत होतें. त्यांत दोन्हीला पांच मिनिटें कमी असलेलीं दिसत होतीं. माझ्या मनांत येत होतें कीं या वेळीं आपणाला गांधीजींचें दर्शन घडलें तर किती बरें होईल? मी त्यांना सांगेन कीं, 'बापूजी, मी तुम्हांला फार वेळां पाहिलेलें नाहीं. तुमचें आत्मचरित्र आणि तुम्ही गेलीं काहीं वर्षें घडवीत असलेला इतिहास यावरूनच तुमच्याबद्दलच्या माझ्या कांहीं कल्पना झालेल्या आहेत. उलटपक्षीं मी देखील तुम्हांला माहीत असावयाचें मुळींच कारण नाहीं. ऐकून माहीत व्हावा इतका मी प्रसिद्धहि नाहीं. पण या क्षणीं मात्र मला तुमच्याबद्दल विलक्षण ओढ वाटत आहे. वाटतें कीं, तुमच्याजवळ यावें आणि तुमच्याजवळ खुल्या मनानें माझी सहानुभूति व्यक्त करावी. तो माझा अधिकार नाहीं. पण खरें खरें मला तसें वाटतें म्हणून मी तसें म्हणतों. अतिक्रमण झालें असलें तर माफ करा.' ज्या भाषणानें माझ्या मनाची पकड घेतली तें भाषण करतांना त्यांच्या अंतःकरणाला किती पीळ पडला असेल हा एकच विचार माझ्या

मनांत घोळत होता. इतक्यांत विमानाची घरघर मागच्या बाजूनें ऐकूं आली. म्हणून मी मागें मान केली तों मला आढळलें कीं, मी एका मैदानांत उभा आहे आणि माझ्या पाठीमागें पांचपन्नास फुटांवर एक विमान जमिनीवर उतरत आहे. पुढच्याच चारदोन मिनिटात विमान पुरतेपणीं थांबलें, तें अगदीं माझ्या शेजारीं !

विमानाचें दार उघडलें गेलें आणि माझ्या कानाजवळ कोणी तरी हुकुमी आवाजांत म्हटलें, ' आंत चल ! ' मी या एकंदर दृश्यानेंच इतका चकित झालों होतों व माझी बुद्धि इतकी भांबावली होती कीं, एकहि शब्द न उच्चारता मी मुकाट्यानें आंत पाऊल टाकलें. उजव्या बाजूला मी वळलों तों तेथें मला एक दालन दिसलें. आणि काय आश्चर्य ! एका बाजूस खादीच्या अंथरलेल्या आसनावर महात्मा गांधी चरखा समोर घेऊन बसलेले ! डोळे अर्धवट मिटलेले दिसलें. चरख्यावर हात नुकताच स्थिरावला होता. चरख्याची गेलीं वीस वर्षें अखंड सेवा करूनहि त्यांची सात्विक महत्त्वाकांक्षा अतृप्त राहिल्यानें उत्पन्न झालेल्या औदासीन्यानें त्यांचा हात स्थिरावला असावा. मी क्षणभर नुसता उभा होतों. पण लगेच पुढच्या क्षणींच झटकन् पुढें येऊन त्यांना वाकून नमस्कार केला. त्यांनीं डोळे उघडून वर मान करून माझ्याकडे पाहिलें, आणि मला म्हटलें, ' बैस, बैस. ' मी खालीं बसलो आणि म्हटलें, ' आपण मला ओळखलें नसेल. माझें नांव... ' पण वाक्य पुरें होण्याच्या आंतच ते म्हणाले, ' पूर्वी ओळखत नव्हतों पण आतां ओळखतों बरें. ज्यांनीं मला विमान पाठविलें त्यांनींच निरोप कळविला कीं, तूं पण माझ्याबरोबर येणार आहेस म्हणून. कोठला कोण तूं ? ना ओळखीचा ना पाळखीचा, ना एका वृत्तीचा; पण तूंच माझ्याशीं या वेळीं माझ्या या दुःखित मनःस्थितींत समरस होऊं शकलास ! काय गंमत आहे ! परमेश्वरा, कसे तुझे लागेबांधे असतील ते असोत ! ' माझ्या आश्चर्याकुलतेंत प्रतिक्षणीं सारखी भरच पडत होती. मी टाइम्स वाचला तो काय, आणि माझ्या मनांत सहानुभूतीचे विचार यावयाला लागून किती थोडा वेळ झाला नाहीं तोंच त्याची बातमी यांना तिसऱ्याच एका महात्म्याकडून मिळते ती काय ? पण मला बापूजींनीं फार वेळ त्या मनःस्थितींत राहूं दिलें नाहीं. ते म्हणाले, ' हें बघ बाळ, असा बावरूं नकोस. मी तुझ्या आश्चर्याचा एकदमच

कडेलोट आणि शेवट करून टाकतों. तूं अकबर बादशहाचें कधीं नांव ऐकलें आहेस ना ? आतां आपण त्यांनाच भेटावयाला जातों आहोंत.' आणि या वेळीं माझ्या लक्षात आलें कीं, आमचें विमान मार्गक्रमण करीत आहे. नंतर बराच वेळ आम्ही स्तब्ध होतों. मी या विस्मयकारक घटनेचा विचार करीत होतों. विचार करतां करतां हिंदु-मुसल्मानाच्या एकीकरतां आणि संस्कृतिमीलनाकरतां जन्मभर धडपडणारा, 'दिने इलाही' धर्माची स्थापना करणारा आणि शेवटीं आपलें ध्येय साध्य न झाल्यानें अंतःसमयीं व्यथित झालेला, राजर्षी अकबर आणि त्याच प्रमेयानें प्रेरित झालेले महात्माजी यांत मला विलक्षण साम्य दिसूं लागलें. पण सोळाव्या शतकांत होऊन गेलेला अकबर विसाव्या शतकांतल्या गांधींना आमंत्रण देतो आणि त्याबरोबरच माझ्यासारख्या एका तिऱ्हाईत सामान्य माणसाला बोलावतो याची संगति मला लागेना. पण यापुढें न भांबावतां प्रत्येक गोष्ट काळजीपूर्वक बघावयाची असें मी ठरवलें. आणि माझ्या डाव्या हाताला एक गवाक्ष होतें त्यांतून मी बाहेर पाहूं लागलों. आम्ही एका मोठ्या शहरावरून चाललों होतो. तें शहर मागें टाकल्यावर बऱ्याच कालपर्यंत मला खालीं काळसर हिरव्या रंगाचीं झुडुपें दिसत होतीं. अर्थात् तीं मोठमोठीं अरण्यें असावींत. त्यानंतर पलीकडे कांहीं टेकड्यांमध्यें मोकळी जागा व त्या सर्वांपलीकडे एक पर्वतराजी दिसूं लागली. आणि त्यांपैकीं एका पर्वताच्या पायथ्याशीं आमचें विमान खालीं उतरलें. विमान थांबल्याबरोबर महात्माजी उठले. अर्थात् मीहि उठून त्यांना उतरावयास हात दिला. त्याबरोबर ते हंसत म्हणाले, 'इथें कांहीं मला हाताची जरूर नाहीं. या प्रातांत आल्याबरोबर मला कसं अगदीं एकदम वीस वर्षांनीं लहान झाल्यासारखं वाटूं लागलं आहे. मला वाटतें, स्वतःच्या घरीं आल्याबरोबर कुणालाहि असेंच वाटत असेल नाहीं का ?'

'पण बापूजी, याचा अर्थ ही समोर दिसणारी गुहा म्हणजे आपलें घर आहे, असा होतो !'

'आणि कां कोणाला ठाऊक, पण तसं मला वाटतं आहे खरं.'

इतकें बोलतों तोंच आम्ही एका प्रचंड गुहेच्या तोंडाशीं आलों. ती गुहा जितकी प्रचंड होती तितकेंच तिच्या भोंवतालचें वातावरण मनोरम

होतें. सभोंवतालच्या उंचच्या उंच डोंगरांच्या सांवल्या गुहेसमोर लांबवर पसरल्या असल्यामुळें तिथें बसायलादेखील मोठी सुंदर जागा दिसत होती. डोंगरांच्या बाजूवर कांहीं गाई चरतांना दिसत होत्या. गुहेच्या तोंडाशीं एक प्रशांत चेहऱ्याचे व तेजस्वी कांतीचे वृद्ध गृहस्थ उभे होते. मला प्रथम भास झाला कीं, पंडित मालवीय इथें आले असावेत. पण नीट बघतों तों त्यांच्या गळयांत हिरव्या मण्यांची माळ दिसली. त्यांनीं हात जोडून 'या गौतमा' म्हणून बापूजींना नमस्कार केला. बापूजी मला हळूंच म्हणाले, 'राजर्षि अकबर.' मी पुढें होऊन नमस्कार केला.

'महाराज माझें भाग्य मोठें कीं, आज आपल्यासारख्यांचें दर्शन झालें. पण आपण बापूजींना आतां 'गौतमा' म्हणून हांक मारलींत तें कसें काय?'

'खरंच, मला पण आपली हांक ओळखीची वाटली. पण गौतमा कां म्हणालां तें नाहीं कळलें. मला माझे कांहीं भक्त गौतमबुद्धाचा अवतार समजतात, त्याचा तर यांत कांहीं संबंध नाहीं ना? मी तर असेंच मानीत आलों आहे कीं, ते केवळ भोळया भक्तीनें माझ्यावर मोठेपणा लादतात.'

'पण तो खरा आहे.' असें म्हणून अकबरशहानीं पुढें होऊन आपली स्मरणी गांधीजींच्या डोळयांवरून फिरविली. त्याबरोबर पूर्वस्मृति जागृत व्हावी त्याप्रमाणें 'खरेंच कीं, मीच तो गौतम. स्वतःची ओळख व्हावी म्हणून रानावनांत हिंडणारा सिद्धार्थ तो मीच. आणि नंतर मानवजातीला तेंच सम्यक्-ज्ञान करून घेण्याची प्रार्थना करीत हिंडणारा मीच तो बुद्ध. माझी येथली जागा मला आतां पुन्हां दाखवतां का?'

'होय जरूर. पण तुम्हांला इतक्यांत येथें यायला मिळणार नाहीं, हें लक्षांत ठेवा. जें काय मागून घेतलेंत आणि जें तुमच्यावर सोपविलें गेलें आहे तें अजून पुरें व्हायचें आहे.'

नंतर आम्ही आंत हिंडलों. त्या वेळीं पुष्कळशा लहान खोल्या आम्हांला दिसल्या. त्यांतल्या कांहीं आम्हांला उघडून दाखविल्या गेल्या. त्यांपैकीं एकींत मला तुकाराम महाराज दिसले. एकींत रामदासस्वामी दिसले. त्यांचे जवळच्या खोलींत विवेकानंद होते. परमहंसांची खोली म्हणून जी दाखविली ती रिकामी होती. परमहंस कुठें आहेत म्हणून मी विचारलें तेव्हां पांडीचरीला स्वतःच्या कार्याला योग्य अशी भूमिका निर्माण करण्याकरितां ते

तपश्चर्या करीत आहेत, असें उत्तर मिळालें.

नंतर आम्ही बाहेर येऊन बसलों. गांधीजींनीं मग विचारलें, ‘ आज मुद्दाम कां येथें आणलेंत ? माझी परत यायची वेळ झाली का ? ’ तेव्हां ‘ अजून नाहीं ’ असें उत्तर मिळालें. ‘ मग माझी ही सक्तमजुरी केव्हां संपणार ? मी खरें खरें सांगूं का, मला दिवसेंदिवस कंटाळा येत चालला आहे.’

तेव्हां अकबरशहांनीं त्याच्या कानांत कांहीं तरी सांगितलें. व मग मोठ्यानें म्हणाले, ‘ केव्हां का संपेना सक्तमजुरी ? मी तुम्हाला सागूं का ? तुमचे अहंकाराचे संस्कार तुम्हांला नडताहेत. तुम्हांला काय हवें तें तुम्ही करीत रहा. महाज्योति प्रकाशमान होण्याच्या अंतिम कार्याला तुम्ही मदत करीत आहां, याची तुम्हांला खात्री आहे ना ! मग हा त्रागा कां ? आज एवढ्या-करिताच तुम्हांला येथें आणलें. नुकतेंच तुम्ही जें भाषण केलेंत त्यांत तुम्ही आपल्या अंतःकरणाची समता ढळविलीत असें नाहीं का तुम्हांला वाटत ? ’

‘ पण लोकांच्या मनावर परिणाम व्हावा म्हणूनच ना मी तसें बोलतों !’

‘ तें खरं. पण त्यांच्या मनावर परिणाम व्हायला हवा इतके ते संस्कार-क्षम नकोत का ? तितकी सगळयांची संस्कारक्षमता असती तर मग आम्हाला पुनःपुन्हा पाठविण्याची काय गरज परमेश्वराला ? अहो एकच ध्येय असूनहि तुमचे आमचेहि पूर्वसंस्कार इतके प्रबळ कीं, आपणांला एका विशिष्ट चाकोरींतूनच जावें लागतें. मग सामान्याची गोष्ट कशाला ? आता हा पाढरपेशाच घ्या ना. याची बौद्धिक प्रगति कमी का झाली आहे ? कितीतरी तत्त्वज्ञानें त्यानें वाचलीं असतील, त्यातलें एखादें थोडेफार याला पटलेंहि असेल, पण म्हणून का हा याच्या रोजच्या सुखाच्या — संसाराच्या आड तें येऊं देणार आहे ? तुमच्याबरोबर याला इथें येऊं दिल्यानें सिद्ध होतें कीं तुमच्या मनःस्थितीशीं काहीं काळ हा पूर्णपणें समरस होऊं शकला, पण म्हणून हा तुमचा अनुयायी का होणार आहे ? आणखी समजा, उद्यां तुमचें सेवा, त्याग वगैरे तत्त्वज्ञान याच्या मनावर बिंबले तरी तुमच्या खादीच्या स्वरूपांतच तो तें स्वीकारील का ? त्याच्या अहंकाराचा मासा कदाचित् दुसऱ्या एखाद्या प्रतीकाच्या गळाला लागेल. जगांत जे इतके पंथ निर्माण होतात ते उगीच का ? पंधराव्या शतकांतल्या माझ्या बादशाही अहंकारांत मी नाहीं का राणा प्रतापसारख्या थोर पुरुषाचा पिच्छा

पुरवून त्याला छळलें आणि तें देखील एका उदात्त हेतूमुळें ? तुमच्या आजच्या काळांत हिंदुमुसलमानांत नुसत्या मारामाऱ्या होतात. तेव्हां युद्धें होत. तीं टळावींत, दोन्ही संस्कृतींचा संयोग व्हावा, दोन्ही जमातींनीं सख्या भावाप्रमाणें नांदावें ही माझी इच्छा. आणि राणा प्रतापला तरी शांतता कुठें नको होती ? पण मेवाडचें स्वातंत्र्य नावापुरतें कां होईना पण गमावणें त्याच्या दृष्टीनें पातक होतें. त्याचा राष्ट्रीयत्वाचा अहंकार आणि माझा अहंकार यांचा विरोध आला. आम्ही दोघेहि काय एरवीं कमी उदारहृदयी होतों ? पण उदारहृदयी कोणाच्या बाबतींत ? तर आमच्या अहंकाराच्या आड न येतील त्याच्या ! एवंच काय, आमच्यासारख्या उत्क्रांत जीवात्म्यांनासुद्धां पूर्वसंस्कारांचे अहंकार इतके चिकटूं शकतात, मग सगळ्या जगाला एकदम पालाण घालायची कल्पना करणें देखील वेडेपणाचें नाहीं का ? '

' राजर्षे, तथ्य आहे आपल्या म्हणण्यांत. पण मला सांगा, माझ्या वागण्यांत अहंकाराला येवढी देखील जागा मिळूं नये, हाच असतो ना माझा प्रयत्न ? जाडी भरडी खादी वापरायला मी लोकांना सांगितलें तें सत्य, सेवा आणि त्याग ही तत्त्वत्रयी त्यांना पटावी म्हणूनच ना ! कीं अहंकारानें ? गरिबांची राहाणी पत्करल्यानें गरिबांचीं दुःखें त्यांना कळावी, त्यांच्याशीं त्याना समरस होता यावें म्हणूनच ना मी खादीचा महामंत्र दिला ? '

' गांधीजी, अहंकार हे असे विलक्षण भूत आहे कीं, विनयाच्या झाडाला देखील तें पछाडल्यावांचून राहणार नाहीं. उलट हेंहि तितकेंच खरें आहे कीं, तुमच्या अहंकारांत सात्विकता आहे. आतां तत्त्वनिष्ठा कायम राहायला अहंकाराचा अग्नि हवाच. पण तो अहंकारदेखील अतिरिक्त नको.'

गांधीजी म्हणाले, ' पण अहंकाराची गोष्ट क्षणभर बाजूस ठेवूं. मी म्हणतो कीं, अशा तत्त्वनिष्ठ अहंकारामुळें फार थोड्यांशीं आपला विरोध येईल. कारण तत्त्वनिष्ठ माणसें जगांत थोडींच असतात. पण खुद्द अनुयायांचीच गोष्ट किती मनःक्षोभक आहे ! गेलीं वीस वर्षें ज्या खादीधर्माकरतां मी इतके विलक्षण शारीरिक, मानसिक आणि आर्थिक कष्ट सोसले, तो धर्म पाळणारे पांच पंचवीस सुद्धां माझे अनुयायी म्हणविणारांत सांपडूं नयेत का ? माझ्या भाषणांत मी त्या गोष्टीचा मुद्दामच उल्लेख केला.

कारण माझ्या मनाला ती गोष्ट फार लागली आहे !'

'आणि म्हणूनच मी म्हटलें कीं, तुम्ही आपल्या मनाची समता ढळविलीत. माझेंच उदाहरण मी पुन्हां घेतों. राणा प्रतापच्या आणि माझ्या वैराची गोष्ट आपण सोडून देऊं. आमच्यांत मतविरोध तरी होता. पण जे रजपूत राजे मला अनुकूल झाले त्यांच्यासंबंधीं मला असें आढळून आलें कीं, त्यांपैकीं बहुतेक स्वार्थ, भीति अगर प्रतापचा द्वेष या एक व अनेक कारणानीं मला अनुकूल झाले होते. त्यांना ना हिंदु-मुसलमानांच्या एकीची आवश्यकता वाटत होती, ना माझ्या दिने इलाहि धर्माचें प्रेम होतें. जे थोडे खरेखुरे अनुयायी होते ते माझा नवधर्म जागविण्याइतके खंबीर नव्हते. एवढा जवळचा आणि लोभांतला असा नवरत्नांचा हार मी गुंफला, पण तो देखील माझ्या देखता ओघळला. कुणी नादब्रह्मांत गुंग असे. कुणी तत्त्वज्ञानावर ग्रंथ लिहीत बसे. कुणी राज्याच्या कारभारांत गुरफटलेला असे. सगळ्यांचे माझ्यावर अत्यंत प्रेम होतें. पण प्रत्येकाचें कार्यक्षेत्र ज्याच्या त्याच्या संस्काराप्रमाणें आणि शक्तीप्रमाणें आंखलें गेलें होतें, मर्यादित झालें होतें. एवढा माझा अबुलफजल, पण त्याला माझ्या सलीमानेंच मारला. कुणाकडे न्यावी मी तक्रार ? माझ्या मृत्युकालापूर्वीचे थोडे दिवस मला आठवतात. अर्धशतक राज्य केलेला विख्यात् सम्राट मी. पण मानसिक सुखदुःखाचें मोजमाप करतां आलें असतें तर माझ्या सुखदुःखाचें प्रमाण काय ठरलें असतें त्याचें अनुमान न करणेंच बरें !

'माझ्या देखील महात्मेपणाची लोकांना सदैव आठवण असते. पण तें महात्मेपण मी किती कष्टानें मिळविलें आणि ते कष्ट का केले याचा जर माझे अनुयायी विचार करतील तर त्यांना आढळून येईल कीं, माझ्या मनाचें समाधान हें माझ्या कीर्तीच्या व्यस्त प्रमाणांतच आहे. माझ्या साऱ्या आयुष्यांत झाले नाहींत इतके मानसिक कष्ट मला हल्लीं होत आहेत. आणि अस्वस्थतेनें माझें मन व्यग्र झालें आहे.'

'माझा तुमच्याशीं संभाषणाचा योग जमवून आणण्याचा हेतु येवढाच कीं, तुम्हाला मनस्वी दुःख झालें तें कमी व्हावें आणि तुमच्या अंगीकृत कार्यांत कमतरता न व्हावी. या विषयावर आपण बऱ्याच मंडळींनीं जर बोलायचें ठरवलें तर खरोखरच कितीतरी बोलतां येईल आणि त्या वाद-

विवादांतून कांहीं साध्यहि होईल. कारण जीवमात्राचें अंतिम परिणत स्वरूप काय व कशाकरतां हा सर्व पसारा आहे याची जाणीव आपणाला या वेळीं कांहींतरी आली नव्हे का ?'

'होय, पण कर्मभूमींत जातांना ही आठवण कायम राहती तर बरें नसतें का झालें ? कितीतरी समरप्रसंग त्यामुळें टळते, नाहीं ? येथें तुम्ही करून देईपर्यंत मला तरी कुठें पूर्वजाणीव होती ?' उठतां उठतां बापूजी म्हणाले.

अर्थात् मलाहि उठावें लागलें. ते दोघे महात्मे एकमेकाना कडकडून भेटले. मी राजर्षींना साष्टांग नमस्कार घातला. पण निघता निघता मी म्हटलें कीं, 'महाराज, आम्हीं सामान्य लोकाना वाटते कीं दोन व्यक्तिशः अत्यंत थोर माणसें; दोघेहि मानवतेच्या उत्कर्षाकरता झटणारे; असें असताना दोघांच्या मार्गांत इतका जमीनअस्मानाचा भेद कां पडावा कीं ज्यामुळें दोघांचेहि मानवतेच्या उत्कर्षाकरता दिलेले मंत्र नष्ट होऊन, केवळ तंत्राच्या अभिमानाकरतां त्यांच्या अनुयायांत युद्धें व्हावींत ? आपण मघाशीं म्हणाला तशी आपली सभा भरून त्या विचारविनिमयाचा उपयोग जगाला होणार असेल तर किती बरें होईल ! आणि अशा सभेच्या वेळीं वहिवाटीच्या हक्काला अनुसरून मला जर आपण येऊं दिलें तर मी त्याचा योग्य तो फायदा स्वतः घेऊन लेखणीच्या द्वारें जगालाहि जरूर करून देईन. आम्ही पुष्कळसे पांढरपेशे विचारानें थोर असलों तरी आचारानें फार खालच्या दर्जाचे असतों.

स्वतःची ओळख पटायला खऱ्याखुऱ्या जीवनकलहातच आम्ही पडलें पाहिजे. पण मनोदौर्बल्य आम्हांला बाजूला ओढते. पण माझ्यापुरती मी येवढी खात्री देईन—मला माफ करा. हा देखील अहंकारच आहे—कीं माझ्या लेखणीच्या जोरावर मी मला मिळालेल्या या सुयोगाचा लोकांना शक्य तो लाभ जरूर करून देईन.' यावर दोघेहि नुसते हंसले. राजर्षी अकबरानें माझ्या पाठीवर प्रेमानें हात मारून 'बरें, बरें' एवढेंच उद्गार हंसत हंसत काढले आणि बापूजी विनोदानें मला म्हणाले, 'बरं असो. तूर्त मला तरी हात देशील ना ? परत जावयाला निघाल्यावर माझें दौर्बल्य मला जाणवायला लागलें. बरें आहे. राजर्षे, येतों आम्ही. मी विसांवा घेतों आहे या समजु-

र्तीत सगळे हरीपुरांत आहेत. लवकर उठलों नाहीं तर पन्नास डॉक्टर जमायचे ! तेव्हां आपले लवकर जावें हें बरें.'

आम्ही विमानांत बसलों. पुन्हां अेकदां तेथून अकबरशहांना नमस्कार केला आणि विमानाची घरघर चालू झाली. बापूजी मला म्हणाले, 'कायरे, आमच्या भाग्याचा तुम्हांला अनेक वेळां अगदीं हेवा वाटत असेल नाहीं? पण त्या भाग्याच्या द्राक्षवेलीखालीं मनस्तापाचे ज्वालामुखी धगधगत असतात त्याची कल्पना तुम्हांला कशी असणार? पंधराव्या शतकांत अेवढे मोठे सम्राट् असूनाहि अकबरशहांना हिंदुमुसलमानांचा एक संघ करता आला नाहीं. त्यांच्या नवरत्नांची त्यांच्या समोरच सलीमानें वाताहत करायला सुरवात केली. आणि त्यांचा 'दिने इलाही, ' त्यांच्या बरोबरच त्यांच्या अनुयायांनीं' पुरून टाकून नाहींसा केला. अगदीं हेंच शल्य, 'माझी खादी तुम्ही माझ्याबरोबरच जाळून टाकाल' असे मी म्हटलें तेव्हां माझ्या मनाला बोंचत होतें. या दुःखाचे पीळ आमच्या मनालाच माहीत. असो; भगवंतांची इच्छा!' बराच वेळ आम्ही दोघेहि स्तब्ध होतों. विमान खालीं उतरू लागलें तसे माझ्या खांद्यावर हात ठेवून गांधीजी म्हणाले, ' बाळ, तुझें घर आलें. तूं उतर बघूं. मला लवकर पुढें जावयाचें आहे.'

'बरें आहे; मी आपणाला वंदन करतों' असें म्हणून मी उठून वांकून नमस्कार करू लागलों तोंच ' हें काय नाना-मामा, नमस्कार कोणाला करतो आहेस! उठ ना, चहाची वेळ झाली. ' असे शब्द कानावर आले.

म्हणजे सर्व स्वप्नच तर! मी मनाशीं म्हटलें. समोर घड्याळाकडे पाहातों तों तीन वाजले होते.

—सह्याद्रि, जुलै १९३८

---

# फसवणूक

७

इव्हान् पेट्रोव्हिच् आणि ग्रेगरी इव्हॅनोव्हिच् हे दोघे शेजारी. खरें पाहिलें असतां दोघेहि रशियन; दोघेहि कुलशीलवान् व मानमान्यता पावलेले. इव्हान् हा कांहीं दिवस लष्करी नोकरींत होता; पण त्याची पत्नी एका इवल्याशा पण गुटगुटीत मुलाला जन्म देऊन देवाघरीं गेली. संसाराच्या आरंभींच हा धक्का बसल्यानें त्यानें नोकरी सोडली; आणि आपल्या शेतवाडीवर रहायला येऊन तो शेतीवाडी पाहूं लागला. त्यानं एक घर बांधलं, एक कापडाचा छोटा कारखाना सुरूं केला, त्याच्या सुदैवानं त्याला पैसे पण बरे मिळूं लागले आणि त्याच्या अनुषंगानं तो स्वतःला अत्यंत शहाणा समजून समाधानांत काळ कंठूं लागला. आणि त्याच्या या समजुतीला शेजाऱ्या-पाजाऱ्यांनीं कधींहि विरोध दर्शविला नाहीं.

त्याचं पटत नसे असा फक्त एकच माणूस होता; आणि तो म्हणजे ग्रेगरी इव्हॅनोव्हिच्. वास्तविक त्यांचं आपसात कधींहि भांडण झालं नव्हतं. त्यांची गांठहि क्वचित् पडत असे; पण जगांतली उपकारी माणसं कळीच्या नारदाचं काम शतमुखांनीं करीत असतातच ना! इव्हॅन हा वृत्तीनं पक्का सनातनी आणि हट्टी. व्यवहारांत सुदैवानं यशस्वी ठरल्यामुळं तो स्वतःला अत्यंत शहाणा समजे; आणि तो शहाणपणा उठून दिसावा म्हणून ग्रेगरी इव्हॅनोव्हिच् हा किती वाया गेलेला मनुष्य आहे, याचं तो येणाऱ्याजाणाऱ्या-जवळ वर्णन करी. ग्रेगरीला इंग्लिश जीवनक्रम अति आवडे. त्यानं आपली शेतीवाडी इंग्रजी पद्धतीनं संभाळली होती. इतकंच नव्हेतर आपल्या लाडक्या कन्येचं—लिझाचं शिक्षण नीट व्हावं म्हणून त्यानं एक इंग्रजी शिक्षकीणहि नोकरीस ठेवली होती. इव्हॅनला या भ्रष्टपणाचा भारी राग येई; आणि तो

ज्या वेळीं ग्रेगरीची भरमसाट निंदा करी त्या वेळीं वर सांगितल्या प्रकारची माणसं ' वाह्वा ' म्हणत व उलट ग्रेगरीकडे जाऊन इव्हॅनची निंदा करीत. आणि अशा तऱ्हेनं कांहीं कारण नसतां या दोघा शेजाऱ्यांचं आपसांत बरं नाहीं असा प्रवाद पसरत चालला आणि त्या दोघांनाहि तसंच वाटूं लागलं.

पण हें निष्कारण वैर असंच चालत राहावं अशी दैवाची इच्छा नव्हती. ग्रेगरीची लिझा जरी, एकुलती एक मुलगी म्हणून सतरा वर्षें वयाच्या मानानं जास्त अवखळ व लाडावलेली होती, तरी तिच्या बालिश धाडसाचा परिणाम ती इव्हॅनची सून होऊन या दोन्ही घरांचा संपूर्ण एकोपा होण्यांत होईल अशी कल्पना कुणाच्या स्वप्नांतहि आली नसती. आणि ही सगळी घटना घडून यायला कारण पण अगदीं लहानसंच झालं. एक दिवस नाश्या— लिझाची आवडती परिचारिका—तिच्या मैत्रिणीच्या वाढदिवसानिमित्त जेवायला गेली होती; आणि तिथं तिनं इव्हान्‌चा मुलगा अलेक्झी नुकताच कॉलेज संपवून परत आला होता तो बघितला; त्याची ती उंचनिंच शरीर-यष्टि, गुबगुबीत आणि आकर्षक चेहरा, सरळ नाक, त्याखालीं थोडीशी मिसरूड–किती पण छान दिसे तो. त्याच्या उमद्या आणि खेळकर स्वभावानं तो नाश्यालाच काय पण तिथं असलेल्या प्रत्येक मुलीला आवडूं लागला. त्याच्याबद्दलचं हें वर्णन जेव्हां लिझानं ऐकलं तेव्हा हा अलेक्झी आहे तरी कसा तो आपणहि एकदां बघावा असं तिला वाटूं लागलं यांत नवल नाहीं. पण दोन घराण्यांचं काल्पनिक वैर; त्यामुळें 'आपण त्याच्याकडं जाऊं' असं वडलांनाहि म्हणणं शक्य नाहीं. पण आपल्या सुपीक डोक्यांतून तिनं एक कल्पना काढली; आणि नाश्याच्या साह्यानं ती अंमलांतहि आणली.

एक दिवस एका गरीब शेतकऱ्याच्या मुलीचा वेष अंगावर चढवलेली लिझा, पहांटेच्या वेळीं आपल्या घरापासून दीड दोन मैल अस-लेल्या झाडीकडे झपझप जात होती. नाश्यानं तिला सांगितलं होतं कीं, अलेक्झीला शिकारीचा नाद आहे. आणि त्या बाजूला एखादी मोठी शिकार मिळण्यासारखी नसली तरी मिळेल ती छोटी शिकार मिळवायला आणि सुट्टीचा वेळ घालवायला अलेक्झी तिकडेच येत असतो. आणि तिचीहि आशा कांहीं विफल झाली नाहीं.

अलेक्झी कसा असेल त्याचं मनोमय चित्र रंगवीत ती हळूहळू चालली

होती. त्या छोट्याशा रस्त्याच्या दोन्ही बाजूंला उंच उंच वृक्षांची दाटी झाली होती. आणि त्याचपैकीं एका झाडामागून तिला कुत्र्याचं भुंकणं ऐकूं आलं अन् भानावर येण्यापूर्वीच एक भला मोठा शिकारी कुत्रा उडी मारून तिच्याजवळ येऊन उभा राहिला. आणि त्यामुळें घाबरून ती एकदम ओरडली. पण तो कुत्रा एकटा नव्हता. त्या कुत्र्याचा धनीही—तो अलेक्झीच होता हें वाचकांनीं ओळखलंच असेल—त्याच्याबरोबरच होता. कुत्र्याला आवरीत तो तिला म्हणाला, ' माझ्या कुत्र्यामुळं तुम्ही घाबरतां ? पण सांगू का ? तो मुळींच चावत नाहीं. अन् वाटलं तर तुमचं काम होईपर्यंत मी तुम्हांला सोबत करतों.' आणि या नाट्यप्रसंगांतून त्या दोघांचं प्रेम हळूहळू कसं जमलं असेल तें वाचकाना सांगायला नकोच.

नंतर कित्येक दिवसपर्यंत त्यांच्या ठरलेल्या वेळीं गांठी पडत असत. आणि अलेक्झी हा लिझाला जरी एक अकुलिना नांवाची चुणचुणीत शेतकऱ्याची मुलगी समजत होता, त्याच्या सामाजिक दर्जाच्या दृष्टीनं तिच्याशीं लग्न होणं जरी त्याला संभवनीय वाटत नव्हतं, तरी देखील 'नुसती मैत्री करावयाला काय हरकत आहे ' असं मनाला समजावतां समजावतां तो तिच्या हळुहळूं पूर्ण आहारीं जात होता. आणि लिझाहि शहाणी असल्यानं तिचं जरी त्याच्यावर उलट प्रेम असलं तरी त्याला सन्माननीय अंतरावर ठेवून त्याची आसक्ति वाढती कशी ठेवावयाची, हें तिला पूर्णपणें कळत होतं. तिला खेडवळ भाषा बोलतां येत होती आणि अशिक्षितपणाचं वेड तिनं इतकं सुंदर पांघरलं होतं कीं, बऱ्याच भेटीनंतरहि अलेक्झीला थोडा-देखील संशय आला नाहीं. एक दिवस तो तिला म्हणाला, ' अकुलिना, तुला जर लिहितां—वाचता आलं असतं तर किती छान झालं असतं. मग जरी तुझी रोज भेट होत नसली तरी रोज येऊन इथल्या या झाडाच्या ढोलींत आपण एकमेकांला पत्रं ठेवलीं असतीं आणि आपल्या सवडीनं घरीं नेऊन वाचलीं असतीं.' 'होय, आणि मग मला पण तुम्ही माझ्यावर प्रेम करतां हें तुमच्याकडून लिहून मिळालं असतं. पण तुम्ही मला शिकवत कां नाहीं ? ' ' खरंच शिकवूं कां मी तुला ? चल आपण आतांच सुरुवात करूं. ' असं म्हणून एका काडीनं त्यानं तिला शिकवायला सुरुवात केली.

आणि अकुलिना तरी किती बुद्धिमान! माहिन्या दोन माहिन्यांच्या अवधींत त्याचीं पत्रं वाचण्याइतकं आणि त्याला वेड्यावांकड्या अक्षरांत पत्र लिहिण्याइतकं तिला लिहितां–वाचतां येऊं लागलं. अलीकडे घरकामाच्या सबबीखालीं ती त्याची भेट आठवड्यांतून एखादे वेळेस घेई. पण पत्रव्यवहार मात्र रोज चालू होता. एक दिवस तिनं त्याला लिहिलं, ‘ आपल्या भेटी यापुढें आपल्याला थांबवल्या पाहिजेत. माझ्या लग्नाचा विचार माझ्या वडिलांच्या मनांत घोळतो आहे, तेव्हां जमीनदाराच्या श्रीमंत मुलाचा स्नेह कमी करून मी माझ्या वडिलांच्या इच्छेप्रमाणं एखादा हातानं श्रम करून मला जेवायला घालील असा नवरा हुडकावा हें बरं. तुमच्या माझ्या मैत्रीचं पर्यवसान तुमचा सामाजिक दर्जा कमी होण्यांत होऊं नये अशी माझी इच्छा आहे.’

हें पत्र वाचून अलेक्झीला गहिंवरून आलं आणि त्यानं तिला लिहिलं, ‘ माझ्या हातांत तुझं पोट भरण्याची ताकद नाहीं, असं का तुला वाटतं ? ’ नंतर तिची एकदां समक्ष गांठ घेऊन त्यानं सांगितलं, ‘ अकुलिना, तूं शेतकऱ्याची मुलगी असलीस तरी तुझं मन आणि वृत्ति श्रीमंत आहे,—तूं जर माझ्या प्रेमाचा स्वीकार केलास तर मी असं वचन देतों कीं, कुणीहि आपल्या दोघांच्यामध्यें येऊं शकणार नाहीं. ’ अलेक्झी तिला शेतकऱ्याची मुलगी समजत होता. आणि आपल्या व त्याच्या वडलांचं वैर तिला माहीत होतं आणि म्हणूनच हें लग्न कसं होणार याची दोघांनाहि नीटशी कल्पना नव्हती. तरी पण वचनबद्ध होताना भावनाप्रधान तरुण अंतःकरणं इतक्या खोलांत शिरूं शकतात काय ? त्यांच्या सुदैवानं त्यांना माहीत नसलं तरी दैव मात्र त्यांना अनुकूल होतं.

एक दिवस सकाळीं इव्हॅन् पेट्रोव्हिच्‌ची, लवाजम्यासह शिकारीला जायची लहर लागली. एका उमद्या घोड्यावर बसून, बरोबर दोन तीन शिकारी कुत्रे व इतर चार लोक घेऊन तो जवळच्या त्या गर्द झाडीकडे शिकारीला निघाला. त्याच दिवशीं योगायोग असा कीं, सकाळ मोठी छान वाटल्यामुळें इंग्रजी पद्धतीनं कसलेली आपली शेतीवाडी बघून यावी म्हणून ग्रेगरी इव्हॅनोव्हिच् आपल्या आवडत्या घोडीवर बसून फेरफटक्यास निघाला आणि दोघांची अचानक समोरासमोर गांठ पडली. आपण एकमेकांला टाळलं

असतं तर बरं झालं असतं, असा विचार दोघांच्याहि मनांत आला. पण आतां तें शक्य नव्हतं. तेवढ्यांत ग्रेगरी पुढें झाला आणि सभ्यगृहस्थाला साजेलशा अदबीनं त्यानं इव्हॅनला अभिवादन केलं. अर्थात् तें परत करणं इव्हॅन्‌ला भागच पडलं आणि त्यानंहि उलट अभिवादन केलं. इतक्यांत बाजूच्या झाडींतून एक ससा पळत बाहेर आला आणि त्यांच्या समोरून दूर गेला. त्याबरोबर शिकारीला बरोबर आणलेल्या माणसांनीं एकदम ओरडा केला आणि त्या सशाच्या पाठलागाला सुरवात केली. पण त्या आवाजानं ग्रेगरीची घोडी बिचकली व धूम पळत सुटली. ग्रेगरीनें तिला आवरायचा प्रयत्न केला पण तिनं त्याची पाठ जमिनीला लावलीच. तेवढ्यांत दूरवरून घोडी उधळलेली पाहातांच इव्हॅननं आपला घोडा तिथें आणला होताच. त्यानं चटकन् खालीं उडी टाकून ग्रेगरीला हाताचा आधार देऊन उठवलं. त्याला कुठं फारसं लागलं नाहीं ना, याची चौकशी केली आणि आग्रहानं विसांवा घेण्याकरतां त्याला जवळच असलेल्या आपल्या वाड्यांत तो घेऊन गेला. मनांतल्या मनात मात्र आपण आपल्या औदार्यानं एक मोठीच शिकार मारल्याच्या आनंदांत तो होता.

दुसऱ्या दिवशीं ग्रेगरीनं इव्हॅन् आणि अलेक्झी या बापलेकांना आपल्याकडे जेवायला बोलावलं. लिझाला जेव्हां हें कळलं तेव्हां तिला प्रथम आश्चर्य वाटलं आणि नंतर उद्यां आपलं नाटक अलेक्झीसमोर उघड होणार म्हणून ती थोडी घाबरली. पण तिनं लगेच एक युक्ति योजिली. इव्हॅनकडून तिनं कबूल करून घेतलं कीं, कुठल्याहि वेषांत आणि अवतारांत ती जेवायच्या टेबलाशीं आली तरी त्यानं आश्चर्य दाखवायचं नाहीं. आणि दुसरे दिवशीं आपल्या इंग्लिश शिक्षकिणीच्या कपाटांतील रंग आणि पावडर चोरून गळ्यापर्यंत आणि कानापर्यंत सगळा चेहरा तिनं रंगवला, बोटं रंगवलीं, अगदीं जुन्या पद्धतीचा पोशाख करून शरीराचा शक्य तितका भाग वस्त्राच्छादित राहील अशी काळजी घेतली. घरांत आईचे होते नव्हते तेवढे दागिने अंगावर घातले; आणि जेवणाच्या वेळीं फ्रेंच भाषेंत आणि अगदीं थोडं बोलली. लिझाचं सौंदर्य त्या भागांत बरंच गाजलेलं होतं. पण हें ध्यान पाहून अलेक्झी चकितच झाला. आणि दुसरे दिवशीं अकुलिनानं जेव्हां त्याला विचारलं, ‘ काल तुम्ही ज्या ग्रेगरीकडे जेवायला आला होता त्याची मुलगी माझ्या-

सारखी दिसते असं लोक म्हणतात, तें तुम्हांला कितपत खरं वाटतं ?' तेव्हा तो म्हणाला, 'सुंदर तर राहोच पण इतकी आचरट आणि गर्विष्ठ मुलगी मी पाहिली नव्हती.'

'कांहीं तरीच काय सांगतां ? सारा गांव तिचं सौंदर्य वाखाणतो !'

'तुला शपथपूर्वक सांगतों अकुलिना, तूं तिच्यापेक्षां शतपटीनं सुंदर आणि शहाणी आहेस !'

आणि मग त्यानं लिझाचं जें वर्णन केलं तें ऐकून अकुलिना पोटभर हंसली.

मध्यंतरीं आणखी काहीं काळ गेला आणि विनाकारण एकमेकांला वैरी मानणारे ते दोघे म्हातारे विनाकारणच एकमेकांवर खूप लोभ करूं लागले. त्यांना एकमेकांवांचून चैन पडेना. इतकंच नव्हे तर दोघांची मैत्री अखंड टिकण्याकरतां लिझा आणि अलेक्झी याच्या एकसारख्या गांठीभेटी घडवून आणवून त्यांचं प्रेम जमवून द्यायचं आणि मग त्यांचं लग्नहि लावून टाकायचं, असं त्या दोघांनीं आपसांत नक्की करून टाकलं.

त्याच दिवशीं संध्याकाळीं इव्हॅन् अलेक्झीला म्हणाला, 'लष्करात नोकरी धरायचा तुझा हट्ट मी चालू दिला नसला तरी तूर्त मुलकी नोकरी करायचाहि मी तुला आग्रह करीत नाहीं. पण मध्यंतरीं तुझं लग्न करायचं मीं ठरवलं आहे.'

'पण कुणाशीं ?' चकित होऊन अलेक्झीनं विचारलं.

'ग्रेगरीच्या लिझाशीं !'

'पण मला ती मुळींच आवडत नाहीं.'

'तिच्याकडं दहापांच वेळां जा म्हणजे आवडायला लागेल. ग्रेगरीचं व माझं पूर्वी इतकं भांडण असूनहि आम्ही एकमेकांना आवडूं लागलोंच कीं नाहीं. मग लिझा तर काय आणखी सुंदरहि आहे !

'पण तुमचं या बाबतींत मी मुळींच ऐकणार नाहीं.' केव्हां तरी स्पष्ट बोलावं लागणार या बुद्धीनं अलेक्झीनं बोलून टाकलं.

'काय ?' एकदम संतापून इव्हॅन् म्हणाला, 'मीं एकदां दिलेला शब्द परत घेऊं ? तुला मी दोन दिवसांची सवड देतों तोंवर विचार कर; पण मला नकार मिळाला तर माझ्या इस्टेटीपैकीं एक कपर्दिकहि तुला मिळणार नाहीं.'

अलेक्झी रागानंच तेथून आपल्या खोलींत गेला; आणि त्यानं सगळ्या हकीकतीचं एक पत्र अकुलिनाला लिहिलं आणि शेवटीं शक्य तितक्या लवकर, इस्टेटीची मुळींच पर्वा न करता तिच्याशीं लग्न उरकून घेण्याचा आपला निश्चय तिला कळवला. तें पत्र ठरलेल्या ठिकाणीं ठेवून परत येतांना दुसरें दिवशीं सकाळींच ग्रेगरी आणि लिझा यांना स्वतः भेटून त्यांचंच मन परावृत्त करावयाचा विचार त्यानं कायम केला. आणि वेळ पडली तर खुद्द लिझाला देखील आपलं व अकुलिनाचं प्रेम असल्याचं सांगून टाकायचं त्यानं ठरवलं.

त्या निश्चयाप्रमाणें दुसऱ्या दिवशीं अगदीं सकाळीं घोड्यावरून तो ग्रेगरीच्या वाड्यांत शिरला. नोकरांकडून कळलं कीं, मालक घोड्यावरून रपेटीला बाहेर गेले आहेत; पण घरात लिझा आहे. येवढं कळतांच वर्दी पाठविण्यासहि न थांबता तो तडक दिवाणखान्यात शिरला. दिवाणखान्यांत कोणीच नव्हतें. पण एका खिडकीसमोर लिझा अगदीं साध्या घरगुती वेषात त्याचं सकाळींच आणलेलं पत्र वाचीत बसली होती. आणि तिच्या चेहऱ्यावर खोडकरपणाचं मिस्किल हंसूं खेळत होतं. 'लिझा कीं अकुलिना' या विचारानं तो क्षणभर भांबावला; पण दुसऱ्याच क्षणीं सर्व नाटक लक्षांत येऊन त्यानं एकदम पुढें होऊन काय प्रकार घडतो आहे, हें तिच्या लक्षांत येण्यापूर्वींच तिचे दोन्ही हात धरले. त्याच्या हातून सुटण्यासाठीं तिनें थोडी धडपड केली. पण अपराधाचा जाब विचारल्याशिवाय तो तिला सोडणार नव्हता. 'मला फसवतेस काय लबाडे?' असं म्हणत त्यानें तिला आणखी जवळ ओढली. इतक्यांत बाहेरून नुकताच आलेला ग्रेगरी आंत डोकावला आणि त्या दोघांना एकत्र पाहातांच, 'अरे लबाडानो, आमच्याहि आधीं तुम्हीं आपसांत ठरवलंत तर. चालूं दे—चालू दे. मी आपला जातोंच कसा इव्हॅनकडे.' असें म्हणत हंसत तो तेथून बाहेर पडला.

—वाङ्मयशोभा, एप्रिल १९४२

—

# शापित वरदान

८

काशीराम मास्तर म्हणजे एक चमत्कारिक माणूस होता. कुणी त्याला बावळा समजत. कुणी इरसाल समजत. माझ्या अनुभवाप्रमाणें तो भारी मृदु अंतःकरणाचा पण परिस्थितीनं अनेकदां पोळल्यामुळं हटवादी आणि तिरसट बनलेला असा इसम होता. पण परिस्थितीचा वरवंटा जसजसा जास्त जास्त चेपीत गेला तसतशी त्याच्या हट्टी आणि तिरसट स्वभावाला मुरड बसून बाह्यतः त्याचा हट्टीपणा व तिरसटपणा कमी झाला आणि त्याची जागा कडवट उपहासबुद्धीनें घेतली. प्रथमतः ज्यांच्या लक्षात त्याच्या वागण्याचें मर्म येत नसे ते त्याला बावळट समजत; आणि मग त्याच्या वागण्यांतली—बोलण्यांतली खोंच लक्षांत आली कीं त्याला इरसाल समजूं लागत.

पण मला मात्र तो इरसाल अगर बावळट कधींच वाटला नाहीं. आई होती तोंपर्यंत आईची सेवा त्यानें केली. स्वतःचा संसार नव्हता तरी भावानें लहानपणीं संभाळलं म्हणून भावाचा संसार आपला मानून जो भार उचलतां आला तो त्यानें उचलला होता. शाळेंतील गरीब मुलं मग तीं ब्राह्मणाचीं असोत वा महाराचीं असोत, त्याचीं कांहीं ना कांहीं स्वरूपांत ऋणी नव्हतीं, असं नाहीं. पण लोक मात्र त्याला बावळट किंवा इरसाल समजत. यांत लोकांची कांहीं चूक होती असं मात्र मला म्हणायचं नाहीं. त्याची वागण्याची रीतच तशी होती.

धुळवाडी गांवांतल्या मुख्य रस्त्याला लागून असलेल्या एका आडव्या बोळांत, एका दोन खणी खोलींत स्वारी अलीकडे राहात असे. स्वतःचा संसार असा नसल्यामुळें पसाराहि कांहीं नव्हता. संध्याकाळीं शाळा सुटली

कीं, स्वारी शेजारीं लायब्ररींत जायची. तिथें वाचन अगर आमच्यासारखे स्नेही भेटले तर गप्पा. दिवेलागणीला खाणावळींत जाऊन जेवण. जेवल्यानंतर तीन कंदिलांच्या खुंटापासून तो भिवरीच्या पुलापर्यंत पांच-दहा फेऱ्या शतपावली आणि शतपावली संपली कीं खोलीचं कुलूप उघडून पायानं वळकटी पसरून त्यावर अंग टाकलं कीं उजाडेपर्यंत झोंप. त्याला कधीं घड्याळ लागलं नाहीं कीं कधीं दिवा लागला नाहीं.

आपण जर एखादे दिवशीं म्हटलं कीं, ' मास्तर, अहो घरीं कधीं दिवा तरी लावत जा कीं. एखादे वेळीं कांहीं विंचूकांटा निघाला तर ? एखादी वस्तु लागली तर तीहि चटकन् सांपडते. असं नाहीं का ? '

त्यावर जरासं हंसून तो म्हणे, ' बापूराव, अहो, दिवाबत्ती ही तुम्हां संसारिकाची चैनबाजी. ती आम्हांला कशी परवडेल ? आम्ही प्रायमरी मास्तर म्हणजे समाजाच्या पायांतले दगड. आम्ही नावाचे दगड थोडेच आहोंत कीं अगदीं घासून पुसून लख्ख हवेत ? आमचे बाकीचे मास्तर लग्न करून संसार थाटतात, ते आमच्या धंद्याच्या पवित्रपणाला काळिमा लावतात. खरा आदर्श प्रायमरी मास्तर मी ! संसाराचं लफडं आणि तेल, तिखट, मीठ, मिरची यांचं लचांड आम्हीं पाठीशीं लावून घेणं म्हणजे समाजाशीं द्रोह करणं नाहीं का ? समाजांतलीं इतर सर्वांचीं मुलं हीं दिवसाकाठीं सहा तास बेवारशी प्रजा समजून तिला आम्हीं आपलेपणानं जवळ केलं पाहिजे, शिक्षण दिलें पाहिजे, आणि राष्ट्र का काय म्हणतात त्याच्या अभ्युदयाकरतां तयार केली पाहिजे. '

काशीराम मास्तरांची प्रतिभा जागृत झाली होती आणि आतां त्यांची वाग्वैजयंती ऐकत बसणं मोठं मौजेचं आणि उद्बोधक होतं.

' बापूराव, ज्या चौकाला आपण तीनकंदील चौक म्हणतों, तिथें तीन कंदील असलेले तुम्हीं आम्हीं ह्यातींत कांहीं पाहिलेले नाहींत. तसंच वर्षांतून अकरा महिने पाणी नसलेल्या भिवरीला आपण आदरानं ' गंगा ' म्हणतों, या गोष्टीचं तुम्हांला आश्चर्य वाटत नाहीं. पण मी दिवा लागल्याशिवाय माझ्या महालांत महिनेन् महिने काढतों याचा चमत्कार वाटतो. ज्या कर्तव्यबुद्धीनं तुम्ही पूर्वजांनीं ठेवलेलीं ' तीन-कंदील ' चौक आणि ' गंगामाता ' हीं नांवं उच्चारतां त्याच कर्तव्यबुद्धीनं आमच्या थोर अधिकारीवर्गानं समाजाच्या-

चतीनं आमच्या डोक्यावर दिलेली ही निःस्वार्थी नोकरी कर्तव्यबुद्धीनं पार पाडणं आमचं कर्तव्यच नाहीं का ? आणि हें कर्तव्य पार पाडतांना दिवाळीची आतषबाजी आणि संसाराचा बेहिशेबी विस्तार आम्हांला कसा परवडेल ? पण माझ्या इतर प्रायमरी शिक्षकबंधूंच्या लक्षांत हें येत नाहीं. गाड्याला जुंपून घेऊन मग ते कण्हत, विवळत, लाथा खात तो गाडा ओढीत असतात. तेव्हा निदान आपण तरी आपलं कर्तव्य करीत असावं आणि त्यांच्या पातकाचं अंशतः क्षालन करावं म्हणूनच मी मला मिळतं तेवढ्याचाहि पूर्ण उपभोग घेत नाहीं. '

' होय ! १८ रु. खाणावळ, २ रु. किरकोळ खर्च, २।३ रुपये कपडालत्ता येवढें जाऊन जी १९।२० रुपये पुंजी उरते तिचा उपयोग तुम्ही काय करतां हें मला माहीत आहे. या महिन्यांत कुठल्या मानलेल्या वहिनीचं बाळंतपण आहे किंवा बहिणीची भाऊबीज आहे तेवढें सांगा म्हणजे पुरे ! '

' तें असो म्हणा ! पण इतकें करूनहि अधिकारीवर्गाचें समाधान नाहीं. पण म्हणावं तुमची गाठ काशीराम मास्तरशीं आहे. दंडाच्या भीतीनं किंवा प्रमोशन थांबवण्याच्या धाकानं तुम्ही मला घाबरवूं शकत नाहीं. '

मास्तरांचा आवाज जरा चढू लागला. ' बापूराव, शाळा सुटल्यावर लायब्ररींत जाऊन बसतो ना हे आमच्या कुऱ्हाडीच्या दांड्याला—दाडेकर हेडमास्तरला—बघवेना. लेकाचा मला म्हणतो, संध्याकाळीं कॅटलॉगच्या कामाला थांबत चला. पण काल असा कांहीं वंगवला आहे कीं बाः ! '

मी जास्त उत्सुकतेनं ऐकूं लागलों तसें डोळे मिचकावत मास्तर जरा हंसत आपला पराक्रम सांगूं लागले. त्यांचा राग कुठल्या कुठें पळाला होता.

' मास्तर लोकांनीं जीवनाचा सर्व वेळ शाळेला वाहावा याबाबत आमच्या A.O. शीं—ताम्बोळीसाहेबांशीं, आमचे दांडेकर हेडमास्तर सहमत आहेत. मुलांची बुद्धि सतेज राहावी म्हणून ठरीव तासांच्या अभ्यासाशिवायहि प्रत्येक प्रायमरी मास्तरानें आपल्या आयुष्याचा अधिकाधिक वेळ शाळेंतील मुलांच्या सर्वांगीण उन्नतीसाठीं खर्च केला पाहिजे असं तांबोळी साहेबांचं मत आहे. त्यांच्या अध्यक्षतेखालीं नुकताच आमच्या शाळेंत गांवांतील प्रायमरी शाळांतील सगळ्या मास्तरांना बोधामृत पाजण्याचा समारंभ झाला. त्या वेळीं अध्यक्षांचे आभार मानतांना मीं म्हणालों कीं,

'—साहेबाच्या म्हणण्याला माझें पूर्ण अनुमोदन आहे. असं पाहा, आपली मास्तरलोकाची जबाबदारी केव्हढी आहे ! बाप केवळ मुलाच्या जन्माला कारणीभूत होतो. आई मुलाला पोटांत संभाळते पण नंतर संसारापायीं तिला मुलाकडे फारसें बघावयालाहि होत नाहीं. पण प्रायमरी शाळेंत मुलगा कमींत कमी पांच वर्षे असतो आणि त्याच्या सर्व भावी यशाची जबाबदारी आपण देत असलेल्या शिक्षणावर असते. त्याचा विचार करतां आपण फक्त सहा तास शिकवून कसें भागेल? वास्तविक पाहातां पूर्वीच्या अश्रमपद्धतीप्रमाणें आपण चोवीस तास मुलें साभाळलीं पाहिजेत. आतां सध्यांच्या काळीं तें शक्य नाहीं म्हणून सोडून दिलें तरी सहा तास झोंप आणि दोन जेवणांचा वेळ वजा करून बाकीचा सर्व वेळ आपण या अज्ञ बालकांच्या हितार्थ वेंचण्याचा निश्चय करूं. आणि खरोखर त्यांत अशक्य तें काय आहे? मोजका पगार देण्याची व्यवस्था आपले बोर्ड करीत आहे. आणि रेशनपद्धतीनें पचेल तेवढें धान्य देण्याची व्यवस्था मायबापसरकार करीत आहे. मग हीं दोन साधनें हातीं असताना संसाराची जबाबदारी स्वतः पत्करून आपल्या मास्तर नवऱ्याला गांवच्या मुलाच्या उन्नतीकरितां मोकळें सोडणें कोणच्या सुगृहिणील्य अशक्य आहे ? माझी खात्री आहे कीं, तुमच्या गृहिणी ( कारण मला गृहिणीच नाहीं ) या कामीं तुमच्याशीं जरूर सहकार्य करतील.'

काशीराम मास्तराचें वाक्पाटव ऐकत असताना मला सारखें हंसू येत होतें. तें पाहून त्याच्या लकबीप्रमाणें किंचित् डोळे मिचकावत ते मला म्हणाले, 'अहो बापुराव, मी एवढें जीव तोडून सांगत असताना हंसतां काय ? त्या दिवशीं शाळेंत असंच झालं. मी मारे गहिंवरून येऊन हेंच भाषण करीत होतों. आणि समोरचा श्रोतृवृंद हंसूं दाबण्याचा प्रयत्न करीत खुदुखुदु हंसत होता. जसा जसा माझा आवाज अधिकाधिक सद् दित होऊं लागला तशा-तशा त्याच्या उकळ्या वाढूं लागल्या, तांबोळ्यांचा चेहेरा पडूं लागला आणि दांडेकर हेडमास्तरांचा चेहरा रागानें लाल होऊं लागला.' आणि हें सांगतां सांगतां काशीराम मास्तर स्वतःच मनापासून हंसूं लागले.

मीं त्यांना विचारलें, 'का हो मास्तर, तुमच्या शाळेंत म्हणे आमचे भाऊसाहेब जोशी मध्यविभागाचे इन्स्पेक्टरसाहेब भेट देणार आहेत ?'

'अहो, त्याचीच तर ही नांदी चालली आहे. इथें जी धुळवाडाकर

शिक्षकसंघाच्या विद्यमानें अखिल आंतरराष्ट्रीय प्राथमिक मराठी शिक्षकपरिषद भरणार आहे तिचा स्वागताध्यक्ष आमचा तांबोळीसाहेब आहे. आणि अध्यक्ष हे तुमचे भाऊसाहेब जोशी आहेत. ते इथें आले म्हणजे एक नमुनेदार प्राथमिक शाळा म्हणून आमची नं. १ ची शाळा त्याना दाखवावयाची असें ठरलें आहे. ही शाळा जशी नांवानं नं. १ ची आहे तशी आदर्श म्हणून नं. १ चीच आहे असे स्वयंस्फूर्त उद्गार पाहुण्यांच्या तोंडून निघाले पाहिजेत अशी दांडेकर मास्तराची महत्त्वाकांक्षा आहे आणि म्हणून गेले आठ दिवस गडी, मुलें आणि मास्तर एकसारखें राबत आहेत. अर्थातच माझ्या स्वभावाप्रमाणें मी त्याचा बळी होऊं शकत नाहीं. चुकून कांहीं केलेंच तर मघाशीं सांगितल्याप्रमाणें एखादें मार्मिक भाषण अगर संभाषण—तें अर्थातच ह्यांना पत्करत नाहीं. मग म्यां पामरानें तरी काय करावें? तरी देखील दोन दिवसापूर्वी वर्गात 'बोधवाक्यें ठळक अक्षरांत लावा' असा घोशा यांनीं माझे मागें लावला. मीं तें काम माझें नाहीं म्हणून सांगितलें. तेव्हां मी हेडमास्तर म्हणून हुकूम करीत आहे असें त्यांनीं सांगितलें. अर्थात् हेडमास्तरसाहेबाचा हुकूम मानणें भागच झालें. मी संध्याकाळीं शाळा सुटल्यावर ड्रॉइंग-पेपरच्या लांब पट्ट्या, पेन्सिली, रंगाची डबी व ब्रश आणि चांगलें अक्षर काढणारीं दोन मुलें इत्यादि साहित्य घेऊन बोधवचनें लिहीत असलेला पाहून मिस्किलपणानें माझ्याकडे पाहात आणि 'कसा वंगवला' असा भाव चेहऱ्यावर दाखवीत दांडेकर आणि त्यांचे हस्तक असलेले एक-दोघे मास्तर घरीं गेले. दुसरे दिवशीं शाळा उघडतांच बोधवचनें बघण्या-करिता दांडेकर मास्तर वर्गात हजर. वर्गात दोनच बोधवचनें लाविलीं होतीं. 'अधिकारी महामूर्ख आहेत' व 'सत्तेपुढें शहाणपण' 'ढ' हीं तीं वचनें. ते दोन्ही कागद ताबडतोब टरकावण्यांत आले. आणि दांत-ओंठ खात दांडेकर कचेरींत निघून गेले. आणि मग संध्याकाळीं म्हणजे कालच संध्याकाळीं शाळा सुटावयाच्या सुमाराला त्यांनीं मला कचेरींत बोलाविलें. दुसरेहि दोघे-तिघे मास्तर तेथें हजर होते. मी गेल्याबरोबर माझ्या हातांत एक कोरी वही देण्यांत आली. दांडेकर आम्हांला म्हणाले, 'मी सांगतों त्या मजकुराच्या ४।५ नकला करावयाच्या आहेत. मी तोंडानें सांगतों, तुम्ही लिहून घ्या. आणि रात्रीं त्याच मजकुराच्या दोन-दोन

नकला करा व उद्यां सकाळीं घेऊन या.' मी मुकाट्यानें इतरांबरोबर लिहावयास बसलों. संध्याकाळपर्यंत आमचें लिहिणें चालू होतें. मी मधून मधून शंकाहि विचारीत होतों. मजकूर पूर्ण झाल्यावर हेडमास्तर उठून प्रत्येकाचे कागद बघूं लागले. माझे कागद बघितले, व संतापून त्यांनीं ते माझ्या अंगावर फेंकले, आणि ओरडून म्हणाले, 'नोकरी म्हणजे तुम्हांला थट्टा वाटते काय?' मी कांहींच न बोलतां ते कागद उचलले आणि त्यांकडे पाहात त्यांच्या रागाचें कारण शोधूं लागलों. मग माझ्या लक्षांत आलें कीं, माझे कागद तसेच कोरे राहिले होते. त्यांवर कांहींच मजकूर उमटला नव्हता. मी दीनवाणीनें म्हणालों, 'हेडमास्तरसाहेब, मला माफ करा. हल्लीं कीं नाहीं माझ्या कांहीं लक्षांतच राहात नाहीं. इतका वेळ सारखा लिहितो आहे ना. परंतु दौतींत टांक बुडवावयाचा विसरलों.' 'चला, चालते व्हा इथून' दांडेकर माझे अंगावर खेंकसले. 'आणि मला तरी दुसरें काय पाहिजे होतें?' डोळे मिचकावीत काशीराम मास्तरांनीं मलाच विचारलें.

दांडेकर मास्तरला काल कसा वंगवला हें काशीराम मास्तरांच्याकडून समजण्याकरितां मला येवढी सगळी हकीगत समजून घ्यावी लागली. पण त्यामुळें विद्वान् पाहुण्यांचेसमोर ते आणिक कांहीं मौज करतात कीं काय हें पाहण्याची माझ्या मनांत उत्सुकता निर्माण झाली. आणि येणारे पाहुणे मध्य-विभागाचे इन्स्पेक्टर भाऊसाहेब जोशी हे माझे आतेभाऊ असल्यानें माझेहि पाहुणे होणार. तेव्हां त्यांच्याबरोबर आपणहि शाळा पाहावयास जावयाचें असें मीं मनांत योजून ठेविलें.

बुळवाडींत 'अखिल आंतरराष्ट्रीय प्राथमिक मराठी शिक्षकांच्या परिषदे'चे नगारे झडूं लागले. ठरल्याप्रमाणें अध्यक्ष भाऊसाहेब जोशी यांचें आगमन होऊन मुक्काम माझ्याकडेच झाला. दोन दिवस परिषदेचें काम झाल्यावर तिसरे दिवशीं सकाळीं दांडेकर मास्तर व तांबोळीसाहेब भाऊ-साहेबांना शाळा पहाण्यास आमंत्रण देण्याकरितां हजर झाले. त्यांचेबरोबर आपणांसहि आमंत्रण मिळावें म्हणून गेले दोन-तीन दिवस मी अगदीं ठरवून गनिमी काव्यानें वागत होतों. गेल्या दोन दिवसांत पाहुण्यांना भेटण्याकरितां म्हणून जेव्हां जेव्हां तांबोळी व दांडेकर माझ्याकडे आले, तेव्हां तेव्हां चहा, कॉफी, बिस्किटें, वांगीपोहे वगैरेंचा त्यांच्यावर मारा करून, मीं अर्धी

लढाई जिंकलीच होती. आजहि ते येतांच चहा आणि शिरा त्यांचेपुढें आला. आणि मग मी सुरुवात केली : '—बरं कां भाऊसाहेब, आमच्या या दाडेकरानीं शाळा मोठी छान ठेवली आहे. आतां तुम्ही पाहालच. आमच्या इथं तांबोळीसाहेब आणि दाडेकर—जोडी मोठी छान जमली आहे.' 'अहो, त्या शिवायच का येवढा मोठा परिषदेच्या कामाचा उठाव झाला !' भाऊसाहेब म्हणाले. यानंतर शाळा पाहाणाऱ्या निमंत्रितांत मी असणें अपरिहार्यच झालें.

दुपारीं चारचे सुमारास १ नंबरची प्रायमरी शाळा पाहाण्यास गेलों. शाळेचें आवार इतकें स्वच्छ होतें कीं, आणि सजावट इतकी सुरेख होती कीं, पाहाणारा खूप झालाच पाहिजे. दबलेल्या चेहऱ्याचे मास्तर पाहुणे पाहाण्यास उत्सुक झालेल्या मुलांना खुणेनें दटावीत होते. चारदोन वरचे वर्ग पाहून झाल्यावर मीं हळूच दाडेकराना विचारलें, 'का हो, ते काशीराम मास्तर तुमच्याच शाळेंत आहेत ना ?'

दांडेकर किंचित् हळू पण रागानें म्हणाले, 'अहो, तो फाजील मनुष्य ना ? अगदीं आमची बेअब्रू करण्यासाठीं टपलेला आहे. कालच्या परिषदेपुढें तो वेतनवाढीचा ठराव आणणार होता. शैक्षणिक प्रगतीचा आणि वेतन-वाढीचा संबंध काय ? पण आम्हीं परिषद भरविली ना ? तेव्हां कांहीं तरी करून त्यांत बिब्बा घालावयाचा. पण आम्ही कसले खंबीर, त्याच्या ठरावाला अनुमोदकहि मिळूं दिला नाहीं व त्याला सभेपुढें येऊंहि दिला नाहीं. आणि आजहि तो वरच्या वर्गावर असला तर पाहुण्यांच्या समोर मुलांना प्रश्न विचारतांना काहीं तरी कुचाळकी करील म्हणून त्याला बाल-वर्गावरच पाठविला आहे.'

येवढा वेळपर्यंत भाऊसाहेबांचेहि मुलांना प्रश्न विचारणें, वर्गांतल्या मास्तरांशीं बोलणें वगैरे झालें होतें. त्यानंतर आम्हीं आणखी एक वर्ग बघितला आणि पुढें निघालों तो एका वर्गात फळयावर चित्र काढलें होतें, आणि काशीराम मास्तर फळयाजवळ उभे होते. आम्हांला व्हरांड्यांत पहातांच बाल-वर्गातील तीं छोटी पिलें 'साहेब आले—साहेब आले' असें कुजबुजत एकदम उठून उभीं राहिलीं. तेव्हां मी भाऊसाहेबांना म्हणालों, 'तें पाहिलंत का, आपण आंत जाण्याच्या आंतच तीं मुलें उभीं आहेत.

तेव्हां या वर्गांत आपल्याला पांच मिनिटें तरी गेलेंच पाहिजे.' भाऊसाहेबहि माझा आशय उमगले. कारण मी त्यांना आधींच 'दाडेकर, तांबोळी आणि कंपनी' च्या राजकारणाची माहिती करून दिली होती. आणि रात्रीं काशीराम मास्तराना त्याचे पंगतीस जेवावयास बोलावून त्यांची साग्रसंगीत ओळख करून दिली होती. आम्ही दोघे वर्गांत शिरताच ॲडमिनिस्ट्रेटर तांबोळी व हेडमास्तर दाडेकर काय व्हरांड्यांत उभे राहाणार ?

वर्गांत फळ्यावर, सिंहावर बसलेल्या भयानक मुद्रेच्या देवीचें चित्र काढलें होतें. तिच्या पायाशीं नम्रपणानें प्रार्थना करीत असलेला एक दीनवाणा ब्राह्मण दाखविला होता. त्या चित्राच्या आधारानें काशीराम मास्तर मुलांना एक गोष्ट सागत होते. आम्हीहि ती गोष्ट ऐकूं लागलों.

"बरं का मुलानों, एका गावांत एक गरीब ब्राह्मण राहात होता. बिचारा गरीबीनें अतिशय पीडलेला होता. आणि माधुकरी मागून कसें तरी पोट भरीत होता. त्या ब्राह्मणाच्या मनात आलं कीं, गांवाबाहेरच्या देवीच्या देवळांत जाऊन तपश्चर्या करावी आणि देवीला प्रसन्न करून घ्यावं म्हणजे तिच्या कृपेनंच झालं तर आपलं दैन्य दूर होईल. आणि मग तो त्या देवळात गेला आणि एकवीस दिवस अन्नपाणी न घेतां अहोरात्र त्यानं देवीची प्रार्थना केली. झालं. बाविसाव्या दिवशीं सकाळीं एकदम सूर्योदयाबरोबर पसरलेला प्रकाश एकदम खूप वाढला. आणि स्फोट झाल्याप्रमाणें एक मोठा आवाज झाला. त्याबरोबर घाबरून त्या ब्राह्मणानें डोळे मिटले, त्याच क्षणाला तेथें देवी प्रगट झाली. फळ्याकडे बोट दाखवीत मास्तर म्हणाले, 'ही पाहा ती देवी. पाहिलीत ना ? कशी सिंहावर बसली आहे ! आणि कशी भयंकर आहे ! ! आणि हा तो गरीब ब्राह्मण. पाहिलात ना कसा दीनवाणा आहे तो ! दीनवाणा म्हणजे काय ? काय, नाहीं सांगतां येत ? बरं, मी सांगतों. दीनवाणा म्हणजे बापुडा. बापुडा म्हणजे काय ? हं तूं ? बरोबर बरोबर. बापुडा म्हणजे दीनवाणा. म्हणजे लाथा खाल्ल्यासारखा ज्याचा चेहरा असतो तो. तर असा हा ब्राह्मण एकदम घाबरला आणि त्यानें डोळे मिटले. पण देवीला फार थांबायला वेळ नव्हता. दैत्यांचा नाश करून नवं जग निर्माण करायला तिला जायचं होतं. पण ब्राह्मणानं तप केल्यामुळं तिला यावं लागलं. आणि त्याला वर दिल्याशिवाय तिला जातां येईना. तेव्हां तिनं ब्राह्मणाला

झांका मारून त्याला डोळे उघडायला लावले. देवी म्हणाली, ‘ अरे ब्राह्मणा, तुझ्या तपामुळं मी खूप झालें आहे. तुला मी वर देणार आहे, पण मला फार वेळ नाहीं. तेव्हां तुला काय हवं तें लवकर मागून घे.’ तेव्हां तो ब्राह्मण नम्रपणानं तिला म्हणाला, ‘ आई माते, तूं प्रसन्न झाली आहेस तर या ब्राह्मणाला पुष्कळ पैसा आणि अफाट कीर्ति दे.’ तेव्हां देवी थोडी रागावून म्हणाली, ‘ हे मूर्ख ब्राह्मणा, तुझ्या नशिबात कीर्तीहि नाहीं आणि पैसाहि नाहीं. गेल्या जन्मीं तूं भयंकर पाप केलेलें आहेस. आणि म्हणूनच या जन्मीं असा कर्मदरिद्री मधुकरी झालास. पण आतां तूं तपच केलें आहेस तेव्हां आतां तुला कांहीं तरी वर देणं भाग आहे. पुष्कळ पैसा आणि अफाट कीर्ति हीं दोन्हीं तुला एकदम मिळणार नाहींत. तुला पाहिजे असेल तर यांपैकीं एक कांहीं तरी मागून घे.”

गोष्ट चांगलीच रंगली होती. मुलेंच नव्हे तर आम्हीं चौघेहि एकाग्र मन करून गोष्ट ऐकत होतों.

मास्तर सांगूं लागले —‘ सगळ्या जगाचा संताप त्यांच्या डोळ्यांत एकत्र झाला होता—’ त्यावर तो गरीब ब्राह्मण देवीला म्हणाला, ‘ मला ब्राह्मणाला पैसा काय करायचा? माझ्या देशांत माझ्याहूनहि भुकेकंगाल असे कोट्यवधि जीव आहेत. त्यांच्या मानानें मी किती तरी श्रीमंत आहे. पण तूं प्रसन्नच झाली आहेस तर एकच मागणी मागतों. मला पुष्कळ पैसा नको पण अफाट कीर्ति दे. ’

देवी म्हणाली, ‘ तथास्तु ’ आणि सिंहावरून जातां जातां तिनं सांगितलं, ‘—पलीकडल्या धुळवाडी गांवांत जा आणि आंतरराष्ट्रीय कीर्तीच्या नं. १च्या प्रायमरी शाळेंत बालवर्गाचा मास्तर हो.’

—वाङ्मयशोभा, मार्च १९४६

---

# सगळ्यांमिळून सर्व कांहीं !



जगांत सगळ्यानांच देवता प्रसन्न होऊन इच्छित देतात कीं नाहीं माहीत नाहीं. पण निदान चॉमिनच्या बाबतींत मात्र सर्व देवता सदासर्वकाळ प्रसन्न असत. इच्छामात्रेंकरून त्याला सर्व इष्ट गोष्टी लाभत; एवढेंच नव्हे तर त्याच्या सर्व गरजा उत्पन्न होतांक्षणींच पूर्ण होत. आणि शेजाऱ्यापाजाऱ्याना या गोष्टीचें नेहमीं किंचित् असूयापूर्ण नवल वाटे. चॉमिनूला स्वतःला मात्र याचें थोडेंहि आश्चर्य वाटत नसे. कारण त्याची अशी श्रद्धा होती कीं, तो ज्या अर्थीं सर्व देवतांची न चुकतां नित्यनियमानें आवर्जून आणि प्रत्येक देवतेचे स्वभावविशेष लक्षांत घेऊन अशी उपासना करीत असे, त्या अर्थीं संतुष्ट होऊन या सर्व देवता अनंत हस्तें त्याच्या संसारांस हातभार लावीत होत्या. अर्थात् या श्रद्धेमुळें त्याला आश्चर्य वाटलें नाहीं तरी कृतज्ञता मात्र पुरेपूर वाटत असे आणि जास्त श्रद्धायुक्त अंतःकरणानें आणि जास्त लक्षपूर्वक प्रत्येक देवतेची सेवा आणि उपासना करून तिचा नैवेद्य तो तिला पावता करीत असे. आणि मग उलट आणखी जास्त प्रसन्न होऊन त्या देवता त्याच्या वैभवांत जास्त जास्तच भर दिवसेंदिवस घालीत होत्या. आणि या क्रमानें गेलीं कित्येक वर्षें चॉमिनच्या वैभवाची गणितश्रेढीनें वाढ होत होती.

अबादिआनो या खेड्यांत चॉमिन ज्या वेळीं प्रथम राहावयास आला तेव्हांचा आणि आजचा चॉमिन यांत जमीनअस्मानाचें अंतर होतें. त्या वेळीं एक बायको, एक कुत्रा आणि दोन कांबळीं एवढीच त्याची मत्ता होती; तर आज त्याच्या त्या गांवांतच नव्हे, तर त्या सबंध प्रांतांत त्याच्याइतकें श्रीमंत कोणीहि नव्हतें. आणि या सर्व घटनेबद्दल स्वतःच्या कर्तृत्वापेक्षां

त्याच्या भाविक अंतःकरणाला त्या एकाहून एक सामर्थ्यवान् देवतांच्या कृपाप्रसादानेंच हें सर्व मिळतें असें वाटून, त्यांच्याबद्दलचा त्याचा आदर पराकोटीला पोंचला होता. त्याची अशी निश्चित खात्री झाली होती कीं, भूमिदेवता आणि वरुणदेवता यांच्या कृपेनें एरवीं ज्या एक पायली गव्हाच्या पिकून सोळा पायली व्हावयाच्या, त्या याच्या शेतांत मात्र बत्तीस पायली होत. भयंकर वादळ एकादे वेळीं होऊन वज्राघात झाला तर ती विद्युल्लता त्याच्या घराला आणि शेताला वळसा घालून जात असे; कारण विद्युद्देवतेची त्याजवर कृपा होती आणि अशा तऱ्हेनें ज्या निरनिराळ्या सिद्धी आणि देवता पुराणांतरीं निरनिराळ्या संकल्पपूर्तीकरतां सांगितल्या होत्या त्या झाडून साऱ्या मोजून त्यांच्या मूर्ती त्यानें आणवून त्यांची स्वतःच्या घरांत स्थापना केली होती आणि त्या देवतांची यथाविधि सर्व सोपस्कारांसहित पूजा-अर्चा करणें, आरती करणें, त्यांना नैवेद्य अर्पण करणें वगैरे करण्यांत त्याचा बराच वेळ जात असे.

हा पूजेअर्चेचा मंत्रचाळेपणा शेवटीं इतका वाढला कीं, कुठें एखादे दिवशीं परगावींदेखील जाणें त्याच्या हातून होईना. कारण पूजा अंतरेल ! व दुसरें कोणी तितकी न चुकतां करणार नाहीं, ही काळजी. आणि ही काळजी कां तर जर का यांत थोडी चूक घडली तर आपल्या देवतांचा आपल्यावर कोप होईल आणि मग आपलें दैव फिरेल ही भीति न कळत त्याच्या मनांत ठाण मांडून बसली होती. या भ्रमिष्ट मालकाला त्याला अगदीं साजेलसा बावळा आणि विसरभोळा नोकर मिळाला होता. पेरू हें त्याचें नाव. पेरू हा तसा मोठा आज्ञाधारक आणि चांगला नोकर होता. कष्टाळूपणा आणि प्रेमळपणा या त्याच्या गुणांनीं त्यानें आपल्या मालकाचीच मर्जी संपादन केली होती असें नव्हे, तर त्याच्या मुलीचीहि प्रीति संपादन केली होती. वाचकांना प्रश्न पडेल कीं एका गरीब आणि बावळटपणाच्या थराला जाण्याइतक्या भाबड्या नोकरावर मरायाचें प्रेम बसलें कसें ? तर त्याला उत्तर येवढेंच, पेरू तसा दिसायला धडधाकट आणि नीटस होता आणि सुदैवानें चॉमिनूची या प्रणयप्रकाराला संमति होती आणि पेरूला घरजांवई करून घेण्याचा त्याचा बेत होता. तेव्हां स्त्रियांच्या दृष्टीनें ज्या दोन मुख्य गोष्टी रूप आणि पैसा त्या दोन्ही अनुकूल होत्या आणि आपला नवरा रूपवान्

आणि पैसेवाला असला म्हणजे तो शहाणाच असला पाहिजे असा कांहीं बायकांचा आग्रह नसतो. तीच गोष्ट मरायाच्या बाबतींतहि खरी होती; म्हणूनच पेरूचा अजागळपणा तिच्या प्रेमाच्या आड येऊं शकला नाहीं.

अशा तऱ्हेनें दिवस जात होते आणि मरायाचें वय व वयाबरोबर प्रेमहि वाढत होतें. आणि शेवटीं एक दिवस याचें आतां लौकरच लग्न करून देऊन संसार थाटून दिला पाहिजे असें चॉमिनच्या मनानें घेतलें. तो एक दिवस पेरूला म्हणाला.

' हें बघ पेरू, तुमच्या लग्नांत तुम्हांला एक उत्कृष्ट बैलांची जोडी आंदण म्हणून द्यायची माझी इच्छा आहे; आणि ती जोडी म्हणजे स्पेन देशांतील सर्वांत उत्कृष्ट बैलाची असावी अशीहि माझी इच्छा आहे. तेव्हां त्यांची खरेदी, आठ पंधरा दिवसांत सगळे बाजार हिंडून मी स्वतः करणार आहे. पण माझी अडचण तुला माहीत आहेच नेहमींची आणि तीच काळजी आजहि आहे. मी बाहेरगांवीं गेलों म्हणजे आठ-पंधरा दिवस किंवा कदाचित् महिनाभरहि येणार नाहीं; आणि मग आपल्या सगळ्या देवतांची पूजाअर्चा आणि नैवद्यसमर्पण रोज व्यवस्थित घडतें आहे कीं नाहीं याची काळजी मला बाहेर कांहीं सुचूं देणार नाहीं.'

' पण मग मी आहे ना ? मी सर्व कांहीं व्यवस्थित करीन; शिवाय माझ्या मदतीला ही मराया आहेच ना ! तिला तर माझ्यापेक्षांहि प्रत्येक देवतेच्या नैवेद्याची नीट माहिती आहे. नाहीं का मराया ? आपण दोघे सहज संभाळूं हें ! ' त्यानें असें म्हणतांच मरायाचे गाल लज्जेनें आरक्त झाले.

' तें ठीक आहे रे; पण तुमच्या एकमेकांच्या नादांत एखाद्या देवतेची पूजा राहिली म्हणजे तिचा माझ्यावर कोप होईल. परवांच नाहीं त्या जत्रेच्या वेळीं मी तुला तिथल्या देवीला कोंबडं अर्पण करायला पाठवला तर तूं त्या देवीच्या वाहनालाच तें कोंबडं वाहिलंस ! असा तर तूं विसरभोळा.' चॉमिन्नें असें म्हणतांच आरक्तकपोल व्हायची पाळी पेरूची होती आणि तेंहि लज्जेनें नव्हे तर शरमेमुळें. कारण त्याच्या विलक्षण विसरभोळेपणामुळें तसा प्रकार झाला होता खरा.

'पण तें असो,' चॉमिनू पुढें म्हणाला, 'या वेळीं जर सर्व व्यवस्थित पार पाडण्याची तूं खात्री देत असलास तरच तुझ्या भरंवशावर मी जातों.'

'खरंच या वेळीं माझ्या हातून अशी चूक होणार नाहीं.'

'मग ठीक आहे. मी आज रात्रीं जातों. पण तुझ्या हातून सर्व व्यवस्थित झालें नाहीं तर माझ्या देवतांचा माझ्यावर कांहीं तरी कोप खास होईल आणि तसें झालें तर मात्र तुझी चूक झाली असें समजून मी मराया तुला देणार नाहीं. काय आलें लक्षांत ?'

'हो' म्हणण्यावांचून पेरूला गत्यंतरच नव्हतें.

* * *

'माझ्या मरायाला आणि पेरूला संभाळून घ्या' असें देवतांना मनांतल्या मनांत म्हणत, जड अंतःकरणानें चॉमिनू प्रवासास निघाला. आणि जड अंतःकरणानेंच पेरू रोजच्या उद्योगाला लागला. पण आज त्याचें कशांतच लक्ष नव्हतें. मध्येंच हातांतलें काम टाकून तो चॉमिनूनें जवळ जवळ पाठ करून घेतलेल्या पूजेचा व नैवेद्याचा क्रम मनाशीं आठवीत बसे. हो, एखादे वेळीं एखाद्या देवतेचा नैवेद्य दाखवायचा चुकून राहून गेला तर पंचाईत व्हायची. चॉमिनूवर त्या देवतेचा कोप व्हायचा व मग मराया हातची जायची ! आपल्या प्रियकराची ही मनोव्यथा पाहून मरायाहि हिरमुसली होऊन बसली होती.

वास्तविक आतां त्यांच्या लग्नाचें नक्की ठरलें होतें. आज बाप घरांत नसल्यानें तिला थोडें जास्त स्वातंत्र्यहि होतें. तेव्हां आतां प्रियकराच्या संगतींत थोडे दिवस मौजेनें घालवितां येणार होते. त्या दिवशीं संध्याकाळीं गांवांत कसलासा उत्सव होता व त्या दिवशीं तिथें गांवकरी नृत्याचा कार्यक्रम करीत. दर उत्सवांत पेरू व मराया दोघेंहि या कार्यक्रमांत पुढाकार घेत. पण आज दोघांपैकीं कोणीच या नृत्याच्या कार्यक्रमाला हजर नव्हतें, त्यामळें गांवकऱ्यांतहि उत्साह नव्हता व त्यांचे सारखे निरोप येत होते.

भक्तांची काळजी देवतांना. आणि म्हणूनच कीं काय पेरूला आपल्या काळजींतून सोडविणारी एक सुंदर युक्ति सांपडली व त्या आनंदांत तो एकदम उडी मारून उठला आणि मरींयाचा हात धरून जवळ जवळ तिला ओढीतच गांवांतील नृत्याच्या ठिकाणीं जाऊन तिच्यासह नृत्यांत सामील

झाला. पेरूला कोणती युक्ति सुचली हें जरी मराय्याच्या लक्षांत न आलें तरी बिंब-प्रतिबिंब न्यायानें प्रियकर आनंदित झालेला बघून तीहि आनंदित झाली. पेरूला ही युक्ति सुचविण्यांत चॉमिन्च्या देवतांनाहि तें सुंदर नृत्य पाहावयाचा स्वार्थ साधावयाचा होता कीं काय कोण जाणे ! कारण जणूं काय सर्व देवता नृत्य पाहावयास जमल्या आहेत असें पेरूला वाटूनच तो अतिशय तन्मयतेनें नाचत व गात होता.

दुसरे दिवशीं पूजेच्या वेळीं पेरूनें काय युक्ति शोधून काढली आहे, हें पाहावयाला मराया उत्सुक झाली होती.

पूजेचे वेळीं यथायोग्य रीतीनें चॉमिन्च्या सर्व देवतांची प्रार्थना वगैरे करून पेरूनें धूप वगैरे जाळला आणि मरायाला सर्व देवतांचे नैवेद्य नेहमीं-प्रमाणें निरनिराळे न आणतां एका मोठ्या थाळ्यांत एकत्रच आणावयास सांगितलें. तें ऐकून मराया चकित झाली. पेरूनें तिला गप्प राहण्याची खूण केली. मरायानें तो नैवेद्याचा थाळा आणून ठेवतांच पेरूनें हात जोडून सर्व देवतांची प्रार्थना केली : ' हे देवतांनों, तुमच्यापैकींच एकीचा-वरुण-देवतेचा काल गांवांत उत्सव होता. त्या वेळीं त्यांत दरवर्षीप्रमाणें भक्ति-भावानें भाग घेणें माझें कर्तव्यच होतें. त्या प्रसंगीं तुमची करमणूक करतांना मी गुंगून गेलों होतों. त्या आनंदाची धुंदी अजूनहि उतरलेली नाहीं. अर्थातच तुमच्यापैकीं प्रत्येकीचा स्वतंत्र नैवेद्य कोणता हें मी विसरलों आहे. तुमच्यापैकींदेखील कांहीं अजूनहि उत्सवाच्या ठिकाणीं रेंगाळत असतील. म्हणून मी अत्यंत नम्रपणें प्रार्थना करतों कीं, तुम्हां सर्व देवतांना — येथें असलेल्या व हिंडण्याफिरण्याकरितां बाहेर गेलेल्य देवतांनाही — हा सर्व नैवेद्य सगळ्यांमिळून सारखा वांटून घेण्याकरित अर्पण असो. '

वाङ्मयशोभा, मार्च १९४२

# दुसरी सांवली १०

झाडाला बांधलेल्या एखाद्या छानशा झोपाळ्यावर उभें राहून मोठ्या मजेंत खूप झोके घेत असावं आणि तेवढ्यांत एक दोरी तुटून हिसका बसावा तसं त्या दिवशीं मंडईत भाजी घेतांना मला झालं होतं. जुलै महिन्यांतला अखेरचा केव्हांचा तरी दिवस. पुण्यांत पावसाळा अगदीं रंगांत आला होता. चार आठ दिवस आधीं खूपच पाऊस पडून गेला असला तरी त्या दिवशीं उघडीक पडण्याचीं चिन्हं दिसत होतीं. आणि म्हणूनच मला सरलेसह मंडईत जाऊन भाजी व फळें आणण्याची इच्छा झाली होती. आणि तें साहजिकच नव्हतं का ? माझ्या नवपरिणीत वधूसह पुणें मुक्कामीं माडीवाले कॉलनींत बिऱ्हाड थाटून मला अवघे पांचच दिवस झाले होते. आणि आल्यापासून पावसानं कहर मांडलेला. त्यांत आज जरा उसंत मिळालेली; आणि शिवाय रविवार—म्हणूनच अस्मादिकांनीं पत्नीसहवर्तमान मंडईस भेट देण्याचं ठरविलं होतं.

ज्यांनीं पूर्वीच्या पुण्यांतील घाणेरडे रस्ते पाहिले आहेत, त्यांचें अत्र्यांनीं केलेलें काव्यमय वर्णन वाचलें आहे, त्यांना हल्लींच्या पुण्यांतील पुष्कळसे स्वच्छ डांबरी रस्ते पाहून कौतुक वाटल्याशिवाय खचित राहणार नाहीं. सरला पूर्वी कधीं पुण्यास आलेली नसल्यामुळें आणि सामान्यपणें नवरा हा बायकोपुरता तरी सर्व विद्यापारंगत असल्यामुळें, ऐतिहासिक कालांतील पुण्यांतील रस्ते व आजचे रस्ते यांतील फरक मी तिला समजावून सांगत होतों व तदनुषंगानेंच एका कवितेंत या रस्त्यांचं पावसाळ्यांतील वर्णन अत्र्यांनीं किती सुरेख व गमतीचं केलं आहे तें सांगून माझी वाङ्मयाची आवडहि तिच्या नजरेस

आणीत होतों. आणि त्या वेळीं तरी तिच्या नजरेंत माझ्याबद्दलचा कौतुकपूर्ण आदरच दिसून येत होता. आम्ही मंडईत पोंचलों आणि कांहीं खरेदी करून परत फिरणार इतक्यांत जरा दूर एका पाटींत केवड्याचीं चार दोन् कणसं सरलेच्या दृष्टीस पडलीं. त्याबरोबर 'अगबाई केवडा!' असं म्हणत सरला घाईनं तिकडे गेली. त्या दिवशींच सकाळीं दर्शन देणाऱ्या सूर्याचे किरण एकंदर वस्तुंना सोनेरी तजेला देत होते. पावसाची ओल पूर्णपणें वाळली नव्हती म्हणून सरला ओचे थोडे वर धरून चालली होती, आणि तिच्या गौरवर्ण आणि बांधेसूद पोटऱ्या सूर्यप्रकाशामुळें सौंदर्यांत त्या केवड्याच्या कणसांशीं स्पर्धा करीत होत्या. माझ्या मनांत ही उपमा येतांच ती सरलेला सांगावी म्हणजे तिच्या दृष्टींत मजबद्दल दिसणाऱ्या कौतुकांत आणखी थोडी भर पडेल असें मला वाटलें. इतक्यांत—

मला कोणी तरी 'श्रीधरपंत' म्हणून मोठमोठ्यांदा हांका मारीत आहेसं वाटलं व आवाजहि ओळखीचा वाटला म्हणून मीं मागें वळून पाहिलं. तोंच आमचे जुने मालक आणि दोस्त दाजीबा दृष्टीस पडतांच मी सर्दच झालों. सकाळच्या त्या कोंवळया उन्हांत देखील माझ्या कपाळावर घर्मबिंदु चमकूं लागले आणि शेवटीं नको होतं तेंच झालं. मी गडबडींत आहे असें सांगून निसटण्याचा प्रयत्न करीत होतों पण ते कसले मला जाऊं देतात. 'वा पंत! ही काय भाषा झाली. अरे निदान गेल्या दीड वर्षांत एखादं पत्र तरी पाठवायचं.' इतक्यांत वज्रचुडेमंडित सरलाबाई पण आमचे शेजारीं येऊन उभ्या ठाकल्या. त्या गृहस्थाचा गळेपडूपणा व माझी त्याच्या कचाट्यांतून सुटण्याची धडपड पाहून ती थोडी चकित झाली. येवढ्यांत दाजीबांना पुनः स्फुरण चढलं. ते म्हणाले, 'वा, राव, तुम्ही गेलांत आणि आमच्या बनीचा अभ्यास संपला. ती म्हणते श्रीधरभाऊंनीं उदाहरणं शिकवलीं तरच मला पास होतां येईल. पण तुम्हांला कुठून आणायचं शोधून? तुमचा पत्ता पाहिजे ना? आम्ही म्हणत होतों घरांतल्या घरांत जमलं तर तुमचीहि सोय झाली आणि आम्हांलाहि बरं.'

ह्यांची मेलगाडी कशी थांबवावी या विवंचनेंत मी होतों तोंच त्यांचं लक्ष शेजारीं येऊन उभ्या राहिलेल्या सरलेकडे गेलं. 'या कोण? तुमच्या भगिनी वाटतं; वाटलंच मला!' 'अहो दाजीबा, तसं कांहीं नाहीं, ही माझी

पत्नी सरला.' मी जरा चिडूनच उत्तर दिलं पण माझं चिडणं त्यांच्या गांवींहि नव्हतं.

'म्हणजे ही आपली दुसरी सांवली वाटतं. अस्सं, अस्सं! वाटलंच मला! पण श्रीधरपंत, तुम्ही आमचा बनीबद्दलचा बेत मात्र हुकवलांत हं! पण समजा! आमच्याकडे चहाला केव्हां येणार? आणि ह्यांना घेऊन आलं पाहिजे बरं का?'

या सर्व प्रकारानं सरलेच्या डोळ्यांत संशयाचं पिशाच्च उत्पन्न झालेलं दिसत होतं. कारण दाजीबांना आवरतां आवरतां मी मधून मधून तिच्याकडे बघत होतों. शेवटीं कशीबशी एकदां स्वतःची सुटका करून घेऊन मी सरलेला म्हटलं, 'चल आपण आतां घरीं टांग्यानेंच जाऊं' आणि तिच्या फुरंगटलेल्या नजरेकडे लक्ष न देतां एका टांग्याला हांक मारली आणि आंत बसलों. सरलाहि मुकाट्यानं आंत बसली. तेवढ्यांत दाजीबा टांग्याजवळ येऊन म्हणाले, 'पण या बरं का पंत, अवश्य या. मी बनीला सांगतोंच तुझे श्रीधरभाऊ आलेत असं. आम्हांला माहीत आहे तुम्हांला बनीच्या हातचा चहा आवडतो म्हणून.'

'बनीच्या बापा जा आतां' असें चडफडत तोंडांतल्या तोंडांत मी पुटपुटलों. आणि हातानें त्यांना 'ठीक आहे' अशी खूण करून टांगेवाल्यास टांगा हाकलण्यास सांगितलें.

येवढ्यांत सूर्य पुन्हा ढगांत लपला होता. समोर केळींच्या सालपटावरून एक इसम पडलेला पाहून लोक हंसत होते आणि तो शरमिंदा झाला होता. आणि टांग्यांत सरलेच्या तोंडावरचें हसूं मावळून गैरसमजाच्या पिशाचानें तेथें ठाण मांडल्यामुळें मी पण मनांतल्यामनांत चोरट्यासारखा होऊन गुपचूप बसलों होतों. घर येईपर्यंत मी सरलेचा राग कसा घालवावा याचा विचार करीत होतों. घराशीं टांगा थांबला आणि आम्ही फाटकांतून आंत शिरणार तोंच माझा मित्र राजा भावे, मी नाईसें पाहून सायकल घेऊन परत फिरला होता तो दिसला. 'वा दोस्त, आम्ही तुमच्याकडे येतों आणि तुम्ही बाहेर पळतां होय? म्हटलं 'बनीचे यजमान,' आम्ही तुमचा फार वेळ घेणार नाहीं आतां. तुझ्याशीं एक दोन तास गप्पा मारायलाआमच्या वहिनी देखील आम्हांला नको म्हणणार नाहींत.' असें म्हणून त्यानें हंसत

सरलेकडे बघितलें. पण कांहींहि उत्तर न देतां किंवा न हंसतां ती सरळ आंत गेली तेव्हां राजा थोडासा चकित होऊन माझ्याकडे पाहूं लागला. त्याला बिचाऱ्याला काय माहीत कीं, 'बनीचे यजमान' या त्याच्या शब्दानीं आधींच भडकलेल्या आगींत पेट्रोल ओतलें होतें म्हणून! तेव्हां मीं त्याचा हात धरला आणि त्याला आंत नेत म्हटलें, 'माझे आई, बनीबद्दल तुम्ही खूप थट्टा केलीत तरी देखील हा पठ्ठ्या दाजीबाच्या हातावर तुरी देऊन निसटला. पण आतां दाजीबानेंच सूड घ्यायचा ठरविलेला दिसतोय्.' असं म्हणून मी मंडईतील सर्व हकीकत त्याला सांगितली. ती ऐकतांच राजा पोट धरून हंसूं लागला. तेव्हां मीं त्याला म्हटलें, 'लेका, मग खुशाल हंसत बैस; आधीं ती आमची अर्धांगी क्रुद्ध झाली आहे तिची कशी समजूत काढूं ते सांग.'

'अरे, त्याला काय वेळ लागतोय. मुळांतच नसलेल्या गोष्टीबद्दलचा अकारण गैरसमज त्याच प्रसंगावरची एक सुरेख गोष्ट सांगून क्षणात दूर करतां येईल.' हें आमचें संभाषण जरी बाहेरच्या खोलींत चाललें होतें, तरी पलीकडच्या खोलींत असलेल्या सरलेनें तें ऐकलेंच. मंडईमध्यें दाजीबांचे 'दुसरी सांवली' वगैरे शब्दप्रयोग आणि 'बनी'चा वारंवार केलेला उल्लेख वगैरे ऐकल्यामुळें स्त्रियांना सहजसाध्य अशा संशयपिशाच्च्यानें तिच्या डोक्यांत थैमान घालावयास सुरुवात केली होती; श्रीधरची त्या वेळची त्रेधा-तिरपीट पाहून तिचा संशय वाढीस लागला होता; आणि राजाचे शब्द ऐकून तिचा पारा खूपच चढला होता. पण या जोडीचं संभाषण जेव्हां तिच्या थोडथोडें कानांवर पडलें, राजाला खदखदां हसतांना तिनें पाहिलें आणि श्रीधरच्या एकंदर आविर्भावांत बायकोपासून कांहीं तरी लपवून ठेवण्यापेक्षां, तिला, झालेला घोटाळा समजून कसा सांगावा याचीच काळजी जास्त दिसली तेव्हां तिचं डोकं जरा शांत झालं. तरी पण हा बदल कबूल करायला ती तयार नव्हती. ती चहा घेऊन बाहेर आली,—कारण टांग्यांतच श्रीधरनं घरीं गेल्याबरोबर थोडा चहा कर मग मी काय म्हणतों तें ऐक आणि मग माझ्यावर रागाव, असें तिला म्हटलें होतें—तिनें त्यांच्या समोर चहा ठेवला, आणि ती गंभीर चेहऱ्यानंच आंत जाऊं लागली. तेव्हां राजा म्हणाला, 'हें पहा वहिनी, तुमची माझी कांहीं अजून ओळख नाहीं, तरी पण इतक्या रागांत देखील पाहुण्याला चहा देण्याइतक्या तुम्ही मायाळू

दिसतां आहां, तर मग माझी खात्री आहे कीं, तुमचा राग घालवून जर मी तुम्हांला पुनः हंसवलं तर तुम्ही मला खचित् जेवायला राहायचा आग्रह कराल. तेव्हां कृपा करून त्या समोरच्या खुर्चीवर बसा आणि मी सांगतों ती गोष्ट ऐका.

सरला न बोलतांच त्या खुर्चीवर बसली.

*　　*　　*

'बरं का वहिनी,' राजा सांगूं लागला, 'मला पहिल्यापासुन गोष्टी लिहायची फार हौस. पण आमच्या गोष्टी अरेबियन नाइट्स् पेक्षांहि सुरस आणि चमत्कारिक होऊं लागल्यामुळें परत येऊं लागल्या. म्हणून एखाद्या वास्तववादी गोष्टीकरतां मी कथानक हुडकूं लागलों. तें कथानक पुरवलं आमच्या या श्रीधरनं, त्याच्या बनीनं आणि तिच्या दाजीबानं. पण आमची गोष्ट पुरी व्हायची आमच्या नशिबांत नव्हतं म्हणूनच की काय, हा आमचा श्रीधर दाजीबांच्या हातावर तुरी देऊन आणि बनीचा विरस करून पुण्यांतून जो पळाला, तो दीड वर्षांनीं आतां तुमच्यासह उगवतो आहे. त्या दाजीबाला कॉलेजातल्या ब्रह्मचारी पोरांचा मोठा धसका. त्यामुळें लग्न झालेल्या माणसालाच भाड्यानं जागा द्यायची असा त्याचा निश्चय. त्या वेळीं त्याची सोळा वर्षांची बनी चौथींत होती. बारा वर्षांची येसू नुकतीच साडी नेसूं लागली होती आणि तीन वर्षांची बयो चार-पांच वर्षांतच मोठी होण्याचा धोका उत्पन्न झाला होता. आणि म्हणूनच दाजीबा वरील काळजी घेत होते.

'दोन वर्षांपूर्वीची गोष्ट. जून महिना संपत आला होता. आमच्या श्रीधरची नुकतीच पुण्याला चार महिन्यांकरितां बदली झाली होती—'

'ए राजा, तूं थांब जरा आतां. त्यावेळीं आमचे काय हाल झाले आणि नंतर काय मजा आला, त्याची गंमत माझी मलाच नीट सांगतां येईल. ती हकीकत जरी मीं सांगितली तरी गोष्टीचे सर्व हक्क तुझ्या स्वाधीन करायला मी तयार आहे. मग तर झालं कीं नाहीं?' श्रीधर मध्येंच म्हणाला :

नंतर श्रीधर सागूं लागला :'जून महिन्यांतली गोष्ट. मी नुकताच ४।५ दिवसां पूर्वी पुण्याला आलों होतों. महिना संपत आला होता. आणि कॉलेजं सुरू होऊन आठ दिवस वर झाले होते. 'भाड्यानें देणें आहे' च्या पाट्या हळूहळू

नाहींशा होऊं लागल्या होत्या. आणि कॉलेजच्या जवळपास तर त्या अदृश्यच झाल्या होत्या. पुण्यांत पाहिला पाऊस आणि विद्यार्थी बहुधा एकदमच प्रवेश करतात. आणि पहिल्या एक दोन पावसानंतर ज्याप्रमाणें, चार दिवसांपूर्वी उजाड दिसणाऱ्या माळावरहि तृणांकुर उमटायला लागतात आणि वातावरणाचा उजाडपणा नाहींसा करतात, त्याचप्रमाणें कॉलेज उघडल्यानंतर विद्यार्थ्यांची पहिली धाड आली कीं पुण्याच्या वातावरणात नवा ताजेपणा आणि नवा उत्साह संचारूं लागतो. पण या गोष्टीचं नेहमींप्रमाणें कौतुक करायला यावेळीं मात्र मी तयार नव्हतों. कारण जगाचं कौतुक करतांना आत्माराम थंड असावा लागतो. आणि म्हणूनच या खेपेला सर्व मोक्याच्या आणि होऱ्याच्या जागा अडवणाऱ्या कॉलेजयुवकांना मी मनांतल्या मनांत लाखोल्या वाहात होतों. मग कौतुक दूरच राहिलं. कारण अगदीं अचानक बदली झाल्यानं, पुण्याला मला आगाऊ कांहीं व्यवस्था न करतां यावं लागलं आणि कामावर रुजूं होऊन चार पांच दिवस झाले तरी, मनाजोगी जागा न मिळाल्यानं गेस्ट हाऊसचा नि माझा ऋणानुबंध संपण्याचं कांहींच चिन्ह दिसेना.

रोज सकाळ-संध्याकाळ जागा पाहात फिरायचं, जेवायचं आणि ऑफिसांत जायचं एवढाच माझा कार्यक्रम होऊन बसला होता. आणि इतकंहि करून फारशा जागा रिकाम्या नसल्यानं खूप हिंडावं तेव्हां एखाददुसरी पाटी सांपडे आणि आंत जाऊन चौकशी करावी तर कांहीं ना कांहीं कारणानं तिथं जमूं नये. माझी स्थिति जूनच्या अखेरीसहि पुण्यांत तुरळक तुरळक दिसणाऱ्या आणि 'सीझन' संपत आल्यामुळें चेहरा पडूं घातलेल्या वधू-पित्यांप्रमाणें झाली होती. पण त्यांतहि जसे कांहीं 'अजूनहि दोन मुहूर्त आहेत' एवढ्याच आशेवर चेहऱ्यावर ओढून ताणून हास्य आणणारे असतात, त्याचप्रमाणें जागा गेल्या म्हणून काय झालं, आपल्यासारख्या सड्या-फटिंगाला काय कुठंहि एखादी छानशी खोली मिळेल, अशा घमेंडींत मी थोडासा होतों. आणि योगायोगानं घडलहि तसंच !

त्या दिवशीं रविवार होता. आणि आज जागा मिळवायचीच अशी भीष्म प्रतिज्ञा करून अस्मादिक बाहेर पडले होते. नेहमींप्रमाणें दोन-तीन नकार मिळाल्यानंतर कंटाळून एका इराणी रेस्टॉरंटमध्यें चहा प्यावा म्हणून

शिरलों. अजून पावसाळा असा सुरू झाला नव्हता. त्यामुळें इराण्यानें दुकानाबाहेर ठेवलेल्या टेबल-खुर्च्यांची व्यवस्था अजून कायमच होती. म्हणून मीं पण बाहेरच एका खुर्चीवर स्थानापन्न होऊन बोटाच्या खुणेनेंच चहाची ऑर्डर दिली. पोऱ्यानें आत चहाची ऑर्डर ओरडून दिलेली मीं ऐकली. येवढ्यात मी बसलों होतों ती खुर्ची जरा डुगडुगती आहेसं वाटलं, म्हणून ती खुर्ची बदलून रस्त्याकडे तोंड असलेल्या दुसऱ्या खुर्चीवर जाऊन बसलों. तोंच काय आश्चर्य! समोर रस्त्यापलीकडच्या कंपाउंडवर 'भाड्यानें देणें आहे' हीं स्वर्गीय अक्षरें लिहिलेली पाटी दिसली. आज सकाळपासून या रस्त्यानें आपण तीनदां गेलों तरी कशी आपल्याला ही पाटी दिसली नाहीं? असें मनाशीं म्हणत व स्वतःलाच पुष्पांजलि वाहात मी जवळ जवळ धावतच रस्ता ओलांडून त्या आवारात शिरलों. पाठीमागें चहा आणणारा तो पोरगा 'साब चाय' म्हणत पायऱ्या उतरून दारापर्यंत आला आणि कांहींसा चकित होऊन पण शेवटीं चडफडत परत गेला. मी त्या बंगल्याची पुढील मोकळी जागा ओलांडून घरांत शिरणार तोंच मला मागून कोणीं तरी हाक मारली. मागें वळून बघतों तों एक म्हातारे गृहस्थ-बहुधा ते मालकच असावेत अशी त्यांच्या एकंदर आविर्भावावरून मला शंका आली व नंतर ती खरी ठरली—मला 'काय जागा पाहिजे ना?' म्हणून विचारीत होते.

होकारार्थी किंचित् मान हालवून मी त्यांच्याकडे वळलों व हंसून नमस्कार केला. 'आम्ही ओळखलंच तें' 'कोण गृहस्थ भाडेकरी म्हणून आलेला आहे हें आम्ही आग्हीं क्षणांत सांगूं शकतो; आणि भाडेकरी कसा आहे तें पण!' अर्थात् त्यांच्या अनुभवाबद्दल स्मित करून आदर दाखविण्यावांचून मला गत्यंतरच नव्हतें.

'इथं कुठं असतां? सर्व्हिसच आहे ना?'

'मी इथं पोस्टांत मध्यें बदलून आलों आहें.'

'वाटलंच! मग काय कुठं जागा नाहीं मिळाली का? नाहींच मिळायची. अहो, तुमचा आमचा ऋणानुबंध आहे ना. ही आमची जागा गेल्या महिन्यापासूनच रिकामी झाली. पण एकदां रंग वगैरे द्यायचा होता म्हणून पाटी लावली नव्हती सकाळपर्यंत.'

'तरीच बरं का ? या रस्त्यानं मी इतके वेळा गेलों पण पाटी दिसली नाहीं.'

'अहो पाटी नसतांनाच किती तरी लोक येऊन गेले. आतां हीं कॉलेजं झालीं ना सुरू. पण आमचं ठरलेलं आहे कीं, विद्यार्थ्यांकडून भाडं जास्त मिळालं तरी, जागा द्यायची नाहीं. अहो बारा पिंपळावरचे मुंजे हे, आणि आपण पडलों कुटुंबवत्सल माणसं !'

यावर मी कांहीं तरी म्हणणार तोंच आणखी दोघे तरुण तेथें आले व जागेची चौकशी करूं लागले. त्याबरोबर मालकांनीं त्यांच्याकडे आपादमस्तक न्याहाळीत विचारलें, 'स्टूडंटस् ना ? मग नाहीं बुवा जागा. त्यांतून आतां तर आम्हीं ही जागा यांना दिलीच आहे.' ते विद्यार्थी परत फिरले तोंच मालक माझ्याकडे वळून म्हणतात, 'अहो, हीं तरुण अविवाहित मुलं. आपल्या घरांत मुलीबाळी. उगाच risk घ्या कशाला !' त्यांचे हे उद्‌गार ऐकून मी चकितच झालों. आणि मला तरी यांनीं विवाहित आणि पोक्त कसं ठरवलं ? माझं वय लहान असलं तरी चारदोन वर्षें नोकरींत गेल्यानें जबाबदार माणसाचा पोक्तपणा माझ्यांत थोडासा आला होता, हें खरं. पण मला कांहींच न विचारतां यांच्या अंतर्ज्ञानानं मी विवाहित नसतांना मी विवाहित ठरलों, याचं मला आश्चर्य वाटलं. तरी पण मला जागेची अतिशय अडचण असल्यामुळें तूर्त त्यांच्या कलानं घ्यायचं ठरवून जागा दाखवण्या-बद्दल त्यांना मी विनंति केली. आणि त्यांनींहि मोठ्या अगत्यानं मला सर्व जागा दाखविली. जागा खरोखर लहान असली तरी सुरेख होती. अगदीं दोन माणसांच्या संसाराला योग्य म्हणा ना ? घरात ठिकठिकाणीं कोनाडे, कपाटं, धुणं वाळत घालावयाच्या दांड्या वगैरे सोई इतक्या चांगल्या होत्या आणि त्यांचं मालकांनीं इतकं रसभरित वर्णन केलं कीं, या सोईबरोबरच या 'कुटुंबवत्सल' मालकाचे जांवई होऊन 'भाड्यासह संसाराचा' सर्वच प्रश्न एकदम निकालांत काढावा अशी प्रतिभापूर्ण कल्पनाहि क्षणभर माझ्या डोक्यांत येऊन गेली. अर्थात् मालकांच्या मुलीशी म्हणजेच दाजीबांच्या बनीशी परिचय होतांच मी तो बेत रद्द केला, ही गोष्ट वेगळी. दाजीबांनीं माझ्याकडनं भाडं कांहीं फार घेतलं नाहीं. पण त्याऐवजीं बनीच्या शंका निरसन करण्याचं काम, म्हणजे शिकवणी, माझ्यामागें लावून दिली. अर्थात्

एकंदरींत, आचरटपणा वगळला तर तें सर्वच कुटुंब चांगलं असल्यानं व माझी जागेची मुख्य नड त्यांनीं उत्तम रीतीनं भागवल्यामुळें मीहि फारसा नाखूप नव्हतों. आणि मी ' गृहस्थ यानें जबाबदार नागरिक ' आहे असें समजून दाजीबाहि सोळा वर्षांची बनी, बारा वर्षांची येसू आणि तिसरं लागलेली बयो या माझ्याशीं कितीहि मोकळेपणानं वागल्या तरी निर्धास्त होते. आणि कांहीं दिवसांनंतर त्यांची माझ्या वर मर्जी बसली आणि माझी तथाकथित पत्नि माहेरींच स्वर्गवासी झाल्याचं राजाभाऊच्या बहुमोल सल्ल्यावरून मीं त्यांना हळूंहळूं सांगितल्यावर त्यांच्या मनांत मला जांवई करून देण्याची कल्पना आली. अर्थात् मला ती मंजूर नसल्यामुळें आणि पुढें माझी लगेच बदली झाल्यामुळें मला त्यांतून निसटतां आलं, ही गोष्ट वेगळी. '

' आणि बरं का वहिनी ' राजा म्हणाला, ' त्या वेळीं मीं जर श्रीधरला पद्धतशीर थापा मारायला शिकवलं नसतं तर मग श्रीधरची खरीखुरी पंचाईत होती. जर दाजीबांना कळलं असतं कीं, श्रीधर हा एक ब्रह्मचारी आहे आणि थाप मारून आपल्या घरीं राहिला आहे, तर संस्कृति-संरक्षक-मंडळाचीच काय पण वेळप्रसंगीं पोलिसची मदत घेऊन देखील त्यांनीं श्रीधरचे धिंडवडे केले असते. ''

' अरे, तो मला दर चार आठ दिवसांनीं विचारायचा कीं, काय श्रीधरपंत, तुम्ही बाबा कधीं होणार ? कारण विवाहितपण त्यानं माझ्यावर लादल्याघर बायको बाळंतपणाकरितां माहेरीं आहे अशी मी त्यावर थाप दिली होती. पण एकदा हें खोटं कसं तरी बोललों. पण मला येतां जातां त्रास द्यायला लागल्यानंतर चिडून त्याला एकदां मी विवाहित नाहीं म्हणन सांगावं, असं माझ्या मनांत आलं होतं.'

' पण मग महाराज, राजा आवेशानं म्हणाला, ' बायको दाखव नाहीं तर बनी पत्कर ' असा पेच दाजीबानं टाकला असता. आणि मग Lady or the Tiger या धर्तीवर, बेअब्रू कीं बनी ? काय पत्करायचं असा प्रश्न या हॅम्लेटसमोर येऊन पडला असता. पण या पठ्ठयानं तुला वेळोवेळीं सल्ला दिला आणि म्हणूनच—'

' आजचा हा प्रसंग आला ' श्रीधर म्हणाला — ' त्या वेळीं इतक्या

उचापती केल्या नसत्या तर आज हें वादळ कशाला उत्पन्न झालं असतं ?

'अरे पण हें चहाच्या पेल्यांतलं वादळ चहाच्या पेल्यानंच संपायचं; होय कीं नाहीं वहिनी ?' सरलेकडे पाहात राजा म्हणाला. इतक्या वेळांत तिच्या चेहऱ्यावरचा गंभीरपणा जाऊन तिथं हंसूं खेळूं लागलं होतं. खुर्चीवरून उठत ती म्हणाली, 'चहाच्या पेल्यांतलं वादळ संपवायला मी तुम्हांला चहा तर पुन्हां करून देतेंच भावजी, आणि नंतर तुम्ही जेवायला राहणार हेंहि ठरलंच. तरी पण तुमच्या एकुलत्या एका वास्तववादी गोष्टीला पुरतं कथानक मींच पुरवलं नाहीं का ? मग त्याबद्दल तुम्ही आम्हांला कधीं फीस्ट देणार ?'

—वाङ्मयशोभा, ऑगस्ट १९४२

# ‘ चोराच्या उलट्या ’ ११

‘ चोराच्या उलट्या ’ हा वाक्प्रचार मीं लहानपणापासून ऐकलेला आहे आणि तेव्हांपासूनच सवंगड्यांच्या भांडणांत त्याचा उपयोग अर्थ न कळतांच ( आणि बहुतेक विद्वान् लोक असेंच करतात असें मला पुढें कळलें ) मी सर्रास करूं लागलों. नंतर अलीकडे आमच्या बुद्धिबलवर्धक चर्चामंडळांत अनेक जुन्या म्हणी आणि वाक्प्रचार यांचीं पाळेंमुळें शोधून काढण्याचा खटाटोप सुरूं झाला. एक दिवस या रोजच्या त्रासाला कंटाळून या चर्चेत नेहमीं पुढाकार घेणारा आमच्यांतील एक जण म्हणाला ‘ आज सर्व चर्चा व चावटपणा बंद बरं का. आज आपण ब्रिज खेळूं या.’ त्याबरोबर मी माझें अल्प ज्ञान उपयोगांत आणून ताडकन् म्हणालों, ‘ या पाहिल्यात का चोराच्या उलट्या. या चावटपणाची सुरुवात कोणी केली ? तूं कीं आम्ही ? ’ त्याबरोबर एकजण म्हणाला, ‘ खामोष ! हा आणखी एक वाक्प्रचार मिळाला. आतां प्रथम त्याचा पंचनामा झाला पाहिजे. आतां ब्रिज बंद.’ ‘ ब्रिज खेळूं या,’ म्हणणारा मित्र हट्टाला पेटला होता. तो म्हणाला, ‘ तें कांहीं नाहीं; आज कोठल्याहि बौद्धिक चर्चेचे डोस पाजायला व प्यायला आपण तयार नाहीं. आज ब्रिजच खेळलें पाहिजे.’

इतक्या वेळ जरा बाजूला पान-तंबाखू खात बसलेले एक वृद्ध गृहस्थ थोड्याशा कुतूहलानें आमच्यांत येऊन बसले. आमच्या क्लबांत नेहमीं येणारांपैकींच ते एक होते. पण वयस्क मंडळींचा गट आपोआपच पडत चालला असल्यामुळें आमच्या बु. ब. व. चर्चामंडळांत ते क्वचितच येत. ते म्हणाले, ‘ काय हो ! आज कोठल्या म्हणीची चिरफाड चालली आहे.’

'चर्चा कीं ब्रिज हेंच अजून ठरायचं आहे!' आणि मी त्यांना आमचें सर्व बोलणें सांगितलें. त्यावर त्यांनीं एक तोड काढली. ते म्हणाले, 'मी तुम्हांला एक घडलेली गोष्ट सांगतों, म्हणजे तुम्हाला या वाक्प्रचाराचा एक संभवनीय उगम कळेल, आणि खेळ बुडाला तरी अर्धघटका तुमची करमणूकहि होईल.' हा मधला मार्ग सगळ्यांनाच पटला.

तंबाखूचा एक बार भरून ते सांगूं लागले, 'आमच्या ××× गांवचा यादवराव पाटील म्हणजे मोठा जबर असामी. आमच्या गांवांतच नव्हे, तर आसपासच्या एकशेपांच खेड्यांतदेखील त्याच्या नांवाचा मोठा दरारा असे. साधारणपणें पीकपाणी गोळा होऊन कणग्या भरल्या गेल्या कीं, गांवांत चोऱ्या व्हावयाला आरंभ व्हावयाचा. खेडेगांवांतून चोराचिलटांचा उपद्रव म्हणजे मोठी अपूर्वाईची गोष्ट नसते. पोलिस बंदोबस्तहि बेताचाच असतो, आणि त्यामुळें गावकऱ्यांनाच आपल्या घरादारांची काळजी घ्यावी लागते. पण आमच्या गांवांत पाटलाच्या भीतीनें हा उपद्रव बराचसा कमी असे. आणि खुद्द पाटलाच्या घराकडे तर नजर वर करून पाहावयाची चोरट्यांची छाती नव्हती. पाटलाचे दोघे मुलगेहि चांगले तयार गडी असून त्यांची बापाला उत्तम साथ असे. शिवाय दारांत एखादा जागल्याहि असावयाचा.

'पण कितीहि केलं तरी प्रत्येकावर प्रसंग केव्हांना केव्हां तरी येतोच व त्याचवेळीं माणसाची पारख होते. अशी परीक्षा होण्याचा प्रसंग एक दिवस पाटलाच्या बायकोवर आला. त्या दिवशीं यादवराव पाटील आपल्या दोन मुलांना घेऊन कुठं जवळपास खेड्यांत जत्रा होती तेथें गेला होता. घरांत पाटलाची बायको, दोघी सुना, आणि त्यांचीं लहान मुलं एवढींच काय तीं माणसं होतीं. जातांना पाटील दारावरच्या जागल्यास नीट लक्ष ठेवण्यास सांगून गेले होते. आजपर्यंत कधींच कांहीं त्यांना चोराचिलटांचा उपद्रव न झाल्यानें घरांतील सर्व माणसें गाढ झोंपीं गेलीं होतीं. पाटील असे केव्हां केव्हां बाहेर जात असत. त्यामुळें त्यांत फारसें विशेषहि कांहीं नव्हतें.'

पण आज घरांत कोणीच पुरुषमनुष्य नाहीं याचा चोरांनीं तपास काढला होता. मध्यरात्रीचा दोनतीनचा सुमार असेल. पाटलाची बायको कसल्या तरी चाहुलीनें जागी झाली. दाराबाहेर भिंतीपाशीं कांहीं तरी खरखरल्याचा आवाज झाल्यासारखा तिला वाटला. एक क्षणभर शांतता होती, आणि

पुन्हां आवाज येऊं लागला. बाईनें नीट कानोसा घेतला. तिनें ओळखलें कीं, कधीं नव्हे ती आपल्या घराची पाळी आली आहे व या वेळीं आपल्या अक्कलहुशारीवरच प्रसंग निभावून जाणें न जाणें हें अवलंबून आहे. आरडा-ओरडा करण्यातहि अर्थ नाहीं. कारण बाहेर चाहूलहि चागली चारपाच माणसांची लागत होती. म्हातारी हळूच उठली आणि तिनें आपल्या सुनांना हालवून जागें केलें आणि खुणेनें चूप राहण्यास बजावलें. मग तिनें एक लुगडें घेऊन त्याचा सरकफास तयार केला आणि त्याचीं दोन टोकें सुनांच्या हातांत देऊन त्यांना दरवाजाच्या दोन बाजूस उभे केलें. इतका वेळपर्यंत भिंतींतील पोखरणें बरेंच झालें होतें. आणि आंतहि कोयंड्यापासची माती पडूं लागली होती. दार म्हणजे एकच फळी असून त्याची कडी भिंतीच्या कोयंड्याला अडकविण्याची सोय केलेली होती. कोयंड्याजवळ भिंतीला भोंक पाडून आंत हात घालून कडी काढावयाची आणि एकदां दार उघडलें कीं, मग बायकामाणसांना दमदाटी देऊन आपलें काम साधावयाचें असा चोरट्यांचा विचार असावा.

भिंतीला भोंक तर पडलें आणि त्यांतून एक हात आंत आला. बिचाऱ्याला माहीत नव्हतें कीं, आपल्या हाताभोंवतीं फांसाचें कडें आहे! म्हातारी तयारच होती. हात आत आला मात्र; पण तो कडीशीं जाण्यापूर्वीच म्हतारीनें फांस आवळला. आणि तिच्या दोघी सुनांनीं दोन्हीं बाजूंचीं टोकें पक्कीं ओढून धरली. चोरट्यानें हात ओढून घेण्याची धडपड सुरूं केली. तें साधेना तेव्हां बाहेरून दम द्यावयास सुरुवात केली, 'पाटलीणबाई, मुकाट्यानें दार उघड. नाहीं तर दार फोडून आत येऊं!'

'मेल्या, मग आधींच कां नाहीं फोडलेंस! हे बायकी धंदे कशाला केलेस?'

'गमजा करतेस काय? मी एकटा नाहीं. आणखीन् चार जण आणले आहेत!'

थांब चाडाळा! आणखीन् चारशें जमा होतील आणि ते तुलाच जमा करावयास लावते. चोर तो चोर आणि वर शिरजोर! पण मी आहे ना चोरावर मोर! चोर हातांत सांपडला होता. आणि विजयश्री म्हातारीच्या अंगीं संचारली होती. म्हातारीनं तावातावानं घरांतील रॉकेलची दिवली आणली आणि चोराच्या हाताला लावली. आणि मग मात्र चोराचं धाबं

दणाणलं. आंतला हात सुटावयाचा दूरच राहिला पण जळण्याच्या यातनांची उलट भरच पडली. मग मात्र बाहेरच्या एकाच हातानें शंखध्वनि करण्याची आपत्ति त्याच्यावर कोसळली. अवघ्या दोन-तीन मिनिटांच्या अवधींत त्याचे चौघे साथीदार पळून गेले आणि चारशें गांवकरी त्या 'चोराच्या उलट्या' ऐकून त्याची धिंड काढण्यास जमा झाले.

गोष्ट सांगून संपली आणि त्या गृहस्थानीं पुन्हां एकदां तंबाखूचा बार भरला. पोटभर हंसून झाल्यानंतर मी म्हणालों, आज मला ' चोराच्या उलट्या ' हा वाक्प्रचार कशावरून पडला तें समजलें आणि त्याबरोबरच 'चोर तो चोर आणि वर शिरजोर' आणि 'चोरावर मोर' हे दोन नवे वाक्प्रचार पक्के लक्षांत राहिले. धन्य पाटलीणबाई !

—वाङ्मयशोभा, जानेवारी १९४५.

---

# तिचे डोळे १२

त्याला वाटे ती वृत्तीनं थंड आणि शुष्क आहे. प्रेमाचा झरा तिच्या अंतःकरणातून स्रवत नाहीं. ती स्त्री होती. स्त्री ही प्रेमखनि असते, असें त्यानें आधुनिक कादंबऱ्या व गोष्टीतून वाचलें होतें. कादंबऱ्यांतूनच का पुराणातूनहि स्त्री ही प्रेममूर्ति दाखविली असल्याचे दाखले त्यानें अभ्यासपूर्वक पाहून ठेवले होते. पण सुशीला त्याच्या कल्पनाकसोटीला उतरत नसल्यामुळें तो नाखूष होता. घरांत कोणीतरी पाहुणे यायचे असावेत. लहान मुलाला सांगून ठेवावें कीं, ' बाळ, चार दिवसानीं किनई घरात मोठे पाहुणे यायचे आहेत. शहाणा हो बरं का ! ' ही संथा चार दिवस रोज देत जावी. त्या चार दिवसात बाळ आपल्या कल्पनाचक्षूंसमोर पाहुण्याची भव्य मूर्ति उभी करुन पाहुणे असे असतील, ते मोठे आहेत त्या अर्थी त्यांना चांगली मोठी दाढी असेल वगैरे वगैरे कल्पना करीत असतो. आणि पाहुणे यावे ते अगदीं उलट असावेत; म्हणजे त्याच्या कल्पनेला जो धक्का बसतो तशा तऱ्हेचा धक्का विनायकाच्या कल्पनेला बसला होता. मग त्याच्या कल्पनासृष्टीतील प्रेम-मूर्ति म्हणजे ' डोंगरे बालामृताच्या कॅलेंडरवरील तागडी धरणारी होती, कीं हिंदुस्तानच्या सीमानीं ऊखडलेली हिंददेवी होती, का आणखी कोणी होती कोणास ठाऊक ! ' पण त्याच्या कल्पनेप्रमाणें सुशीला प्रेममूर्ति नव्हती, एवढें खरें.

मग ती त्याची झाली कशी ? तिच्याजवळ जर याला प्रेम दिसलें नाहीं तर त्यानें तिला जन्माची सोबतीण म्हणून पसंत केली कशी ? त्याचें वाचन दांडगें होतें. हल्लींच्या काळाशीं त्याचा परिचय होता. म्हणजे तो त्यांतलाच होता. प्रीतिविवाहाच्या तो विरुद्ध नव्हता. ' सहवासोत्तर विवाह ' की

'विवाहोत्तर सहवास' या विषयावर कॉलेज डीबेटमध्यें वाद होतांना मुष्टि–आघातांनीं टेबलें फुटलेलीं त्यानें बघितलीं होतीं. ( म्हणजे हे विषय त्याला माहीत होते. मीं आपला एक कुठला तरी अलंकार वापरला आहे येवढेंच. जसें पानपतास एक लाख बांगडी फुटली. ) सगळ्या गोष्टी खऱ्या. पण असें झालें खरें. कसें तें पाहा.

त्याला काय मोठी घमेंड होती कीं, आपल्याला नेत्रपरीक्षा चांगली आहे. ( तो डोळ्याचा डॉक्टर नव्हता बरें का ! ) मनुष्याच्या अंतःकरणांतले भाव त्याच्या डोळ्यांत उतरतात आणि त्यावरून कळतं, माणूस कसं आहे, काय आहे तें; आणि त्यानं जरी प्रीतिविवाह केला नव्हता तरी त्यानें लग्नापूर्वी ज्या मुली पाहिल्या त्यांत हिचे डोळे त्याला फार आवडले. त्याला वाटलें, बस्स, आपल्याला जें कांहीं पाहिजे तें हिच्या डोळ्यांत आहे. आतां तुम्हीं विचाराल, त्यानें लग्नापूर्वी पुरी पारख करून प्रीतिविवाह का केला नाहीं ? आता तें कसें बरें मी सागूं ! असतील कांहीं तरी कारणें. तो उत्तम 'स्पोर्ट' नसेल ! त्याला लोकांच्या नजरेत भरण्याचें Skill नसेल ! किंवा त्याचें असें आहे, त्याला योग्य Chance हि मिळाला नसेल ! त्याची गंमत अशी कीं एखाद्या कॉलेजांत पांच-पन्नास मुली असल्या अन् हजार पांचशें मुलगे असले तर सगळ्यांनाच कसा Chance मिळायचा ? चालायचंच हें जगांत.

विनायकला चार मुली सांगून आल्या होत्या. वडिलांनीं सांगितलें मुली पाहा म्हणून. यानें एक मुलगी पसंत केली. व्याह्यांचीं आपसांत बोलणीं झालीं. लग्न ठरलें. झालें. सुशीला घरांत आली.

पण काय असेल तें असो. लग्नाच्या आदल्या दिवसापासूनच विनायकला वाटायला लागलें होतें कीं आपली पत्नी कांहीं आपल्या कसोटीला तंतोतंत उतरण्यासारखी नाहीं. मग आपली नेत्रपरीक्षा चुकली कीं काय ? पुन्हां एकदां खात्री करून घेण्याकरिता म्हणून तो अगदीं टपून बसला होता. लग्न लागायच्या वेळची गोष्ट. अंतरपाट दूर झाला अन् आतां एकमेकांच्या गळ्यांत माळ घालायची, त्यावेळीं तिचे डोळे पुन्हां एकदां नीट पाहावयाचे त्यानें ठरविलें होतें. पण काय करावयाचें ? आसपासच्या त्या देखाव्यानें आणि आतां आपण दुसऱ्याचे होणार या भावनेनें बावरलेली ती पोर जी खालीं मान घालून उभी होती ती तिनें मान कांहीं त्या वेळीं वर उचलली नाहीं.

नवी मुलगी घरांत आली. सगळ्यांनाच आनंद झाला होता. विनायकालाहि वरवर आनंद दाखवावा लागे. कारण लग्न त्याच्या संमतीनेंच झालेलें होतें. पण त्याच्या डोक्यांतली कल्पना त्याला चैन पडूं देईना. उलट दिवसेंदिवस ती जास्तच बळावत चालली. कल्पनाचक्रच तें बोलून चालून; आणि त्यांतून एका ध्येयवादी विद्यार्थ्याचें; एकदां जिकडे फिरायला लागेल तिकडेच उलट धक्का मिळेपर्यंत फिरेल.

सुशीलेला लहानपणापासून बाळबोध वळण. बिचारीची आई जुन्या वळणाची, वडील जुन्या वळणाचे. 'आपण आपल्या वडलांना फार भीत होतो हें सांगण्यांत तिच्या आईला अभिमान वाटे. ही मुलगी देखील स्वभावानें गरीब; आई म्हणेल तें ऐकायचें येवढेंच तिला ठाऊक. याचा परिणाम असा झाला. सुशीला वडलांच्यासमोर कधीं खेळत बसेल, लाडानें बोलेल असें कधींच झालें नाहीं. एकदा ही दहा वर्षांची पोर बाहुलीशीं खेळत बसली होती. बाहुलीचें घर झाडणें, तिचा पलंग घालणें हें सर्व करतांना मधून मधून तिच्याशीं व जवळ असलेल्या धाकट्या भावाशीं बोलणें हें चाललें होतें. तिचे वडील बाहेरून आले. बरोबर कोणी तरी होतें. त्यांनीं हें दृश्य पाहिलें. त्यांना मोठी गंमत वाटली. साहजिकच आहे. आणि त्यांतून असें कीं, त्यांना असे प्रसंग दुर्मिळ. आपली मुलगी लाजरी आहे हें त्यांना माहीत होतें. तें कांहीं न बोलतां मुकाट्यानें मागें उभे राहिले. इतक्यांत कशानें कुणास ठाऊक तिच्या धाकट्या भावाचें लक्ष तिकडे जाऊन तो 'बाबा आले' करीत त्यांच्याकडे धावला. एका क्षणांत सुशीलेनें ती बाहुली तेथेंच टाकली आणि ती घरांत पळाली. संध्याकाळीं जेवतांना तिच्या लाजण्याबद्दल थोडी थट्टा करतांना वडील म्हणाले 'काय ग पोरी, दुपारीं एवढं लाजून पळायला ग काय झालं होतं? वेडी कुठली!' तशी लगेच आई म्हणाली, 'कांहीं तरीच आपलं. आपली एक गोष्ट राहिली; पण परक्याच्या समोर खेळत बसणं वाईट दिसतं हो आतां. आपल्या ताईचं आपण तेरा संपतांच लग्न केलं होतं. हिला आतां अकरा झालींच कीं पुरीं.' ह्या वळणांत ती वाढली होती, पण योगायोगानं तिचं लग्न सोळा संपेपर्यंत झालें नाहीं आणि वडलांनीं बायकोच्या कुरकुरण्याविरुद्ध का होईना तिला शिकवलें म्हणून सहावीपर्यंत तिचं शिक्षण तरी झालें.

बरें, विनायकाचें घराणें म्हणजे अगदीं जुन्या वळणाचें नाहीं, तरी कट्टें सुधारकहि नाहीं. आतां अशा स्थितींत त्या मुलींना जर नवऱ्याच्या कल्पने-बरहुकूम वागतां आलें नाहीं तर काय करायचें ? नशीब म्हणावें कीं, तिनें माळ घालतांना वर नाहीं बघितलें. नाहीं तर बिचारीच्या डोळ्यांत याच्या कल्पनेव्यतिरिक्त एखादं भलतंच पाणी दिसून याच्या काव्यकल्पनेचा विरस झाला असता.

लग्न झाल्याबरोबर मुळीं विनायक 'लॉ'च्या टर्म्स भरण्याकरितां मुंबईस गेला. घरीं आला तों बायको माहेरीं गेलेली, आणि याला दिवाळसणाला बोलावणें. तिथें जातो तों सासूनें खूप कौतुक केलें. पण बायको जेवायला वाढायच्या वेळेशिवाय समोर दिसणें कठीण. तिच्या आईच्या शिस्तीच्या कल्पनेप्रमाणें हें सर्व ठाकठीक होतें. पण विनायकाचें डोकें दुखायला लागलें त्याला कोण काय करणार ! दिवाळी अगोदरच आनंदाची, आणि त्यांतून थाटाचा दिवाळसण ! त्यांतून हा एकटाच आलेला ! असें असूनहि कधीं दिवाळी संपते असें त्याला होऊन गेलें. दिवसांत चार वेळां चहा लागणाऱ्या कॉलेजमधल्या विद्यार्थ्याला आयुर्वेदांतील दुधाचीं सगळीं विशेषणें सांगून दूध आग्रहाआग्रहानें पाजावें तशी त्याची स्थिति झाली. पण त्याला वाटायला लागलें कीं, आपली बायकोच अरसिक आणि नसलेंच तिच्या अंतःकरणांत आपल्याबद्दल प्रेम तर तिला तरी कां कांहीं वाटावें ! त्याला वाटे आतां परत जातांना तरी आपल्याला तिला घेऊन घरीं जायला सांपडेल. पण त्याचं नशीबच फुटकं (?) त्याला तो तरी काय करणार ? जायच्या दिवशीं सासरे दंतपंक्तीचें अर्धवट प्रदर्शन करीत त्याला म्हणाले, ' सुशीलेला आपल्याबरोबरच पाठवावयाचा पहिला बेत होता, पण तिच्या आईची इच्छा आहे कीं, तिनें आणखी चार दिवस राहावें." त्यांचे अर्धवट बाहेर दिसणारे दांत पुरे बाहेर काढावे कीं, सबंधच घशांत परत घालावेत, कीं, दुसरेंच कांहीं करावें याबद्दलचे राक्षसी विचार त्याच्या डोक्यांत भडकले. पण करतो काय ? 'मग बहिणीला नाहीं वाटतं भेटतां आलं या चार दिवसांत; आणि माझ्यापेक्षां पुष्कळ जास्त भेटली आहे. तुम्हांला पण ही भेटलीच आहे कीं, हा गुरगुरला. पण तें मनांतल्या मनांतच. बाह्यतः हा नुसतेंच हुं हुं करीत होता. त्याला शक्य असतें तर त्यानें Active resistance

अमलांत आणला असता, शक्य असतें तर हृदयाचीं कपाटं खोलून सह-प्रवासाची त्या लेली तळमळ त्यानें व्यक्त केली असती; पण बिचारा करतो काय ? तो ह्या स्थितीपुढं लाचार होता. त्या ठिकाणीं यापैकीं एखादी गोष्ट करणें म्हणजे ' ××× पुढं वाचली गीता ' अशापैकींच तें होतें. त्यानें गडकऱ्यांचें एक नाटक वाचलं होतं. त्यांतलीं वाक्यें त्याला आठवलीं. ' मांजर आडवें गेलें तर तीन पावलं मागें जावें ' वगैरे वगैरे. पण नशीब आडवें आलें तर कपाळावर हात मारून रडत बसावें. पण याला तेंहि सुख नव्हतें. याचें दैव याला रडूं द्यायलाहि तयार नव्हतें. हो, नाहीं तर टिंगल झाली असती. सगळं याला वरवर हंसतमुखानें सहन करावें लागून तेथून काढता पाय घ्यावा लागला.

आणि याचा परिणाम मात्र विनायकाच्या मनांत आपल्या बायकोबद्दल एक तऱ्हेची अढी उत्पन्न होण्यांत झाला आणि लग्नाच्या आदल्या दिवशीं त्याला आपली बायको आपल्या कल्पनप्रमाणें नाहीं असे जें कशामुळे तरी वाटायला लागलं होतें तें थोडें जास्त दृढ झालें. तिच्या आईचा व वडिलांचा तर त्याला राग आलाच पण तेवढ्यात जास्त राग त्याला तिचा आला. आपल्या भावना थोड्याफार तरी जागृत करण्याइतकी आपली नवपरिणीत पत्नी सहृदय नसावी, निर्जीव कळसूत्री बाहुलीप्रमाणें तिनें आपल्या आईच्या हातांत वागावें, आपल्याला भेटण्याची किंवा आपणहून चार शब्द आपल्याशीं बोलण्याची उत्सुकता तिला नसावी ही गोष्ट त्याच्या मनाला फार लागली. तो सुशिक्षित होता, रसिक होता. आपल्या वैवाहिक जीवनाच्या आरंभीं अशा नीरस गोष्टी घडाव्या याचें त्याला वैषम्य वाटल्यास त्यांत अनैसर्गिक असें कांहींच नाहीं. या सर्व गोष्टींचा दोष त्यानें सुशिलेच्या माथीं मारल यांतही विशेष चूक नाहीं. तिच्या लहानपणाची माहिती त्याला असायचें कांहींच कारण नव्हतें. तो सासूसासऱ्यांवर रागावला, गांवढळ आचरट वगैरे विशेषणांची लाखोली त्यानें मनांतल्या मनांत त्यांना मोजली, बायकोवर रागावला व शेवटीं दिवाळसणाला जाण्याचा गाढवपणा केल्याबद्दल स्वतः-वरच चरफडत घरीं आला.

आतां दुसरा प्रसंग : फर्स्ट LL. B. ची परीक्षा देऊन विनायक घरीं आला होता. पत्नीशीं थोडीफार ओळख खरी काय ती या सुटींत झाली. पण

त्याचा परिणाम येवढा झाला कीं, ती अरसिक, बावळट, शुष्क आहे ही त्याची भावना दृढ झाली. ठराविक चाकोरींतून जायची तिला संवय लागली होती. ती दिसायला चांगल्यापैकीं सुंदर होती. स्वभावानें मुळींच उर्मट नसून अगदीं गरीब होती. त्यामुळें सासू, सासरा, नणंद सर्व खूप होतीं. पण तिच्या पतिराजांना जें हवें होतें तें तिच्याजवळ नव्हतें. लोकांवर Impression मारण्याची जी कला किंवा खुबी ( इंग्रजी शब्द नको असल्यास छाप बसविण्याची म्हणा ) ती तिच्यांत नव्हती. ती सगळ्यांनाच साधते असें थोडेंच आहे ? पण ती तिच्यांत नव्हती खरी. तिला विनायकाच्या म्हणण्याप्रमाणें हृदय नव्हतें म्हणावें हवें तर; किंवा—

त्याच सुटींतील गोष्ट. चार दिवस विनायक कशानेंसा आजारी होता. तो निजूनच होता. जवळ आई बसली होती. डॉक्टर येऊन गेले होते. ठराविक वेळेला औषध द्यायला आईसाहेबांनीं सुनेला सांगून ठेवलें होतें. ती आपली औषध पेल्यांत ओतायची आणि त्या वेळीं जवळ कोण आई-साहेब किंवा वन्सं बसल्या असतील त्यांना नेऊन द्यायची. याला मनातून खूप राग येई; पण करतो काय ? पुष्कळ गोष्टींतून त्यानें वाचलें होतें कीं, एकदां नायिकेच्या हातून औषधाची बाटली सांडली. तिनें त्यांत मुकाट्यानें गूळपाणी भरून तेंच नायकाला पाजलें व त्यामुळें नायक खडखडीत बरा झाला. हाताच्या गुणावर ह्याचा पूर्वी विश्वास नव्हता. ह्याला कोणी सांगितलें होतें कीं, बरेंवाईट पीक येणें, झाडाला फळ लागणें, वगैरे पुष्कळ पुष्कळ गोष्टी हाताच्या गुणावर देखील अवलंबून असतात. तर हा लगेच म्हणे "ऊंः ! rotten superstitions." पण आतां त्याला तें पटायला लागलें होतें. नायिकेच्या हातच्या गुळवणीमुळें नायक खडखडीत बरा होतो. मग सुशीलेच्या हातच्या औषधानें आपण काय बरे होणार नाहीं ? त्यानें मनांतल्या मनांत त्रैराशिक मांडलें. गुळवणी into नायिकेचा हातगुण. याला जर खडखडीत बरें होणें तर डॉक्टरचें औषध into ( म्हणजे गुणिले ) सुशिलेचा हातगुण याला काय ? अधिक अधिक सम...पण हें त्रैराशिक मनांतल्या मनांतच राहिलें. कारण बिचाऱ्याची बायको याला औषध तर काय पण स्वतःच्या हातानें नुसतें पाणी पाजायलाहि तयार नव्हती. अरेरे ! बिचारा ! ! हाय रे दैवा ! ! !

सुमारें आणखी वर्षभर हें असें चाललें होतें. याची समजूत ठाम होत चालली होती. एका वर्षांत तर बऱ्याच घडामोडी झाल्या. LL.B., झाल्यावर कुठल्याशा सॉलिसिटरच्या ऑफिसांत मुंबईस याला वडलांच्या वशिल्यानें चांगली नोकरी मिळाली. विनायकानें आतां मुंबईस गिरगांवांत कुठल्या एका चाळींत बिऱ्हाड थाटलें होतें. हो, आणखी एक गोष्ट सांगायची राह्यलीच. या अवधींत विनायकरावांना एक मुलगा पण झाला होता. आमच्या कथानकांत थोडी महत्त्वाची ही घटना म्हणून दिली हो! नाहीं तर टीकाकार म्हणायचे कीं, तुम्ही इतक्या उशिरां हें पात्र कथानकांत कां घुसडलें? पण करायचें काय? सगळ्याच गोष्टी थोड्याच आपल्या हातच्या असतात? आम्हीं पुष्कळ म्हटलें, पण तें तीन महिन्याचें मूल कथानकाच्या आरंभीं एकदम कसें हो आणायचें? आमच्या कथानकाचा काल दोन वर्षांचा तेव्हां करायचें काय? विधिघटना म्हणून गप्प बसायचं झालं!

आतां थोडी राहिली आमची गोष्ट. या नवीन प्राण्यानें आम्हांला आमच्या गोष्टीचा शेवट गांठणें मात्र सोपें करून दिलें. तो कधींकाळीं राष्ट्राचा आधारस्तंभ होईल खरा, पण आजच आमच्या कथानकाचा तो आधारस्तंभ झाला आहे. म्हटलेंच आहे कीं, 'मुलाचे पाय पाळण्यांत दिसतात.'

एक दिवस—दुपारची वेळ. आज, 'कां कोण जाणें,' विनायकाची ऑफिसमधून लवकर सुटका झाली.

'किर्लोस्कर' मधील एक गोष्ट वाचीत तो ट्रॅममधून चालला होता. पण त्याच्या डोक्यांत विचार चालू होता कीं, लवकर तरी घरीं जाऊन आपण काय करणार? आपण व बायको यांच्या मनांतलें अंतर त्याला असेंच केव्हां केव्हां फार जाणवे व तो विमनस्क होई. आजहि असेंच झालें. पण येवढ्यांत समोरच्या बाकावर बसलेल्या दोघाचा संवाद त्याला ऐकूं येऊं लागला. त्यानें मुद्दाम लक्षपूर्वक समोर पाहिलें तों त्याला एक पस्तीस-छत्तीस वर्षांची प्रौढा व पंचविशींतला तरुण बोलत असलेलीं दिसलीं.

'अक्का, तुला खरं सांगूं का, विमल। किनई अगदींच कांहीं तरी मुलगी आहे. तिला स्वतःला भावना, आवडीनिवडी कांहीं आहेत किंवा नाहींत हेंच कळणं कठिण. काय तें नुसतं सौंदर्य करायचं?'

'विनू,' (त्यांचहि नांव विनायकराव होतं वाटतं!) ती बाई जरा तीव्र स्वरांत म्हणाली, 'मी मघांपासून हें दहा वेळां ऐकलं पण यांत तुझ्या उतावळेपणापेक्षां मला दुसरा अर्थ दिसत नाहीं. लहान मुलगी ती. नुकती परक्या घरीं आली. काय रे, तुला स्वभाव कळला तिचा एवढ्यांत? कैक नवरा-बायको मला माहीत आहेत कीं, पांच पांच वर्षे लग्न होऊन त्यांना एकमेकांची माहिती नसते आणि आपल्या हातांनीं आपल्या सुखाची माती करतात. अजून लग्नाला चार महिने नाहींत झाले तुझ्या. मी सांगून ठेवतें तुला, येवढ्यांत मत बनवूं नकोस. तिची नीट ओळख करून घ्यायचा प्रयत्न कर. तिचं मन समजून घ्यायचा, तें फुलवायचा जरा प्रयत्न कर आणि मग तूंच म्हणशील–'

येवढाच संवाद त्यानं ऐकला–पण तेवढ्यांत–'गिरगांव' म्हणून कंडक्टर ओरडल्यामुळें त्याला उठावें लागलें. 'आपल्या हातांनीं आपल्या सुखाची माती करून घेतात' हे शब्द त्याच्या कानांत अजून घुमत होते. 'तिचं मन फुलवायचा जरा प्रयत्न कर' हें वाक्यहि त्याच्या मनातून गेलें नव्हतें. तो तसाच घरीं आला.

त्याचा रोजचा कार्यक्रम म्हणजे हा—घरीं यायचें, चहा घ्यायचा, पांच मिनिटें मुलाला घ्यायचें आणि लगेच भटकायला बाहेर जायचें. रात्रीं उशीरा घरीं यायचें–जेवायचें आणि ग्यालरींत खुर्ची टाकून झोंपायची वेळ होईतों वाचीत पडायचें. सकाळीं उठलें कीं चहा घेऊन बाजाराच्या निमित्तानें बाहेर पडायचें कीं जेवायच्या वेळेला घरीं! आंघोळ, जेवण झालें, कीं लगेच कचेरी. जरूरीपुरतें पांच-दहा शब्द बोलण्यापलीकडे त्याला बायकोशीं थट्टा, विनोद, हितगुज कांहीं ठाऊक नव्हतें. आणि कुणाला ठाऊक असें किती दिवस चाललें असतें! सुशीला कमी बोलणारी होती' आपल्या भावना तिला बोलून दाखवितां येत नव्हत्या. पण याचा अर्थ तिला भावनाच नाहींत असा विनायकानें करून घेतला. त्या दिवशीं तो घरीं आला. त्यानें दार ठोठावलेन् तों दाराला जरा धक्का मिळतांच तें उघडलें गेलें. आंतल्या बाजूस गॅलरींतल्या दरवाज्याकडे तोंड करून सुशीला बाळाला मांडीवर घेऊन बसली होती. तिच्या हातांत विणकाम होतें. बाळ मांडीवर खेळत होता. ती मधून मधून एखादा शब्द त्याच्याशीं बोलत

होती. हलक्या हातानें दाराला धरून मुकाट्यानें मागें उभा राहून तो तें दृश्य पाहात होता. हिच्या अंतःकरणांत कोमल भावना आहेत म्हणायच्या. मग हिला हृदयहीन ठरविण्यांत माझीच चूक तर. मला वाटतें माझ्या बेफाम कल्पनाप्रवाहात हिची बाजू पाहायचा प्रयत्नच मी केला नाहीं. मग ही अशी मुखस्तंभ, अरासिक कां? हिची लहानपणापासूनची परिस्थिति तर हिच्या या स्वभावाला कारण झाली नसेल ! इतक्यांत तिनें हातांतलें विणकाम खालीं ठेवून बाळ कुरकुरायला लागला म्हणून त्याला हातांत समोर धरून वरखालीं हलक्या हातानें झेलायला सुरुवात केली.

ती पाठमोरी बसली होती. तिचा पदर उजव्या खांद्यावरून बाजूला सरून डाव्या खांद्यावरून, पाठीवरून खालीं रुळत होता. तिचा सैल अंबाडा तिच्या मानेवर तिच्या हलण्यानें मृदु आघात करीत होता. येवढ्याशा पोराला आईचें हृद्गत कळलें म्हणूनच कीं काय तोहि आतां हंसत होता. तें दृश्य पाहून विनायकाच्या ठराविक चाकोरींतून फिरणाऱ्या कल्पनाचक्राला धक्का बसला. तिच्या दरएक हालचालींत त्याला भावना दिसत होती. त्याला समजलें कीं, तिच्याजवळ हृदय होतें. तिला भावना होत्या. तिच्या अंतः-करणांत खरें खरें प्रेम होतें. फक्त तिला कादंबरीचा फारसा परिचय नव्हता. आणि मिळालेल्या धड्याबाहेर बघण्याइतकी बुद्धीची तीव्रता म्हणा हवी तर, तिजजवळ नव्हती. तिचें प्रेम वाचाळ नव्हतें. विनायकदेखील एक सहृदय तरुण होता. आपला चुकलेला दृष्टिकोण त्याला समजला होता. वरील सर्व विचार अवघ्या दोन मिनिटांच्या अवधींत त्याच्या मनांत येऊन गेले. त्याला रहावेना. तो पुढें झाला तोंच त्याची चाहूल लागून सुशीला एकदम मुलाला घेऊन 'अगबाई' म्हणत उभी राहिली. एक हात तिच्या खांद्यावर ठेवीत तो म्हणाला, 'इतकी बावरलीस कां ?' तिनें कांहींच उत्तर दिले नाहीं. ती त्याची पत्नी होती. त्यानें तिला अनेक वेळां स्पर्श केला होता. पण आज-पर्यंत जें तिला कधीं वाटलें नाहीं तें आज वाटलें. तिचीं गात्रें लज्जेनें पुल-कित झालीं. पायापासून कपाळापर्यंत ती लज्जेनें लाल लाल झाली होती. तिच्या कपाळावर घर्मबिंदु चमकूं लागले. बाळ आपल्या हातांतून पडतो कीं काय असें तिला वाटूं लागलें. तिची दृष्टि खालीं होती. डाव्या हातानें बाळाला सांवरीत उजव्या हातानें त्यानें खिशांतला रुमाल काढला आणि तिच्या

मानेमागून हात नेऊन हलक्या हातानें तिचें कपाळ पुशीत त्यानें विचारलें, ' इतकं घाबरायला काय झालं ? अं ! मी आपला मायलेकरांचं कौतुक पाहायला मिळावं म्हणून गप्प उभा होतों. ' इतक्या वेळांत तिचेंहि मन बरेंचसें सांवरलें होतें. पण त्याच्या प्रश्नाला मधुर स्मितापलीकडे कांहींच उत्तर न देतां बाळाला नीट घेत ती म्हणाली, ' पाहिलं कां, लबाड कसा हंसतो आहे तो ! '

' हो पाहिलं कीं, आणखी सुद्धां एक गोष्ट पाहिली ! ' प्रश्नार्थक मुद्रेनें मान वर करून तिनें नुसतें त्याच्याकडे बघितलें. ' एक वस्तु कुठें दिसत नव्हती. ती होती योग्य ठिकाणींच, फक्त मला दिसत नव्हती. ती या गुलामानं दाखवली. ' तिच्या नजरेवर आपली स्निग्ध दृष्टि लावीत तो पुढें म्हणाला, ' वेडे मुली, मला तूं वाटायला लावलं होतंस कीं तुझ्याजवळ हृदयच नाहीं. पण बाळानं दाखवलं कीं, मी चुकलों होतों. कांहीं हरकत नाहीं, मीं केलेली डोळयांची परीक्षा चुकली नव्हती येवढं तरी यावरून नक्की ठरलं. '

त्याच्या काव्यमय बडबडीचा भावार्थ बहुधा त्या वेड्या मुलीला कळला असावा. कारण कृतज्ञताबुद्धीनेंच कीं काय बाळाचा पापा घ्यायला तिनें मान खालीं केली. तिची बांकलेली मूर्ति त्याच्या दृष्टीखालीं आली होती. तिनें केसांना पुसट पुसट लावलेल्या तेलाचा मंद मधुर सुवास त्याच्या नाकांत शिरत होता. त्याचें मन मधुर अननुभूत लहरींवर नाचत होतें. कधीं न अनुभवलेली एक माधुरी त्याच्या नीरस जीवनक्रमांत विरत होती.

—वाङ्मयशोभा, एप्रिल १९४०.

# उद्यांची काळजी १२

परमदयाळु, प्रजाहिततत्पर खलीफा हरून-अल्-रशीद यांच्या कारकीर्दीतील ही गोष्ट आहे. खलीफाच्या सबंध राज्यांत त्या वेळीं सुबत्ता आणि सुव्यवस्था होती. बगदाद शहर तर काय राजधानीचेंच ठिकाण. तिथें तर काय सर्व आबादीआबाद होती. आधींच त्या ठिकाणीं दुःखी नागरिक सांपडणें कठीण आणि त्यांत स्वतः खलीफाची सर्व गोष्टींवर बारीक नजर असल्यानें कुणाला कांहीं खुपल्याची कुणकुण ऐकली कीं तो स्वतः जातीनें लक्ष घालून त्या दुःखिताचें दैन्य दूर करावयास झटे.

तसेंच उलट आपले प्रजाजन चांगल्या तऱ्हेनें आपलीं कर्तव्यें पार पाडीत आहेत कीं नाहींत, ते सुखी आहेत कीं नाहींत आणि ते आपल्याबद्दल काय बोलतात तें समजून घेण्याकरतां खलीफाची स्वारी वेष बदलून विशेषतः रात्रीच्या वेळीं शहरांतून फिरून येई, कुणाशीं स्नेह करी, कुणाकडे मुक्का माला राही. अशा रीतीनें नागरिकांच्या जीवनाचा कानोसा घ्यायला सांपडल्यामुळें आणि त्यांत प्रजा सुखी असून आपल्याबद्दल बरें बोलते हें कळल्यामुळें खलीफा हा कार्यक्रम दर वेळीं नवीन उत्साहानें पार पाडी.

असाच एकदां हिंडत हिंडत तो गरिबांच्या वस्तींतील एका बैठ्या घरापाशीं आला. छोट्या दोन खोल्यांचें झोंपडीवजाच घर होतें तें. रस्त्याकडेची खिडकी फार उंच नव्हती. त्या खिडकींतून त्यानें आंत डोकावून पाहिलें. खोलींत एका बाजूला एक लाकडी खाट होती. तिच्या पायगती तिपाईवर एक पाण्याचा माठ ठेवलेला होता. दुसऱ्या भिंतीजवळ एक चटई आंथरून एक इसम बसलेला दिसला. त्याच्या समोर एका थाळींत भाकरी व एका भांड्यांत कांहीं तरी कालवण दिसत होतें. समोरच एक मेणबत्ती संथपणें

तेवत होती. खलीफानें बघितलें त्या वेळीं डोळे मिटून तो प्रार्थना करीत होता. त्याची प्रार्थना संपली असें वाटतांच खलीफानें पुढें होऊन दार ठोठाविलें. लगेच एका क्षणांत आंतील इसमानें दार उघडून खलीफाचें स्वागत केलें. अत्यंत आदरानें हाताला धरून खलीफाला आंत नेत तो म्हणाला, ' बरं झालं, तुम्ही आलांत ते. मला कोणी तरी पाहुणा आज जेवतांना पाहिजेच होता. कारण आजच्या माझ्या कमाईत नेहमींपेक्षां जवळजवळ दुप्पट जेवण मिळालें आहे. ' खलीफा त्याला म्हणाला, ' मग असें करण्यापेक्षां तूं निम्मे पैसे वांचविले कां नाहींस? मी आज येणार हें तुला थोडेंच माहीत होतें? '

' पैसे वांचविण्याची तर गोष्टच राहूं द्या. माझ्या बापानें माझें नांव महंमद ठेविलें. त्यानें मला शिकविलें कीं, पैशाचा लोभ धरूं नको, आणि उद्याची काळजी करूं नको. उद्याची काळजी ईश्वरावर टाकून, निष्ठेनें राहिलास तर तूं अत्यंत सुखी होशील. मला नाहीं कुणाचा पाश. मी एका लोहाराच्या दुकानांत काम करीत होतों. तेथें मला आठ आणे रोज मिळे. आजच मला दुसरी नोकरी लागली. तिथें मला दुप्पटीनें रोजगार मिळेल. उद्यांपासून येवढ्याच पैशांत मी जरा चांगल्या प्रकारचें अन्न आणणार आहे, म्हणजे तें शिलक राहणार नाहीं. '

महंमदाचें हें तत्त्वज्ञान ऐकून त्याच्या ईश्वरनिष्ठेची थोडीशी परीक्षा पहावी, असें खलीफाच्या मनांत आलें. राजवाड्यांत परत आल्यानंतर त्यानें सेनापतीला बोलावून आणून महंमदाला सैन्यांत नोकरी देण्याची व्यवस्था केली. आणि तो रूजू झाल्याचें कळल्यानंतर थोड्या दिवसांनीं खलीफा मागीलप्रमाणेंच रात्रीच्या वेळीं त्याचे घरीं गेला. या वेळीं घरांत चांगल्या प्रकारचे दिवे लागलेले होते आणि महंमद पुन्हां जेवायलाच बसलेला होता. त्याच्यासमोर खाद्यपदार्थांचीं बरींच भांडीं असून सरबताची सुरई जवळच ठेवलेली दिसत होती. खलीफानें दार ठोठाविलें. महंमदानें पुढें होऊन दार उघडलें व आपल्या पूर्वीच्याच पाहुण्याला पाहून तो म्हणाला, ' या पाहुणे! आज फार दिवसांनीं आलांत? आज जेवणाचा नमुना तर बघा. तुम्ही परवां येऊन गेलांत आणि लगेच मला सैन्यांत नोकरी मिळाली. हल्लीं मला पगार म्हणून ओंजळभर मोहरा मिळतात. आणि महिनाभर पुरेल अशी त्यांची

वांटणी करून रोज त्यांपैकीं एक भाग मी खर्च करतो. जास्ती नाहीं किंवा कमी नाहीं. अन्नखर्चाशिवाय पैसे राहिले तर रोज एक नवीन वस्तु घरांत आणतों. आणि बरं का पाहुणे-आजपासून बरोबर आठ दिवसांनीं याच वेळीं तुम्ही माझ्याकडे जेवावयास या. मी तुमच्यासाठीं खास मेजवानीचा बेत करणार आहे.'

'आणि त्याकरितां जादा पैसे कोठून आणणार'?

'पाहूं हो त्या दिवशींचे त्या दिवशीं. आपली काळजी परमेश्वराला.'

ठरलेल्या दिवशीं खलीफा पुन्हां जेवावयास गेला. त्या दिवशीं तर महंमदानें मेजवानीचा मोठा थाट उडवून दिला होता. जेवणारे मात्र ते दोघेच. जेवण झाल्यावर मात्र खलीफाला राहवेना. त्यानें महंमदाला विचारलें, 'महंमद, तूं आज इतके पैसे आणलेस कोठून ?'

महंमद शांतपणें म्हणाला, 'मी आज तलवार शंभर मोहरांस विकून टाकली.'

खलीफा एकदम चमकून म्हणाला, 'काय ? तूं सरकारी तलवार विकलीस ?'

तितक्याच शांतपणानें महंमदानें उत्तर दिलें, 'होय. आमच्या महा-पराक्रमी खलीफाच्या राज्यांत लढाईची कधीं गरजच पडत नाहीं. गेल्या कित्येक वर्षांत तुम्ही कधीं लढाईचें नांव ऐकलें आहे काय ? आणि मग उगाच ती तलवार घांसत-पुसत बसण्याचा नसता त्रास हवा कशाला ? म्हणून मी ती विकून टाकली.'

त्याचे उद्गार ऐकून खलीफाला, स्वतःबद्दल अभिमान बाळगावा कीं महंमदाच्या अजब विचारसरणीचें कौतुक करावें हेंच समजेना.

'आणि महंमद, हें सेनापतीला अगर खलीफाला कळलें तर ?'

'त्यावेळची काळजी परमेश्वराला !' महंमदानें उत्तर दिलें.

राजवाड्यांत परत येत असतां महमदाची परीक्षा पाहिलीच पाहिजे असें खलीफानें ठरविलें. यानंतर चार दिवसांनींच शाही हुकूम निघाला कीं, एका विख्यात् खुनी दरोडेखोराला शिरच्छेदाची शिक्षा झालेली आहे. आणि तिची अंमलबजावणी कवायतीच्या मैदानावर, कोणत्याहि सैनिकाला तिथल्या तिथें आज्ञा देऊन खलीफा करविणार आहे. तरी सर्व सैनिकांनीं ठरल्या वेळीं गणवेषांत तेथें हजर राहिलें पाहिजे.

ठरल्याप्रमाणें सर्व लष्कर हजर झालें. महंमदाहि कमरेला एक लाकडी तलवार लटकावून आला होता. आणि योगायोग असा कीं, त्याच्या सैन्याची तुकडी नेमकी पहिल्या रांगेत उभी केली होती. आज खलीफा आपणास जवळून पाहावयास मिळणार म्हणून एकपरीनें महंमद आनंदला होता. ठरल्या वेळीं खलीफा आल्याची ललकारी झाली. आणि खास त्याच्यासाठीं तयार केलेल्या सिंहासनाकडे जाताना तो महंमदला दिसला. खलीफा दृष्टीस पडताच महंमद चपापला. ज्याला तीन वेळां पाहुणा म्हणून जेवायला घातले, तोच गृहस्थ खलीफा म्हणून समोर दिसताच महंमदाच्या मनात विचाराचें काहूर माजलें. त्याला समजलें कीं खलीफानेंच एकदा जेवून जाताच आपणास सैन्यात नोकरी देवविली; आपण तलवार विकून त्याला मेजवानी दिली; आणि 'ही गोष्ट खलीफाला कळली तर?' – असा सूचक प्रश्न त्यानें विचारताच 'त्या वेळची काळजी परमेश्वराला' असें बेडरपणाचें उत्तर आपण दिलें म्हणून आपली परीक्षा पाहाण्यासाठींच केवळ खलीफानें हा डाव टाकला असला पाहिजे असें त्यानें मनोमन ओळखलें. क्षणभर त्यानें मनोमन परमेश्वराची प्रार्थना केली. एवढ्यात खलीफाची स्वारी त्याच्या पुढून सिंहासनाकडे गेली. दोघानींहि क्षणमात्र एकमेकाकडे बघितलें, पण अर्थातच कोणीच कोणाला ओळख देणें शक्य नव्हतें.

पुढें महंमदाच्या अपेक्षेप्रमाणेंच सेनापतीनें त्याचें नांव पुकारून वधस्थानापाशीं आणलेल्या गुन्हेगाराचा वध करण्याबद्दल त्यास फर्माविलें. महंमद पुढें झाला. त्यानें क्षणभर त्या मरणाच्या दारीं उभा असलेल्या गुन्हेगाराकडे बघितलें आणि तो मनात म्हणाला, 'परमेश्वरा माझ्या हातून निःशस्त्र जीवाचा वध करण्याचें पाप तूं घडविणार काय? आज तुझ्या या निष्ठावंत भक्ताबरोबर तूं त्यालाहि वांचविलें पाहिजेस.' नंतर खलीफाला तीन वेळां मुजरा करून तो म्हणाला, 'खाविंद, मी बोलतो त्याची माफी असावी. पण हा मनुष्य निरपराध आहे, असा मला दृष्टांत झाला आहे व म्हणून त्याला सजा माफ व्हावी, अशी माझी विनंति आहे.'

खणखणीत आवाजांत उच्चारलेले शब्द ऐकतांच खलीफाच नव्हे तर सारा समाजच स्तंभित झाला. खलीफासमोर असें बोलणारा कोण असें

म्हणत जमलेल्या समुदायापैकीं प्रत्येक जण आपली मान उंचावून पाहूं लागला. खलीफालाहि हें अनपेक्षित भाषण ऐकून भांबावल्यासारखें झालें. इतक्यांत सेनापति पुढें होऊन कठोर आवाजांत म्हणाला, ' महंमद, आपला जीव गमाविण्याची दुर्बुद्धि झालेली दिसतीय् तुला. न्याय देण्याचें काम खाविंदाचें आहे; सांगितलेल्या हुकुमाची अंमलबजावणी करण्याचें काम तुझें आहे; तूं क्षणाचाहि विलंब न लावतां आपलें काम कर; तरच तुझ्या पहिल्या गुन्ह्याची तुला माफी देण्याबद्दल मी रदबदली करीन. '

सेनापतीला लवून मुजरा करीत महंमद म्हणाला, ' महाराज, आपले खाविंद फार मोठे आहेत; कारण ते परमेश्वराचे प्रतिनिधी आहेत. पण परमेश्वर मात्र त्यांच्याहूनहि मोठा आहे, आणि याची परीक्षा येवढीच कीं, हा इसम मी म्हणतों त्याप्रमाणें खरोखर निरपराध असेल तर माझी तलवार लाकडाची होऊन जाईल.' असें म्हणून त्या खुनी इसमाच्या मानेवर वार करण्याच्या आविर्भावानें त्यानें सर्कन् आपली तलवार म्यानांतून बाहेर काढली. आणि केवढें आश्चर्य ! त्याच्या हातांत खरोखरच एक लांकडी तलवार होती.

हें घडल्यानंतर एका पाव घटकेच्या आंत तो उघडा दरबार बरखास्त करून परमेश्वराचा आणि महंमदाचा जयजयकार करणाऱ्या समाजाला गुन्हेगाराची शिक्षा माफ केल्याचें जाहीर करून महंमदासह खलीफा आपल्या खास महालांत येऊन बसला होता. ' महंमद, तुझी परमेश्वरावरील निष्ठा खरोखरीच प्रशंसनीय आहे. आणि म्हणूनच त्यानें तुला इतकें प्रसंगवधान देऊन तुझें नांव राखलें, व एका जिवाचे प्राण वांचविलें. त्याच परमेश्वराच्या प्रेरणेनें या जगांतील तुझ्या हिताची जबाबदारी यापुढें मी स्वीकारीत आहे.'

अत्यंत कृतज्ञबुद्धीनें आपली लांकडी तलवार खलीफाच्या पायाशीं ठेवीत महंमद म्हणाला, ' मग सरकार, आतां मला या खोट्या तलवारीची तरी काय जरूर ? '

—वाङ्मयशोभा, डिसेंबर १९४४.

---

## संक्रति आणि बर्फ १४

लढाई कुणाला आवडत नाहीं ? निदान बघायला तरी ! आणि म्हणूनच लढाईच्या गोष्टी ऐकायला आपल्याला मनापासून आवडतात. आणि ती लढाई माणसा-माणसांचीच असली पाहिजे असं नाहीं. ती साठमारी असली तरी चालते. जोंपर्यंत आपला पैसा चपटा होत नाहीं तोंपर्यंत फुटेनात का बैलाची टाळकी; आणि कुणाचे का असेनात ते बैल ! आणि गोष्टी ऐकण्यांत तर फारच मौज. प्रत्यक्ष लढाई करायचीच म्हटली म्हणजे नेहमीं जीव जायची नसली तरी हातपाय मोडायची भीति आणि पाहायची म्हटली तरी अंग खरचटायची भीति. त्या कुठल्याशा गांवीं नाहीं कां ती गाजलेली साठमारी होती; आणि एकाएकीं तो माजलेला बैल प्रेक्षकांत शिरला आणि कोण धांवपळ. आणि त्या कोल्हापुरांत नाहीं का एक दिवस दोन हत्ती मोकाट सुटले आणि मग काय विचारतां ! साऱ्या गांवांत घबराट झाली नि सगळे लोक कड्या घालून घरांत बसून होते. हत्ती-हत्तीणीचें तें जोडपें गांवांत अप्रतिहत संचार करीत होतें आणि बंदुकीचे बार काढीत हत्यारी शिपाई त्यांना हुसकावीत, स्वतःला संभाळून संभाळून फिरत होते. पण ते हत्ती पकडले गेल्यानंतर मग किती तरी दिवस, कितीतरी कथा, दंतकथा आणि रूपककथा यांचा पाऊस पडत होता.

पण तें असो. सांगावयचा मुद्दा असा कीं, लोकांना युद्धकथा ऐकायला मनापासून आवडतात. आणि या गप्पा कांहीं खेड्यांतल्या चावडीवर किंवा पाटलाच्या अड्ड्यावरच रंगतात असं नाहीं; तर सुशिक्षित लोकांच्या क्लबांत टेनिस खेळून आलेली तरुण मंडळी आणि केवळ ब्रीजच खेळणारी वृद्ध मंडळी

जेव्हां एकत्र जमतात, आणि पान खातांना आणि रासबेरी पितांना गप्पा सुरूं होऊन त्यांना रंग भरतो, त्यांत रंगदार युद्धकथांचा भाग पुष्कळच असतो.

आणि हल्लीं या लढाईपासून तर विचारूंच नका. कधीं कल्पना नव्हती अशी गांवांचीं आणि माणसांचीं वर्णनं नित्य नवीं वाचायला मिळाली. इतकंच नव्हे तर शेंकडों, हजारों तरुणांनीं देशोदेशीं हिंडून नानाप्रकारचे समाज आणि घनघोर लढाया पाहिल्या आणि साहजिकच परत आल्यानंतर त्या वर्णन करून सांगितल्या. त्या चक्षुर्वैसत्यम् गोष्टींची लज्जत तर काय सांगावी ! आणि मग युद्ध संपलं. आझाद सैनिकांचा खटला गाजला आणि जेव्हां शेकडों आझाद सैनिक गांवोंगावीं परतून आपल्या त्यागाच्या आणि हालाच्या अमर कहाण्या सुनवूं लागले तेव्हां तर कथाप्रिय जनांच्या आनंदाला भरतें आलें.

आमच्या रामपूरच्या क्लबांतहि अशा गप्पांना रोज संध्याकाळीं भलताच रंग चढे. सैन्यांतून निवृत्त होऊन परत आलेले एक डॉक्टर तर अशा गोष्टी खूपच सांगत. गेल्या आठवड्यांत योगायोगानें दोघे आझाद सैनिकहि आले होते. त्यांनींहि कांहीं रोमांचकारी गोष्टी सांगितल्या. पण दुर्दैव असें कीं, आज डॉक्टरच स्वतः आजारी असल्यानें गैरहजर होते. आणि दुसराहि कोणी गोष्टीवेल्हाळ नव्हता. तेव्हां आज सर्वांचाच विरस होणार असें दिसत होतें. इतक्यात रामभाऊ चाफेकरांची नजर मजवर गेली. मी आपला तंबाखूचा बोकाणा भरून त्या लयींत, आरामखुर्चींत पद्मासन घालून हातांचीं बोटें एकमेकात अडकवून आणि दोन्ही तळव्यावर डोकें टेकून मागें रेलून पहुडलों होतों.

'काय हो राजाभाऊ, तुम्ही म्हणे गोष्टी मोठ्या सुंदर लिहितां ! मग तुम्हीच एखादी झकासपैकीं गोष्ट सुनवा कीं आम्हांला !' रामभाऊ चाफेकरांच्या माझ्याकडे वळलेल्या कृपादृष्टीचा हा अर्थ मला आतां समजला.

'का हो रामभाऊ, तुम्हांला कोणी सांगितलं मी गोष्टी लिहितो म्हणून ? कां आपली दिली ठोकून !'

'वा, वा ! आमची ही सांगत होती कीं, 'रंजना' मासिकांत तुमच्या गोष्टी नेहमीं येतात.'

' असं, असं, ! म्हणजे एकूण तुमच्या घरांत वाटणी आहे तर ! ती अशीच ना कीं सनातन-परंपरारक्षक मंडळाचं 'जीर्णोद्धार' मासिक तुम्ही वाचायचं आणि 'रंजना' तुमच्या मंडळींनीं वाचायचं. पण यांत धोका आहे रामभाऊ. तुम्ही जीर्णोद्धार वाचतां वाचतां 'रंजना'च्या वाचनानं तुमचं कुटुंब पुरोगामी व्हायचं आणि तुम्ही पाहतां पाहतां 'जीर्णोद्धाराचे' अंक भांडी चुलीवरून उतरवायला जायचे. निदान ताजा अंक तरी जपून ठेवीत चला,' मी म्हणालों.

येवढ्यांत रामभाऊंच्या वयाचे एक वृद्ध गृहस्थ पुढें सरकून रामभाऊंच्या पाठीवर थाप मारून म्हणाले, ' या रामभाऊची मेख तुम्हांला माहीत नाहीं राजाभाऊ, यांची मंडळी म्हणजे यांचं तिसरं कुटुंब, रंजना नाहींतर काय जीर्णोद्धार वाचणार ! याच्या जीर्ण संसाराचा तिनं उद्धार केला हाच तिचा केवढा त्याग. आणखी का बिचारीचे हाल ! पण तें कांहीं असो. तुम्ही गोष्ट सांगावी या रामभाऊंच्या म्हणण्याला आपला हार्दिक पाठिंबा आहे.'

रामभाऊंच्या सूचनेला अनुमोदन मिळाल्यानंतर आलेला प्रसंग साजरा करण्यावांचून गत्यंतरच नव्हतें. थोडासा उठून बसत किंचित् खांकरून मी म्हणालों, ' सभ्य गृहस्थ हो, आपला आग्रहच आहे तर मी आपल्याला एक गोष्ट जरूर ऐकवतो. मी जी गोष्ट सांगणार आहे ती एक युद्धकथाच आहे म्हणाना ! फक्त ती चढाई करण्यापूर्वीच पत्करलेल्या पराभवाची कथा आहे.'

' अहो मग ही कसली युद्धकथा ? ज्यांत चढाई नाहीं, घनचक्कर नाहीं अन् म्हणे फक्त पराभव आहे ! ' ते मघाचे गृहस्थ म्हणाले, ' हे पहा आम्हांला बनवायचा प्रयत्न करूं नका बरं का ! '

' छे, छे, ! बनवाबनवी वगैरे कांहीं नाहीं. मी सांगणार आहे ती नुसती युद्धकथाच नव्हे तर माझ्या अनुभवाची सत्यकथा आहे. त्या गोष्टींतला हीरो म्हणा किंवा व्हीलन म्हणा मीच होतो. आणि तो पराभवहि मीच पत्करला. मी सांगतों ही गोष्ट रामभाऊंना तर फारच आवडेल. पहिली सूचना त्यांची आहे तेव्हां त्यांना पसंत पडेल अशीच गोष्ट सांगतो.' माझी इतकी प्रस्तावना ऐकून सगळेच जरा सावरून बसले. डॉक्टर फाटकांनीं क्लबच्या पोऱ्याला हांक मारून म्हटलें, ' अरे सोमान, ते पानसुपारीचें तबक जरा भरून आण,

आणि हें बघ आणखी पंधरा मिनिटांनीं रामभाऊंच्याकरितां आईस्क्रीम सोडा घेऊन ये!'

'थँक्स् डॉक्टर, पण आईस्क्रीम सोडा नको. तर रॅासबेरी हवी. ज्या दिवशीं ही लढाई मी हरलों तेव्हांपासून रासबेरी हेंच माझं आवडतं पेय झालं आहे.' मी म्हटलें.

'म्हणजे ही अशीहि कांहीं सांगड आहे वाटतं, बरं तर सोपान, रॅासबेरीच तयार ठेव. पण आतां सुरुवात करा बघूं.'

* * *

तेव्हां मी बनारस हिंदु युनिव्हर्सिटीच्या एम्.ए. चा अभ्यास करीत होतों. जरी मी शिकायला बनारसला होतों तरी सुटीला विश्रामपूरला येत असे. कारण माझे वडील त्यावेळीं तिथेंच होते. तें गांव म्हणजे चांगलं मोठं शहर आहे. चांगली पाऊण लाख वस्ती असेल. गांवांत अठरापगड लोक आहेत, दहावीस धंदे आहेत. महारवाडाहि आहे नि ब्राह्मणवाडाहि आहे. पण ब्राह्मणवाड्याला विशेष महत्त्व आहे. आणि या ब्राह्मणवाड्याला महत्त्व आहे तेंहि एका अर्थी बरोबरच आहे. तिथले ब्राह्मण चांगले नामांकित आणि कर्तबगार आहेत. आणि इतरहि जातीजमातींचे लोक 'जुन्या'बद्दल विशेष आदर बाळगणारे असल्यामुळेंहि ब्राह्मणवाड्याला चांगलें महत्त्व आलेलें आहे. या ब्राह्मणांत जानवें समंत्रक घालून स्नानसंध्याशील राहाणारे थोडेच असले तरी श्रावणीला विसर्जनाकरतां जुनें जानवें हुडकून नेणारे आणि नवें मंत्रून आणणारे बरेच आहेत. जानवें कधींच न घालणारे पण अन्य तऱ्हेनें कर्तबगार अगर विद्वान् असलेलेहि कांहीं आहेत. कोकणस्थ, देशस्थ, कऱ्हाडे, यजु, आपस्तंभ वगैरे भेदाभेदांची अंतर्गत गुरगुर जरी आपल्याला ऐकूं येत असली तरी बाह्यतः तरी प्रशंसनीय अशी एकी दिसत असून ब्राह्मणसमाजाचें वजन एकंदर लोकवस्तीवर आहे. निदान मी ज्यावेळची गोष्ट सांगतों आहे त्यावेळीं तरी तसें होतें.

पण काळाचा प्रवाह कोणाला थांबवता आला आहे? आणि त्या प्रवाहाबरोबर कांहीं जुनी वाळू पायाखालून जावी आणि नवा गाळ यावा हेंहि सहजच नाहीं का? आणि याच पद्धतीनें कांहीं बदल विश्रामपुरांतहि घडत होते. पाहाणारांना दिसत होतें. पण सगळ्यांनींच सगळं पहावं असा कांहीं

नियम नाहीं. आणि म्हणूनच गांवांतले कांहीं सत्वस्थ आणि अभिमानी ब्राह्मण हा बदल जाणवून घ्यायला तयार नव्हते. तसं म्हटलं तर गांवांतल्या पांच पंचवीस देवळाच्या मानानं तिथं बरेच दिवसांपासून असलेली एक मशीद, दोन पीर आणि गांवाबाहेर एक फकीरसाहेबाचा दर्गा म्हणजे फार नव्हते. पण एका मशीदीखेरीज बाकीच्या गोष्टी या अलीकडच्या ५।१० वर्षांतल्या होत्या. दुसऱ्या बाजूनें गांवांत चित्रपटगृहांची वाढ होत होती. येवढ्या गांवाला पाच सहा सिनेमा थिएटरें म्हणजे काय फार आहेत ? पण चित्रपटामुळें तर सारं जग डोळ्यांपुढून जातं. त्याचाहि साहजिक लोकांच्या आचारविचारांवर परिणाम होत होता. ब्राह्मण वाड्यांतल्या जाणत्या मंडळींच्या मनावर या अशा एक ना अनेक आक्रमणांचा हळूं हळूं परिणाम होत होता. त्यांच्या मनानें पक्कें घेतलें कीं, आपला समाज व संस्कृति यांवर हळूंहळूं आघात होत आहेत. पण काळाच्या ओघाचें स्वरूप कोण लक्षांत घेतो ! विचार सुरू झाल्यावर कांहीं तरी आचार करावा असें वाटूं लागलें. आजकालची कुठल्याहि नव्या आचाराची सुरुवात व्हायची एकाद्या परिषदेनं.

विश्रामपुरांत धर्मरक्षक व संस्कृतिसंवर्धक परिषद भरावयाचें मुक्रर झालें. आणि या सगळ्यांत पुढाकार कुणाचा म्हणाल तर पांडुरंगपंत देवांचा.

'हे देव म्हणजे ते विख्यात संस्कृतिसंरक्षक का हो राजाभाऊ ? अहो त्यांच्या हस्तेंच तर परवां आमच्या श्रुतिबोध विद्यालयाचा बक्षिस समारंभ झाला.' रामभाऊ विचारते झाले.

'होय तेच ते. त्यांचा माझ्यावर भारी लोभ. तुमच्या समारंभाच्या दिवशीं मी इथं नव्हतों. नाहीं तर माझ्या इथें येऊन गेल्याशिवाय राहिले नसते ते.' मी हंसत म्हणालों.

'होय, सांगत होते ते तुमच्याबद्दल. पुष्कळच सांगत होते.' रामभाऊ खवचटपणानें आणि जणूं काय माझें एखादें रहस्य अवगत आहे असा चेहरा करून म्हणाले, 'सांगून तरी टाका काय म्हणाले ते ? म्हणजे तरी मी एकदम मोठा माणूस होईन. पण तुम्हांला सांगूं का रामभाऊ, 'पोरगा चांगला होता पण वांया गेला' येवढंच ते माझ्याबद्दल म्हणतील. पण तसं म्हणाल तर त्यांच्या माझ्यांत तसा फारसा फरक नाहीं. ते कुणब्याच्या हातचा चहा पिणार नाहींत; मी पितों. पण रामा गवळ्यानें स्वस्ताईकरतां पाणी

घालून वाढवलेलें दूध त्यांच्या नैवद्यालासुद्धां चालतं. बरं तें असो. तर सांगायचं काय कीं, या आमच्या पांडुअण्णांचा माझ्यावर फार लोभ. या परिषदेला रायबहादूर भट्टाचार्य नांवाचा कुणी एक तत्त्वज्ञानाचा ब्राह्मण प्रोफेसर अध्यक्ष म्हणून आला होता. कुणी तरी एक राजा पदवी असलेला संयुक्त प्रांतांतला जमीनदार त्या परिषदेच्या उद्घाटनाला लाभला होता. त्याचा ड्रायव्हर मुसलमान होता. तेव्हां परिषदेच्या दिवशीं तरी त्यांनी यवनाच्या मोटारींतून येऊं नये, अशी पांडुरंगपंतांनीं त्यांना विनंति केली होती. आणि त्यांच्याजवळ हिंदू ड्रायव्हर नसल्यानें त्यांची गाडी चालवायचं काम त्या दिवशीं मला करावं लागलं होतं. तरीहि त्यांच्याबरोबर एक दाढीवाला चपराशी त्यांचा विड्याचा डबा घेऊन हजर होताच. आणि मधून मधून तो पुढें होऊन तस्त धरायचा आणि दुसरं पान द्यायचा. 'तो हिंदूच का' म्हणून कुणी तरी मला विचारल्यावर मी पांडुअण्णांना विचारलं तेव्हां त्यांनीं डोळे वटारून पण हलक्या आवाजांत सांगितलं कीं, 'नसत्या शंका काढूं नका. त्या भागांत हिंदूदेखील दाढ्या वाढवतात.' तेव्हां अर्थात् तें तेवढ्यावरच राहिलं; पण खुद्द पांडुअण्णा मात्र परिषद संपेपर्यंत अस्वस्थ होते व नंतरहि पांडुअण्णांच्या मनाला ती रुखरुख लागून राहिली होती.

एकंदर परिषदेंत 'धर्मरक्षण करणें अत्यावश्यक आहे आणि संस्कृति-संवर्धन केलेंच पाहिजे' येवढा सर्वमान्य सूर होता. बाकी प्रत्येकाचा अर्थ आणि आशय वेगळाच होता. अध्यक्षांनीं समारोपाच्या भाषणांत, Vishrampur is a centre of religion and culture, (विश्रामपूर हें धर्म आणि संस्कृति यांचें एक केंद्रच आहे) अशी गांवाची घवघवीत शब्दांनीं स्तुति करून 'महाराष्ट्रांत शूर मराठे पांडुरंगपंतांच्या तेजस्वी नेतृत्वाखालीं जें करतील त्याला आम्ही बंगालमध्यें अवश्य पाठिंबा देऊं' असें आश्वासनहि दिलें. विधायक कार्यक्रम आखण्याकरतां पांडुअण्णांच्या अध्यक्षतेखालीं समिति स्थापन झाली. काशीच्या हिंदुविद्यापीठांतला एक पदवीधर म्हणून अण्णांना माझ्याबद्दल जो आदर होता तो संपूर्णपणें व्यक्त करून त्यांनीं त्या समितींत मलाहि पण घेतलें होतें.

परिषदेचे सूप वाजले आणि मीहि परत कॉलेजला गेलों. पुढच्या सुटींत मी परत येतों तों पांडुअण्णांची विधायक कार्यक्रमाची तयारी पाहून

मी चकितच झालों. खुद्द ब्राह्मणवाड्यांतच एका हमरस्त्यावर एका इराण्यानें एक अगदीं मुंबई फॅशनचें उपाहारगृह उघडून त्या वस्तीच्या सांस्कृतिक हक्कांवर मोठेंच आक्रमण केलें होतें. संस्कृति-संवर्धन-परिषदेला घसघशीत दहा रुपये देणगी देणाऱ्या त्या गृहस्थांनीं आपली जागा भाड्यानें त्या इराण्यास देऊं केली आहे, हें कळतांच त्यांना दुरुस्त करण्याकरतां विलक्षण पोटतिडिकीनें अण्णा त्यांचेकडे गेले. त्यांनीं आपली जागा असल्या असत्कर्माला देऊं नये असें अण्णांनीं त्यांना परोपरीनें विनविलें. पण त्यांचें आपलें एक उत्तर, ' तो देतो आहे तेवढ्या भाड्यानें ती जागा तुम्ही घ्या. ' सर्व विनवण्या फुकट गेल्यानंतर पांडुअण्णांनीं सत्याग्रह आणि पिकेटिंग करण्याची धमकी देतांच ते हंसत म्हणाले, ' ते तो इराणी पाहून घेईल. माझा त्याचा करार कालच झाला आहे. '

' मग तुम्ही जागा घ्या असं म्हणालांत मला, तें कोणच्या तोंडानं ? '

' अहो महाराज, जरा जपून बोला, हा कांहीं परिषदेचा मंडप नाहीं. हें माझं घर आहे. हो, मी म्हटलं जागा घ्या म्हणून ! कारण मला माहीत आहे तुमची कुवत जागा घेण्याची. '

चेहरा लाल करून अण्णा तेथून परत आले. इकडे अण्णांच्या कचेरींत गांवांतल्या अनेक खवचट लोकांनीं अनेक विधायक कार्यांच्या पोतड्या आणून टाकल्या होत्या. कुणी म्हणत होते, ' रस्त्यांतले सगळे पार नि पीर बाजूला करून रस्ते रुंद करण्याकरतां म्युनिसिपालिटीकडे अर्ज करावा. आणि अर्जावर हिंदुमुसलमान नागरिकांच्या सह्या जमवायचं काम अण्णांनीं व त्यांच्या समितीनें अंगावर घ्यावें. ' कुणी म्हणत होते, ' अस्पृश्यांना उत्तम विहिरी गांवाच्या वर्गणीनें खोदून द्याव्यांत आणि पांच वर्षांत महारवाड्याला स्वच्छतेच्या बाबतींत ब्राह्मणवाड्याची कळा आणून द्यायचा कार्यक्रम आखावा. तेंहि संस्कृति-संवर्धनच आहे. '

हे कार्यक्रम सुचवणारांच्या मनांतले हेतू पांडुअण्णांना कळत होते. आणि म्हणूनच कांहीं तरी प्रत्यक्ष कार्य सुरू करणें अवश्य आहे, असें त्यांच्या समितीनें ठरविलें. पांडुअण्णांनीं पिकेटिंगची धमकी दिल्याची वार्ता त्या जमीनमालकांकडून एव्हांना सर्वत्र झालीच होती. तेव्हां एवीतेवी आपल्या नांवाचा गाजावाजा झालेलाच आहे तेव्हां एकदां दाखवूंच आपला जोर काय

आहे तो असें त्यांनीं ठरविलें. हें सत्कार्य आहे अशी त्यांची खरोखरीची श्रद्धा होती आणि म्हणूनच आपण जर तिथें पिकेटिंग करावयाचें ठरवलें तर या पेठेचा तरी आपणास पाठिंबा मिळेल, असें त्यांना वाटत होतें. आपला हा विचार जेव्हां त्यानीं एका सद्गृहस्थांना बोलून दाखवला तेव्हा ते लगेच म्हणाले, ' काय हरकत आहे असं करायला. असं पहा, आपल्या मुलांना काय आपल्या घरीं जेवायला मिळत नाहीं ? बाहेर खायच्या ह्या संवयी हव्यात कशाला ? छे ! छे ! ! बरं इराण्याकडेच जायचं तर नदीपलीकडे जो आहे त्याच्याकडे जाऊन यावं. आमच्या पेठेंत हा इराणी कीं दुराणी हवा कशाला ? '

पांडुअण्णांचे इतके उद्योग होईपर्यंत दिवाळीची सुटी मिळाली होती म्हणून मी घरीं आलों होतों. घरीं आल्याबरोबर मीं दुपारीं अण्णांकडे बुद्धिबळें मांडायला गेलों. त्याबरोबर माझ्या पाठीवर थाप मारून ते म्हणाले, ' बरं झालं राजा, तूं आलास. आतां मला तुझीच गरज आहे. काशीतल्या पवित्र हिंदु-विद्यापीठाचा पदवीधर तूं. तुला माझ्या अंतःकरणांतलं दुःख नक्कीच कळेल.'

' आमच्या विद्यापीठांत हल्लीं मुसलमान धर्माचं शिक्षण देण्याकरितां एका स्वतंत्र प्राध्यापकाची जागा केली आहे ' असं हंसत हंसत म्हणायचं माझ्या अगदीं तोंडावर आलं होतं. पण चेहऱ्यावरून ते अगदीं टेकीला आले होते असं दिसत होतं आणि म्हणूनच मी माझी जीभ आवरली. आमच्या पांडुअण्णाच्याबद्दल माझ्या मनांत खरोखरीच निरतिशय आदराची भावना होती. ते माझ्या वडिलांचे स्नेही होते. स्वतः निष्ठावंत ब्राह्मण होते आणि सनातन धर्माची अवहेलना होते म्हणूनच आपली आजची अधोगति झाली आहे, अशी त्यांची भावना होती. ' आचारः परमोधर्मः ' ही त्यांची श्रद्धा इतकी एकांतिक होती कीं, त्यांच्या धर्मकल्पनेप्रमाणें खरेखुरे आचार संभाळणें सुद्धां कठीण आहे याचा ते विचारच करायला तयार नसत. उत्तर-हिंदुस्थानांत स्वयंपाकघरांतील चौक्याच्या पलीकडे पाण्याचा विटाळ मानीत नाहींत. त्याला गंगाजळ म्हणतात असं एकदां त्यांना मी सांगितलं; पण तें त्यांना पटेना. ते लगेच म्हणाले, ' तूं काय उत्तर हिंदुस्थानी आहेस ? अरे आपल्या तीन पिढ्यांपासून चालत आला तो आचार आपला. काळाच्या ओघांत

नाइलाजानं बदलेल त्याला इलाज नाहीं. पण आपण आपलं कर्तव्य करीत रहावं ! यानंतर त्यांच्याशीं वाद घालणं मी बंद केलं आणि क्वचित् त्यांची केव्हा थट्टा करण्याची लहर मला आली तरी संघांत नियमित जाणारा मी असल्यानें आणि मुख्य म्हणजे मालवीयांच्या हिंदु-विद्यापीठांतला ग्रॅज्युएट असल्यानें ते माझ्यावर प्रसन्न होते.

नंतर अण्णांनीं, इराणनं आपला एक प्रतिनिधि आमच्या वस्तींत घाडून केवढा अवघड प्रश्न निर्माण केला होता, तें सांगितलं. त्यांनीं आतांपर्यंत केलेले प्रयत्नहि सांगितले आणि म्हणाले, 'पिकेटिंग करण्यावांचून आतां गत्यंतरच नाहीं. हा अण्णा, त्याच्या शरिरांत श्वास आहे तोंपर्यंत आपल्या वस्तींत तरी हें आक्रमण सहन करणार नाहीं. माझी कांहीं थोडीफार पुण्याई असेल ती पणाला लावल्यावांचून मी राहणार नाहीं. मी तर हें करणारच आहें, पण मला तुझं सहाय्य पाहिजे. पोलादाच्या कांबीसारखा आमचा राजेंद्र माझ्याजवळ उभा असला म्हणजे मला पुष्कळ आधार वाटेल !' माझा हात हातांत घेत ते पुढें म्हणाले, 'काय रे मग येणार ना तूं ?'

'अण्णा, तुमच्याबद्दल मला आदर वाटतो तो कांहीं मी सांगायलाच पाहिजे असं नाहीं. पण खरं सांगूं का, तुम्ही पुढं धांवणाऱ्या काळाचा पाठलाग करून त्याला मागं ओढायचा प्रयत्न करूं नका.'

'हें बघ राजेंद्र,' अण्णा गंभीरपणानं बोलायला लागले कीं, राजा ऐवजीं राजेंद्र या माझ्या नांवानं संबोधायला सुरुवात करीत. 'काय करायचं तें मी ठरवलं आहें. मी तुझ्याशीं वाद घालायला आलों नाहीं. तूं माझ्याबरोबर येणार कीं नाहीं तेवढें सांग. माझीं तत्वं मान्य असणारे पण मी कांहीं म्हटलं कीं त्याला 'पण', 'परंतु' म्हणणारे इथें अनेक आहेत. त्यांच्या वयाला तें शोभेल कदाचित्. पण तूं अजून लहान आहेस. सत्कार्यांत शाब्दिक अडथळ्यांनीं विघ्नें निर्माण करायला तूं शिकूं नकोस. अंग चोरणारे खुशाल तसं करोत पण म्हणावं, माझीही कांहीं पुण्याई आहे, मींहि चार कार्यकर्ते जमवले आहेत.'

'हें पहा अण्णा, तुमचं तें सत्कार्य किंवा काय तें तुमचं तुम्ही पहा. पण तुम्हांला मी एवढं सांगतों कीं, तुमच्याबरोबर मी राहायला हवा असेन

तर तेवढं मी करीन. तुम्हांला मी धक्का लागूं देणार नाहीं. आणि तेवढ्या करतांच मी तुमच्याबरोबर राहीन. '

' ती तर माझी खात्रीच होती. पण नुसतं तूं एवढंच म्हणून भागायचं नाहीं राजेंद्र ! अरे, हा मला एका व्यक्तीला का संभाळायचा प्रश्न आहे ? मग माझ्या घरांतून मी बाहेरच पडलों नाहीं कीं मी सुखरूप आहेच कीं ! हा प्रश्न अधिक व्यापक आहे ! आपण ज्या संस्कृतींत वाढलो, आपण जी संस्कृति मनोभावें उच्च मानली तिच्या संरक्षणाचा हा प्रश्न आहे. आणि गंमत तर हीच आहे कीं, मी म्हणतों हें सर्वांना मान्य आहे; पण प्रत्यक्ष या प्रतिकाराला मी सिद्ध झालों तेव्हा मात्र जो तो मागें सरकतो आहे. आणि म्हणूनच मला निदान तुझ्यासारख्या तरुणाचं साहाय्य हवं आहे. आतां हे प्रोफेसर आणि पुढारी यांचं साहाय्य पुरें झालं. कारण प्रत्येकाच्या तात्त्विक भूमिकांतच किंचित्सा मूलभूत फरक असल्याचं निमित्तमात्र सांगून जर जो तो अंग चोरूं लागला तर मीं तरी कुठवर त्यांना पुरे पडेन ? कुणी म्हणतो प्रतिकाराचा काळ यायचा आहे, कुणी म्हणतो पेशव्यांनीं दक्षिणेंत निजामाचं राज्य राहूं दिलं तेव्हांच ती सुवर्णसंधि कायमची नाहींशी झाली आहे, कुणी म्हणतो मी व्यक्तिशः च कांहीं मर्यादेपर्यंत सहकार्य करीन, इत्यादि. तेव्हां म्हटलं कीं, शेवटीं आपलें आपण हेंच खरं. ' आपला सखा पांडुरंग ' म्हणावं आणि होईल तें करावं ! अण्णांचं हें लांबलचक वक्तव्य ऐकून मला खरंच वाईट वाटलं.

ज्या ठिकाणीं त्या इराण्यानं हॉटेल घातलं होतं त्याच्या बरोबर समोर एक ब्राह्मणाचें ' अमृत-समान. चहा आणि क्षुधाशांतिसमाधान गृह ' होतं. हें 'गृह' रोज रात्रीं नऊ वाजतां बंद होत असे. पण समोर इराणी आल्यापासूनं तें अकरापर्यंत उघडें राहू लागलें. या समाधान-गृहांतच आमच्या युद्ध मंडळाच्या बैठकी भरूं लागल्या. आजपर्यंत कुठल्याहि हॉटेलांत चहा न घेतलेले अण्णा इथें येऊन बसून मालकानें अत्यंत आदरपूर्वक पुढें केलेला चहा संकोचानें कां होईना, उष्टावूं लागले. कारण मालक स्वतः त्यांना अत्यंत लीनतेनें आणि आग्रहानें चहा आणून देऊं लागले. शिवाय भांडीं घासायला नेणाऱ्या गड्याशिवाय तेथें अब्राह्मणाचा स्पर्शहि नव्हता ! मग म्लेंच्छाचें तर नांवच नको. हॉटेलांत रात्रीं नऊच्या पुढें कुणीहि गिऱ्हाईक नसलें-नसा-

यचेंच; कारण पूर्वीची प्रथा नवाच्या आंत हॉटेल बंद व्हायची होती—तरी आम्हां मंडळीकरतां हॉटेल उघडे ठेऊन मालक जागत राहायचे. आणि तिथला पोरगा महादू फडकं हातांत धरून एका कोपऱ्यांतल्या खुर्चीवर पेंगत बसायचा.

पण जसजशी दिवसगत होऊं लागली तसतसा मनोमन माझा उत्साह मावळूं लागला. मी तुम्हांला प्रथम सांगितलंच कीं केवळ अण्णांच्या करतांच मी त्यांचा सहकारी झालों होतों. पण इथें तर न मागतां पुढारीपणाची माळ माझ्या गळयांत पडली होती. ज्या समाजाकरतां हें सर्व करायचं त्यांतले वयोवृद्ध ' आपलं काय आतां या जगांत राहिलंय ! ' अशी मुद्रा करून या कार्याबद्दल उदासीन होते तर पुरोगामी म्हणवणारा तरुणवर्ग आमची रेवडी कशी होईल तें बघायला उत्सुक होता. जे आमचे सहकारी होते तेहि वेगवेगळया कारणांनीं एकत्र आले होते. आणि तसं पाहिलं तर खरोखरीच त्यांच्यांतहि विचारापेक्षां उत्साहच जास्त होता.

पण तें कांहींहि असलं तरी एकंदरींत आमच्या युद्धमंडळाची गांवांत जाहिरात तर खूपच झाली होती. केवळ अण्णांच्या बाजूस उभा राहण्याकरतां या भानगडींत पडलेला मी. पण आतां युद्धमंडळांतील आघाडीचा वीर, संस्कृतिसंरक्षक समितीचा नेता, इत्यादि नात्यांनींच लोक मला ओळखूं लागले होते. आमच्या गांवांत मी चळवळया म्हणून पांढरपेशा समाजांत आणि तालमीच्या व कुस्तीच्या नादानं श्रमजीवि समाजांतहि थोडाफार प्रसिद्ध होतों. गांवांतल्या वेगवेगळ्या ' संघटना ' आणि ' वर्ग ' माझ्या परिचयाचे होते. आणि अनेक ठिकाणीं मी ' बौद्धिकें 'ही घेतलेलीं होतीं. हिंदुजातीच्या भूतकाळाचा महिमा मला महनीय वाटे. आणि हिंदुराष्ट्राच्या भव्योदात्त भवितव्यावर माझी उत्कट श्रद्धा होती. तरी पण इराण्याचें हॉटेल आमच्या दीड चौरस मैलाच्या वसतिस्थानांत झाल्यानें आमच्या संस्कृतीला कसा धक्का बसत होता, तें मला कळेना. अण्णांच्या लोभानें आणि त्यांच्या बाजूस राहण्याकरतां म्हणून मी त्यांत पडलों आणि पाहता पाहतां, पण मला न कळतच त्या लढ्याचा पुढारीहि झालों.

अहिंदूच्या हॉटेलांत पूर्वी मुंबईस असतांनाहि मी कित्येक वेळां चहापाणी घेतलें होतें. आणि मी स्वतः ' काट-छाट-भक्षण ' निषिद्ध मानीत असलों

तरी आज माझे लेफ्टनंट्स म्हणून जे माझ्या भोंवतीं उभे होते, त्यापैकींच कांहीं कट्टर हिंदुत्वनिष्ठ असूनहि ' रक्तमांसा'ची संवय व्हावी म्हणून 'काट-छाट-भक्षणा'चे कार्यक्रम आखून पार पाडीत असत, हें मला माहित होते. पण असं असूनहि आमच्या वस्तींत हें इराण्याचें रेस्टॉरंट राहातां कामा नये असें त्यांना खरें कीं खोटें पण वाटत होतें. आणि असें ठरल्यानंतर हेच माझे सहकारी अप्रत्यक्षपणें माझ्यावर हुकुमत गाजवूं लागले. ' अमृतसमान इत्यादि,' चहाच्या दुकानांतल्या महादूनं कळकट फडका मारलेल्या टेबलावर व बादलींत खळबळलेल्या कपबशांतून—आणि तें सर्व समोर दिसे—दिलेला चहा पिण्यापेक्षां किंवा पोचे आलेल्या पितळेच्या बंपरमधून पाणी पिण्यापेक्षां समोरच्या इराण्याकडे जाऊन कांचेच्या स्वच्छ ग्लासांत थंडगार पाणी प्यावें किंवा गवताच्या नळींतून फौंटनमधील थंडगार ड्रिंक प्यावें असं मला केव्हां केव्हां फार फार वाटे. मी कॉलेजांत असतांना गेल्या सहामाहींतच हें हॉटेल सुरूं झालें असल्यानें मी तिथें जाऊन कधींच कांहीं घेतलें नव्हतें. आणि आल्याबरोबर त्याच्याशीं शत्रुत्व पुकारण्याचा योग आल्यानें आतां तें शक्य नव्हतें.

असेंच एके दिवशीं रात्रीं अकरा वाजण्याच्या सुमारास आमचें युद्धमंडळ ' अमृतसम... इत्यादि ' विश्रांतिगृहांत समाधान व्यक्त करीत नी गप्पा मारीत बसलें होतें. गेल्याच महिन्यांत त्या हॉटेलांत शिरून धमाल उडवल्याची हकीकत एकजण रसभरित वर्णन करून सांगत होता. तिथल्या एका वेटरनें उद्धटपणें बोलून अपमान केल्याच्या निमित्तानें तिथलीं कांहीं ग्लासें व कपबशा कशा नामशेष केल्या गेल्या आणि पोलिसनें चौकशी केली तेव्हां खुद्द त्या इराण्यानेंच घाबरून कशी माघार घेतली तें दुसऱ्यानें सांगितलें. तिसरा म्हणाला, ' मला कांहीं बुवा तें पसंत नव्हतें. तो इराणी बिचारा, पाण्यांत राहून माशाशीं वैर नको म्हणून गप्प बसला. करायची तर सरळ लढाई करावी; आणि म्हणूनच मी आपला या निरोधनाच्या सरळ लढाईत भाग घ्यायला तयार झालों. '

' पण खरंच आपले ते अप्पासाहेब इथें निरोधन करणार होते असं ऐकलं होतं, तें कां बारगळलं ? ' मी विचारलें. ' मी बनारसला असतांना कुणी तरी मला असं ओझरतं लिहिलं होतं ! '

'जाऊं दे रे राजा, अप्पासाहेब कां बारगळले नि काकासाहेब कां धास्तावले हा विचार आपल्याला करून करायचं आहे काय?' अण्णा म्हणाले.

'कां बरं, अप्पासाहेबांसारखा कार्यकर्ता ज्या अर्थी योजलेलं काम सोडून देतो त्या अर्थी त्याला तशीच कांही कारणं असतीलच.'

'वा, त्यावेळीं आलं होतं की वर्तमानपत्रांत.' एकजण म्हणाला.

'जाऊं द्या रे. झालं गेलं काय उगाळीत बसलांत. आपण काम करायला निघालों आहों ना? मग त्याचं आधीं बोलूं.' पांडुअण्णांच्या एकंदर आविर्भावावरून त्यांना ती चर्चा अप्रिय वाटत असावी, हें मी ताडलं. मग मीहि विषय बदलला. इराण्याकडे धमाल उडवून देणाऱ्या वीराकडे पहात मी हंसत हंसत म्हटलं, 'पण दोस्त हो, त्या निमित्तानं तुम्ही तिथं जाऊन कोल्ड्रींक प्यायलांत तर! आणि आल्यापासून मला मात्र तिकडे जाऊं नको म्हणतां. वास्तविक एक आपले पांडुअण्णा सोडले तर पाण्याला विटाळ होतो असं मानणारा आपल्यापैकीं कोणीच नाहीं!'

'तसं नव्हे राजा. अरे ते आपध्दर्म म्हणून एकदा पाहणी करण्याकरतां गेले होते!' अण्णा मला समजावूं लागले.

'मग आपण एकदां पाहणी करायला काय हरकत आहे? इथं बसून हें कुबट पाणी या उकाड्यांत पिण्यापेक्षां आपणहि एकदा तिकडे जाऊन गार पाणी पिऊं आणि पहाणी करून येऊं.'

'आज तुझ्या अंगांत काय संचारलं आहे? अरे, इतकी आपण कार्याची आखणी केली, आतां उद्यां किंवा परवां आपण प्रत्यक्ष निरोधनास सुरुवात करणार आणि तूं हें काय डोक्यात घेतलं आहेस?' अण्णा पुढें सांगूं लागले, 'ते शेजारचे नगरपाड्याचे शेठ गोविंदलाल आहेत ना, त्यांनीं देखील आमच्या कार्याला मदत म्हणून पांचशें रुपये द्यायचं कबूल केलं आहे.'

'कोण शेठ गोविंददास?' असें मी म्हणतों आहे तोंच आमच्यासमोर रस्त्यावर प्रकाश पडलेला दिसला आणि एक सुरेख मोटार समोरच्या इराण्यासमोर आवाज न करतां एकदम खडी झाली. आम्ही सर्वच जण कांहींशा कुतुहलानें बघूं लागलों.

आंतून एक वस्त्रालंकारमंडित तरुण जोडपें उतरलेलें दिसलें. दुकाना-समोरील दिव्यांच्या प्रकाशांत त्यांचीं वस्त्राभरणें, तशींच अंगकांतीहि खुलून

दिसत होती. तरुणाचा पोशाख साधा दिसत असला तरी रेशमी होता. त्याच्या डोक्यावर मारवाडी पद्धतीचें पागोटें दिसत होतें. बोटांतल्या आंगठ्याहि चमकत होत्या. तो प्रथम उतरला व त्यानें बरोबरच्या स्त्रीला हात देऊन खालीं उतरविलें. तसें करीत असतां त्याचें तोंड आमच्या दिशेकडे वळलेलें होतें. तीं दोघें उतरताच शोफरनें मोटार दोन पावलें पुढें सरकवून बाजूस उभी केली. ती मोटार आमच्या व त्यांच्यामधून बाजूस होतांच त्या तरुणाचा चेहरा मला दिव्याच्या उजेडांत स्पष्ट दिसला आणि मीं ओळखलें कीं तो जगमोहन होता.

'अरे, हा इथें कसा?' असें एकदम मी उद्गारलों आणि अण्णांच्याकडे वळून म्हटलें, 'अण्णा, हा जगमोहन. तुमच्या गोविंददासशेठचा मुलगा आणि माझा दोस्त.'

'आणि ती त्याची बायको वाटतं! आणि हा शुंभ आपल्या बायकोला घेऊन अशा भलत्यावेळीं इराण्याच्या दुकानांत कशाला आला आहे? 'अण्णा सात्विक संतापानें म्हणाले.

'आला असेल बाटली फोडायला. घरीं जें जमत नाहीं तें करायची श्रीमंतांची जागा आहे ही.' ग्लासें फोडून आलेले आमचे सहकारी कुत्सित-पणानें म्हणाले.

आतां मलाहि राग आला. मी चटकन् त्याच्याकडे वळून म्हटलें, 'भेकडा-सारखी नुसती लोकांचीं ग्लासें फोडण्यपेक्षां स्वतःच्या खर्चानें बाटल्या फोडलेल्या परवडल्या.' नंतर अण्णांकडे वळून मीं म्हटलें, 'अण्णा, मी जरा त्याला भेटून येतो हं.'

'राजा, राजाभाऊ' अशा अण्णांच्या दोन हांका मी ऐकल्या. पण मी तेवढ्यांत इराण्याच्या दारांत शिरलोंहि होतों. तेवढ्यांत मोठ्यानें उच्चारलेले शब्द माझ्या कानांत शिरलेच. 'अहो अण्णा, तो कसला आतां परत येतो!'

मी इराण्याला विचारलें, 'अब जो साब आये वो कहां बैठे हैं?'

'सात नंबर में.' एका बाजूला हात दाखवीत इराणी उत्तरला. मी तिकडे वळलों. त्या बाजूला लांकडाचीं व कांचेच्या तावदानांचीं सुंदर पार्टि-शन्स घालून लहान लहान खोल्या केलेल्या दिसत होत्या. हॉटेलमधील आंतला रंग व व्हार्निश यांचा नवेपणाहि अजून कांहींसा कायमच होता.

विजेच्या निरनिराळ्या आकारांच्या व रंगांच्या दिव्यांत आंतलें वातावरण मोठें आल्हाददायक वाटत होतें. एका क्षणांत माझ्या मनात समोरच्या हॉटेलची आणि या हॉटेलची तुलना होऊन गेली.

इराण्यानें खुणेनें दाखविलेल्या छोट्या खोलीजवळ मी गेलों आणि दारावर टिचकी वाजवून विचारलें, 'मैं अंदर आ सकता हूं?' आणि वाक्य पुरें होण्याच्या आंतच दार थोडे ढकलून हंसत आंत डोकावलों. माझा प्रश्न ऐकून जगमोहन दाराकडे बघतो तोंच अस्मादिकाचें श्रीमुख त्याच्या दृष्टीस पडलें. एक क्षणच त्याच्या चेहऱ्यावर प्रश्नचिन्ह दिसलें. पण पुढच्याच क्षणाला मित्रानें मित्राला ओळखलें. एकदम उठून माझे हात आपल्या हातांत घेत तो म्हणाला, 'ओ हो, राजेंद्र, तूं इकडे कुठें ?'

मला पाहातांच त्याच्या पत्नीनें माथ्याखालीं ढळलेला पदर एकदम खूप पुढें घेतला होता. तिच्याकडे वळून तो म्हणाला, 'लक्ष्मी, एवढा संकोच बाळगायचं मुळींच कारण नाहीं तुला. तूं याला ओळखलं नाहींस का? आपल्या लग्नानंतर लग्नसमारंभाच्या एकंदर प्रकाराचा शीण घालवायला आपण चर्चगेटवरील 'पुरोहित'मध्यें गेलों होतों त्या वेळीं खुसखुशीत पदार्थांपेक्षांहि खुसखुशीत संभाषणानं आपला शीण खरोखर ज्यानं नाहींसा केला तोच हा राजा नव्हे का?'

'हें बघ मोहन, इतकी लांबलचक आठवण ज्याअर्थी करून द्यावी लागली आहे त्याअर्थी समजलं मला वहिनींनीं कितपत ओळखलं तें. तेव्हां आतां मी जातों. उद्यां आपण पुन्हां भेटूं. I really don't want to disturb you.'

'होय, दोघात तिसरा आला म्हणजे विरस तर होतोच. पण आतां काय करायचं?' गांभीर्याचा आव आणून—लक्ष्मी—त्याची पत्नी म्हणाली. 'पण आतां एवीतेवी आलाच आहांत तर एक थंडगार ड्रिंक घेऊन जा.' नवऱ्याकडे वळून लगेच ती म्हणाली, 'होय कीं नाहीं हो?'

'नाहीं तर काय? त्याला एक रीतभात नाहीं म्हणून आपल्याला काय गृहस्थधर्म सुटला आहे?'

एवढ्या वेळांत सगळें उसनें गांभीर्य विरघळून आम्ही तिघेहि मनमोकळेपणानें हंसूं लागलों होतों. जगमोहननं हात धरून मला खुर्चीवर बसवलं.

आणि घंटेचं बटन दाबून वेटरला हांक दिली. वेटर आमच्या खोलींत डोकावतो तोंच पलीकडच्या पार्टीशनचें दार वाजलें आणि एकदम तीनचार लोक धाडकन् दार लोटून आंतल्या खुर्च्यांवर आदळल्यागत बसलेले आम्ही ऐकलें. मध्यें असलेल्या ग्राऊंड ग्लासमधून मला पलीकडचे चेहरे अंधुक दिसत होते. मी ओळखलं कीं, समोरच्या विश्रांतिगृहाचा त्याग करून युद्धमंडळ खुद्द आघाडीच्याहि आंत आलं होतं. मला भीति पडली कीं, युद्धाला आतांच तोंड लागणार! माझा चिंताक्रांत चेहरा आणि मी अवघडून बसलेला पाहून माझ्या पाठीवर थाप मारीत जगमोहन म्हणाला, ' दोस्त, अरे तूं असा गप्प गप्प का ? '

' अहो, त्यांना भलते प्रश्न काय विचारतां ? असें मध्येंच अचानक गप्प, एकदम बोलके, पुन्हां एकदम गप्प होण्याचेच त्यांचे आता दिवस आहेत. आपलं लग्न झालं म्हणून त्यांचंहि झालं असेल, असं समजूं नका. असेल कांही तरी प्रेमाची भानगड, म्हणून नसेल स्वारीचं मन ठिकाणावर. '

' वहिनीसाहेब, तुम्ही इतकं बोलायला लागलांत याबद्दल तुमचं मनःपूर्वक अभिनंदन करतों. पण नम्रपणानं एवढंच आपल्या नजरेस आणतों कीं, मी प्रेमाब्रिमांत मुळीं पडलों नाहीं. तरी पण नुकताच एका युद्धांत पडलों होतों आणि आतां तुमच्या ड्रिंक घेण्याच्या आग्रहानं तोंडघशी मात्र पडणार आहें. '

' हें बघ राजा, तुझं तें काव्य मला नको. एक आणि एक दोन एवढंच समजणारा मी पक्का मारवाडी आहें. इराण्याच्या हॉटेलांत आलों म्हणून आपला मारवाडी बाणा विसरलो असं समजूं नकोस. कदाचित् हें हॉटेलच विकत घेण्याच्या दृष्टीनं पाहणी करायलाहि मी आलों असेन. '

' समजला रे तुझा मारवाडी बाणा ! आज माझा मराठी बाणा पणास लागला आहे त्याची आधीं वाट लाग ' असं म्हणून मी त्याला थोडक्यांत सर्व हकीकत सांगितली.

' राजाभाऊ धन्य असो तुझी आणि तुझ्या मोहिमेची. अरे, तुझ्या डोक्यांत हें खूळ भरवलं कुणी ? ऐन थंडीच्या मोसमांत इराण्याकडे जाऊन पैजेनं सात सात बर्फ घातलेलीं ड्रिंक्स पिणारा तूं, तूं इराण्याच्या दारापुढं सत्याग्रह करणार ! '

'जगमोहन, तूं चुकतो आहेस. पहिली गोष्ट अशी कीं, सत्याग्रह करणाऱ्या गृहस्थाच्या बरोबर राहायलाच फक्त मी बांधून घेतलं आहे. आणि दुसरी गोष्ट अशी कीं या मोहिमेंत भाग घेणारे कांहींजण नदीपलीकडच्या इराण्याच्या हॉटेलांत जाऊन अभक्ष्यभक्षणहि करणारे आहेत. पण त्यांच्या दृष्टीनं हा वाद तत्त्वाचा आहे. आमच्या आजपर्यंत सोज्ज्वळ नि सुसंस्कृत राहिलेल्या वस्तींत हें आक्रमण आम्ही पत्करावं कीं काय हाच खरा प्रश्न आहे. या लढ्याची कल्पना आणि पुढारीपण मला ज्याच्याबद्दल अत्यंत आदर आहे अशा एका सत्वस्थ गृहस्थाकडे आहे आणि म्हणूनच या गोष्टीशीं माझा संबंध तरी आला.'

'हे बघ राजेंद्र, एखाद्या परराष्ट्रमंत्र्यासारखा कष्टी चेहरा करून बोलायचं कांहीं कारण नाहीं. मी तुला सांगतों तुझा हा सत्वस्थ पुढारी माझ्या माहितीचा आहे.'

पांडुअण्णाची थट्टा करण्याची त्याला लहर येते कीं काय अशी मला भीति पडली. मी त्याला खुणेनें बोट करून ते पलीकडच्या खोलींत असल्याचं त्याला सुचवलं आणि हात जोडले. पण तो आणखी जोरांत म्हणतो,

'हो रे, असूं देत ते पलीकडे. मलाहि तुझ्या सत्वस्थ पुढाऱ्याबद्दल पूर्ण आदर आहे. प्रश्न आहे तो एखाद्याबद्दल खूप आदर असला म्हणून त्याचीं सगळी खुळं डोक्यावर घेऊन नाचायचं कीं काय हा! माझ्या वडिलांना—सुद्धा त्यांच्याबद्दल खूप आदर आहे आणि त्यांच्या चळवळीला पांचशें रुपये देऊन त्यांनीं तो व्यक्तहि केला आहे.'

'तुला रे काय हें माहीत?' मी विचारलें.

'अरे, आणखीहि पुष्कळ माहीत आहे. तुमच्या गांवांतले प्रमुख कार्यकर्ते अप्पासाहेब येथें निरोधन करणार होते. तें त्यांनीं का मागें घेतलें माहीत आहे?' त्यानेंच उलट विचारलें. एवढ्यांत रासबेरीचीं ग्लासें आलीं. लक्ष्मीनें तर ड्रिंक्स दिसतांच 'घ्या ना राजाभाऊ' असें म्हणत स्वतः घ्यावयास सुरुवातहि केली. माझं लक्ष मात्र जगमोहन काय सांगतो इकडे होतें. समोरच्या पेयाचा एक घोट घेत तो म्हणाला,

'अप्पासाहेबांनीं या इराण्याला पत्र लिहून कळविलं कीं, तुम्ही गोमांसाचें

जिन्नसहि विकतां असं मला कळलं आहे. माझ्या आणि माझ्या बांधवांच्या भावनांना यामुळें जबरदस्त धक्का बसला आहे. तुमचं हॉटेल मला बंद करतां येत नाहीं. पण गिऱ्हाईक बंद करण्याची मात्र मी पराकाष्ठा करीन. त्याकरतांच मी तुमच्या हॉटेलसमोर निरोधन करणार आहे. तुम्ही या गोष्टीचा विचार करावा म्हणून आगाऊ कळवीत आहे.'

या इराण्यानं उलट कळविलं कीं, मी धर्मानं बहाई आहे आणि मी गोमांसाचे पदार्थ विकीत नाहीं. आपल्या भावनांबद्दल आणि धर्माबद्दल मला पूर्ण आदर आहे. आपण निरोधन करण्याऐवजीं पाहुणे म्हणून माझ्याकडे या, अशी मी विनंति करतों. आपला गैरसमज दूर होईल अशी आशा आहे' अर्थात् अप्पासाहेब गप्प कां बसले हें तुला आतां कळलंच असेल. आणखीहि पुढें ऐक.

जगमोहनचें व्याख्यान थांबत नाहीं असें पाहून लक्ष्मी म्हणाली, 'अहो पण त्याना आधीं रासबेरी तर पिऊं दे. त्यांतलं सगळं बर्फ वितळून गेलं आणि आतां तें पेय उबटसुद्धां झालं असेल तुमच्या व्याख्यानानं.'

'काहीं हरकत नाहीं. त्यांत पुन्हां बर्फ घालूं. कारण माझं सगळं व्याख्यान झाल्याशिवाय तो तें पिईलसं दिसत नाहीं. हें बघ राजेंद्र, या तुझ्या अण्णांचीच गोष्ट घे. आमच्या वडिलांना त्यांच्याबद्दल 'भला माणस' म्हणून फार आदर. बरं, त्यांना आपल्या व्यवसायाखेरीज इतर बाबतींत वादविवाद करून वेळ घालवायची संवय नाहीं. यांनीं येऊन आपलं कार्य वगैरे सांगितलं आणि त्यांनीं मुकाट्यानें नमस्कार करून पांचशें रुपयांचा चेक दिला.'

'पण आमचे मामाजी हरिजन फंडाला आणि गोरक्षण संस्थेलाहि पांच पांच हजार रुपये देतात हें कुठें त्यांना माहीत आहे?' लक्ष्मी हंसत म्हणाली.

'हें झालं फंडांच पण धंदा करतांना एखाद्या कसाईखान्याचे देखील ते भागीदार होतील आणि तितक्याच निर्लेप मनानं, हें तरी यांना कुठं माहीत आहे? तुझ्या अण्णांचं एक असो. त्यांचीं मतं आतां त्यांना कायम चिकटलेलींच राहाणार—देव करो आणि ती तशी राहून तरी त्यांना मनःस्वास्थ्य लाभो—पण नव्या पिढींतला तूं, विज्ञानाच्या वाढीनं जगांतले समाज किती एकत्र आले आहेत हें तूं पाहिलेलें; तुला कोणी सांगितलं ही उष्टी शितं गोळा करून गांवजेवण घालायला? आणि कांहीं चढाईच

करायची तर ती आधुनिक तऱ्हेनं तरी कर. मी हें दुकान विकत घेतों अन् तूं चालवायला बैस. अरे, जे तुम्हांला कधींहि करतां आलं नाहीं तें लोकांनीं केलं तर त्यांच्याहून वरचढ व्हायचा तुम्ही प्रयत्न करणार कीं उगीच त्यांच्या नांवानं बोटं मोडीत बसणार ? परदेशांतनं इतके इराणी इथं येऊन दुकानं घालताहेत, त्यांना गिऱ्हाईक मिळतं तें तुम्हांला कां मिळूं नये ? कळकट कपांतला घाणेरडा ' शिंगल ' पिऊन होईपर्यंत खालच्या मोडक्या खुर्चीतले ढेकूण तुमचं तितकंच रक्त शोषण करतात. तिथं नाहीं का संस्कृति भंगत ? अरे जरा जग कुठं गेलं आहे याचा विचार करा. '

त्याला चेव येऊन तो बोलत होता. लक्ष्मी गालांतल्या गालांत आम्हां दोघांकडे पाहून हंसत होती.

अगदीं शांतपणाचा आव आणून मी म्हणालों, ' अरे पण तूं मला का इतका डोस पाजतो आहेस ? तुला कुणी सांगितलं कीं, मी असल्या संस्कृतीच्या रक्षणाचं कंकण बांधलं आहे म्हणून ? '

' अरे निराळं सांगायला कशाला पाहिजे ? त्या रासबेरीला अजून हात लावला नाहींस त्यावरूनच दिसतं. उद्याच्या मोहिमेचा नेता तूं. आजच आमच्या घरीं चर्चा चालली होती. हो, तें तुला सांगायचं राहिलंच. इथं एका लग्नाकरितां आम्हीं आलों आहोंत. आमच्या लोकांचं कार्य म्हणजे काय गोंधळ असतो याची कल्पना तुला आहेच. गेले चार दिवस घरांत आणि समारंभांत अगदीं उबून गेलो. बाहेर कसं पडावं तेंच कळेना. एवढ्यांत आज इथून जवळच असलेल्या महादेवाच्या दर्शनाला जायचं ठरलं. परत येतांना मी मोटार उभी करून कांहीं तरी दुरुस्ती करीत असल्याचं सोंग केलं आणि ' तुम्ही पुढं व्हा, आम्ही पाठोपाठ येतोंच. ' असं सांगून बाकी मंडळी वाटेस लावली. आणि ती जातांच गाडी इथें आणली. नवीन सुंदर हॉटेल झालं आहे असं कळलं तेव्हां स्वस्थपणानं रासबेरी प्यायला आलों तर इथं तूं माझ्या डोक्याला ताप दिलास. '

' मग आतां ही रासबेरीच तुझ्या डोक्यावर ओततों म्हणजे तें शांत होईल. '

' छे छे, तसं म्हणून तुझी मात्र सुटका व्हायची नाहीं. मला गरज लागली

तर मी बर्फाची वीटच डोक्यावर ठेवून घेईन पण ही रासबेरी मात्र तुलाच पाजणार आहे.'

'अहो, पण ती पुरेशी गार राहिली नाहीं आतां. नाहीं का हो राजाभाऊ? तुम्हांला तर म्हणे ड्रिंक भारीच गार हवं असतं.'

लक्ष्मीच्या डोळ्यातून मिस्कीलपणा नुसता ओसंडत होता. पण मी तरी काय करणार? ती रासबेरी घेईपर्यंत हा तोंड दाबून बुक्क्याचा मार सहन करणं भागच होतं. पलीकडच्या खोलीशीं डोकावून वेटर विचारीत होता, 'साब, आपको क्या कुछ नही चाहिये?'

'कुछ नहि होना!' इतकंच अण्णानीं जोरानं म्हटलेलं मी ऐकलं. आमचं सगळं संभाषण त्यांनीं खासच ऐकलं होतं. त्यांच्या मनःस्थितीची मला कांहींशी कल्पना येत होती.

'अगदीं सनातनी समजल्या गेलेल्या एका मारवाडी कुटुंबांतील एक जोडपं —ज्यांच्या घरांतल्या कर्त्या पुरुषानंच त्याना पाचशें रुपये दिले होते—विसाव्या-करता इराण्याकडे येतें; आपल्यावर उघड उघड टीका होते; मनाची कवाडें घट्ट लावून घेऊन ज्या गोष्टींचा विचार करायचें आपण टाळलें त्याच स्पष्ट स्पष्ट ऐकाव्या लागतात; जे आपल्याबरोबर आहे तसे वाटतात तेहि खरोखर आपल्याबरोबर नाहींत; संस्कृतीबद्दलच्या आपल्या कल्पना त्यांना आचारांत मान्य नाहींत; फक्त दिखाऊ प्रदर्शन मात्र त्यांना हवें आहे आणि तें सुद्धा केवळ माझ्या समाधानासाठीं!'

इत्यादि विचारांनीं त्याच्या डोक्यात गर्दी केली असेल, हें मला समजत होतं. तरी पण त्यांच्या पुरते त्याचे संस्कार प्रबळच राहणार होते आणि म्हणूनच माझ्यापुढें असलेल्या ग्लासांतलें ड्रिंक, बिनतोड कोटिक्रमापुढें शरणचिठ्ठी देऊन मी पिणार होतों, हें कळूनच त्यांच्या मनाचा जळफळाट होत असेल हेंहि मला कळत होतें. त्यांच्या खेरीज बाकीचे आम्ही सगळेच त्यांच्या दृष्टीनें डागळलेले होतो हे त्याना पण माहीत होतें. एखादी टाळलेली गोष्ट प्रत्यक्ष डोळ्यापुढें घडत असल्यानें त्यांना मनस्ताप होणें साहजिक होतें. पण माझाहि इलाज नव्हता. मारून मुटकून पत्करलेलं वेडेपण सोडून द्यायची मला ही योग्य संधि आली होती. घुटमळणाऱ्या माझ्या मनाचा

निश्चय झाला होता. आपण अण्णांना दुखवणार याचेंच मला वाईट वाटत होतें.

एवढ्यांत जगमोहननें वेटरकडून बशीभर बर्फ आणवला. त्यांतला अेक भला मोठा खडा उचलून लक्ष्मीनें माझ्या समोरच्या ग्लासांत टाकला. जगमोहन मला 'उचल तो ग्लास' म्हणून खूण करीत होता. पलीकडे पार्टिशनच्या पांढऱ्या कांचेंतून अण्णांचा चेहरा एकाद्या सांवलीप्रमाणें मला दिसत होता. आणि समोरच्या रासबेरीच्या ग्लासात संक्रांति आणि बर्फ एकदमच वितळतांना मी पाहात होतों.

मनोगत १

# दीपावलीची गुजगोष्ट



[ १९४४ च्या दीपावली अंकांत 'मनोगत' या सदरांत कांहीं विचार ग्रथित करावयास सुरवात केली. मे १९४६ पर्यंत दोन दीपावली अंक व दोन वर्षारंभ अंक मिळून असे चार लेख लिहिले, ते त्याचक्रमानें येथें दिले आहेत. ]

नवरात्र संपलेलें आहे. दसराहि उजाडला आणि मावळला. आणि आज दीपावली आपल्या दृष्टिपथांत आलेली आहे. दीपावलीच्या आगमनाच्या कल्पनेनंच हिंदु मन उजळून निघतं, पुलकित होतं. अगदीं लहानपणाची गोष्ट मला आठवते. दिवाळी संपून महिना दोन महिने झाले असतील नसतील, दिवाळींत खाल्लेल्या लाडू-करंज्यांची आणि उडविलेल्या फटाक्यांची आठवणहि बुजली नसेल तोंच आम्ही पुढची दिवाळी कधीं येणार त्याचे दिवस मोजावयास लागत असूं. नवें पंचांग आलें कीं, यंदाची दिवाळी कधीं येते, ती सबंध चार दिवस आहे कीं त्यांत एखादा भाकड दिवस आहे ( कारण त्या दिवशीं फटाके बुडत ) याची आम्ही चौकशी सुरू करीत होतों. तें बालपण संपलेलें आहे–तें पुन्हा येणार नाहीं, या कल्पनेनें मन अनेकदां उदासहि होतें. तरीपण बालपणची ती खोड अजून गेलेली नाहीं. नवीन पंचांग आलें कीं, यंदाची दिवाळी केव्हां येते, 'वाङ्मयशोभे'चा दिवाळी अंक केव्हां काढतां येईल, आणि सर्व कामें हातावेगळीं करून दिवाळी साजरी करावयास घरीं केव्हां जातां येईल याची आतुरता लागून राहाते. कारण एरवीं वर्षभर उद्योग-धंद्याकरितां दूरदूर

पांगलेलीं आम्ही भावंडें चार दिवस तरी दोन खांबांच्या त्या घरांत एकत्र जमायचेंच म्हणून धडपडत असतों. कदाचित् अगदीं आदल्या रात्रीं एक दोन वाजतां मी घरीं पोहोंचेन, रात्र अंधारी असल्यानें सगळीकडे सामसूम असेल, उद्यां दिवाळी म्हणून जागत बसलेल्या किंवा पहाटेच्या ऐवजीं अपरात्रीं उठलेल्या, एखाद्या नादी मुलानें उडविलेल्या फटाक्यांचा आवाज कानीं येईल. मी घरांत शिरतों तोंच ओट्याच्या पायऱ्यांवर रात्रीं लावलेल्या पण आतां तेल संपल्यामुळें मालवलेल्या पणत्या दिवाळीच्या आगमनाची सूचना मला पुन्हा एकदा देतील. ओट्यावर अंथरूण पसरून माझा थोरला भाऊ—तो बहुधा रात्रीं दहाच्या गाडीनें आला असावा—निजलेला मला आढळेल. आणखीन् प्रहराभरानें सगळीं उठणारच आहेत. कशाला आत्तांच कोणाला उठवा—अशा पोक्त विचारानें मीहि माझा होल्डऑल पसरून तिथेंच निजेन. किती वेळ तरी मला झोप लागणार नाहीं. कारण कितीतरी स्मृतितरंग मनांत उठत असतील, आणि मन त्यांच्याशीं रिकामपणीं चाळा करीत बसेल. त्यांतच केव्हांतरी माझा डोळा लागेल. पण थोड्याच वेळांत कोणी तरी मला हलवून उठवील. माझे मेव्हणे मला म्हणतील, ‘ वा राव, आज दिवाळी अन् झोपतां काय ! ’ मी जरा डोळे चोळतों तोंच त्यांच्याबरोबर हिंदुस्थानच्या अगदीं दुसऱ्या दिशेकडून आलेला पण त्यांना स्टेशनवर भेटलेला माझा धाकटा भाऊ पण मला दिसेल. एवढ्यांत आंत माजघरांतला दिवा लागेल आणि दार उघडून आई बाहेर डोकावील तोंच आम्हां सगळ्यांना बघून तिच्या मुखावर मोहोरलेला आनंद तिच्या हातांतील पणतीच्या उजेडांत आम्हांला स्पष्ट दिसेल. आमच्या बरोबरच जांवयांना पाहतांच थोड्या संकोचानें ‘ अरे, बाबुराव आले तर बाहेरच काय बसून राहिलांत; मला नाहीं का दार उघडावयास हांक मारावयाची ! ’ असें ती म्हणेल. त्यावर ‘ छे छे, मी अन् बाळ आतांच आलों; हा नाना आणि बाबा मात्र रात्रींच केव्हां तरी आलेले दिसताहेत. इतक्यांत मागच्या अंगणांत तुळशीवृंदावनाजवळ लावलेल्या पणतीवर ताई-माईनीं फटाक्याचा केलेला पहिला मुहूर्त कानीं पडेल, आणि आधींच दोन दिवस आघाडी मारून घरीं आलेले भाऊराव कमाताईला हाताशीं धरून आंतून दाराशीं येतील. त्यांच्या पाठीशींच फटाक्याचें टोपलें घेतलेला बाबू आणि त्यांच्या पाठीमागें

कमा-बाबूचें दारूकाम पाहाण्यासाठीं जमलेली घरांतील मंडळी दिसतील. आमच्या हास्यविनोदानें आणि फटाक्यामुळें जागे झालेले अप्पासाहेब माडी-वरून खालीं येतां येता ' हं, मग कोण कोण आले आतांपर्यंत ? अरे ! सगळे आलेले दिसताहेत कीं ! काय बाळ, तुला देखील रजा मिळाली वाटतं ? ' असं म्हणतील, आणि मग त्या बोलण्यानें घरीं पोहोंचेपर्यंत केलेली सर्व दगदग आणि शीण नाहींसा झाल्यासारखा आम्हांला वाटेल. एखादं उत्तम गाणं रंगतां रंगता योग्य वेळीं जाणत्याकडून आणि नेणत्यां-कडून अकस्मात् एकदम समाधानाची टाळी पडली म्हणजे गाणाऱ्याला केलेल्या परिश्रमाचं चीज झाल्यासारखं वाटतं, त्याचप्रमाण दैनदिन जीव-नाच्या आस्यापिस्यात सुहृदांकडून कानीं पडणारे असले समाधानाचे शब्द किती सुखद असतात ! एवढ्यात ' अरे, आज नर्कचतुर्दशी—आत्तां उजा-डेल, त्याच्या आंत आंघोळी नाहीं कां करावयाच्या ? मग बसा गप्पा करीत, ' असा आंतून आत्याबाई पुकारा करतील, आणि मग योग्य वेळीं पुढच्या बैठकी घेण्याकरिता आमची पहिली बैठक संपेल.

हे मीं गेलीं काहीं वर्षे थोड्याफार फरकानें पुनः पुन्हा घेतलेल्या अनुभवाचें शब्दचित्र रेखाटलें आहे. पण मला माहीत आहे कीं, ज्या ज्या ठिकाणीं 'घर' म्हणून आहे, आणि आई-वडिलांनीं मुलांचं प्रेमानं संगोपन केलं आहे, तेथें तेथ कालांतरानें आणि परिस्थितीनें एकमेकांना एकमेकापासून दूर नेलं असलं तरी ही ओढ उत्पन्न झालेली असणारच, आणि म्हणूनच ज्या वेळीं पुन्हा एकत्र येऊन चार दिवस एकमेकांच्या सहवासांत घालविण्याची आणि पूर्वायुष्यांतील अशा प्रसंगांच्या सुखदस्मृतींची उजळणी करण्याची संधि माणसाला मिळते, तेव्हां तेव्हा ती संधि घेण्यासाठीं तो उत्सुक असतो. दीपावलीचा मंगल सण हा अशी एक सुवर्णसंधि प्रत्येकाला देत असतो. मनुष्याच्या जीवनाची ही ओढ पाहिली म्हणजे निदान आपल्या हिंदु समाजपुरतं असं वाटूं लागतं कीं, आपल्याला खरी तळमळ या सुखाची आहे. कुटुंबजीवन आणि आपल्याच पातळीवरील आणि आपल्याशीं ज्यांचा नित्य संबंध येतो अशा कांहीं थोड्या कुटुंबांनीं जो समाज अगर जी जमात बनते तेवढयापुरतं सामाजिक जीवन, यापलीकडे आपली दृष्टि पोहोंचत नाहीं. ज्यांची दृष्टि पोहोंचते त्यांच्या बुद्धीला कांहीं गोष्टी पटल्या तरी प्रत्यक्ष

जगल्या जाणाऱ्या जीवनांत आपण, कुटुंब, आणि गरजेपुरता छोटासा समाज येवढ्याच गोष्टींचा समावेश होतो. स्वातंत्र्यासारखे महान् प्रश्नदेखील आपल्या दृष्टीनें नैमित्तिक असतात. आपले दैनंदिन जीवन दिवसेंदिवस निकृष्ट होत चाललें आहे म्हणून केव्हांतरी स्वातंत्र्य मिळणें या जीवनाच्या उत्कर्षाकरितां म्हणून अवश्य आहे, असें आपणांस वाटतें. आणि म्हणूनच 'फोडा आणि झोडा' हें तत्त्व या देशांत प्रभावी ठरूं शकलें. राजकारणांतील या प्रश्नाशीं सध्यां आपणांस कर्तव्य नाहीं. फक्त विषयानुरोधानें आपल्या सुखी जीवनाच्या कल्पना आणि त्याच्या मर्यादा सांगितल्या आहेत येवढेंच. आपली सुखाची कल्पना अशी कांहींशी संकुचित असली तरी, ती हलक्या दर्जाची मात्र खास नाहीं. उलट मला वाटतं कीं, ती अत्यंत बहुमोल आहे. कारण मनुष्याच्या कल्पना व्यक्तिस्वातंत्र्यापासून मानवतेच्या स्वातंत्र्यापर्यंत प्रगल्भ होत गेल्या आणि कालांतरानें सर्व मानवता स्वतंत्र झाली तरी, शेवटीं त्या स्वातंत्र्याचं करायचं काय असा प्रश्न पुढें उभा राहीलच. आणि त्याचं उत्तर शेवटीं प्रत्येक मानवाला त्याची बुद्धि, भावना आणि इच्छा यांना योग्य वाव मिळून त्यानें आपलें जीवन सफल करावें असेंच मिळेल. व्यक्तिजीवनाचें खरें साफल्य कुटुंबजीवनाशिवाय होऊं शकणार नाहीं असें हिंदु समाजाला हजारों वर्षांच्या अनुभवानें माहीत झालें आहे.

आज अनेक देशात कुटुंबसंस्था विस्कळित झालेल्या आपण ऐकतो. कांहीं ठिकाणीं कांहीं कुटुंबें आणि घराणीं यांचा कौटुंबिक स्वार्थ पराकोटीला जाऊन त्यानीं बहुजनसमाजाला पायाखालीं तुडविलें आणि त्याची प्रतिक्रिया झाली ती, कुटुंबसंस्थाच नाहींशी करावी अशी. ही प्रतिक्रिया रास्त असली तरी ती देखील पराकोटीला जाऊं शकत नाहीं. मनुष्याच्या बऱ्याचशा भुका भागविण्याचं आणि त्या योग्य प्रमाणांत नियंत्रित करण्याचं कुटुंब हें मोठं साधन आहे. आणि म्हणूनच कुटुंबसंस्था सुस्थिर आहेत तिथे त्या तशा राखणें आणि नसतील तेथें सुस्थिर करण्याचा प्रयत्न करणें अत्यंत जरुरीचे आहे. सुदैवानें हिंदु समाजात कुटुंबसंस्था भरभक्कम पायावर उभी आहे. चांगले संस्कार आपण आपल्या घरांतच ग्रहण करतों. दुसऱ्यावर प्रेम करणं, दुसऱ्याकरितां त्याग करणं, इत्यादि गोष्टी आपण घरांतच शिकतों. सुदैवानें आज आपल्याला नवीन सामाजिक दृष्टि येत आहे. आपल्याप्रमाणें इतरांनाहि सुखी होण्याचा

पूर्ण हक्क आहे, हें तत्त्व मान्य झालें आहे. केवळ जन्मलों म्हणून मी श्रेष्ठ, या कल्पना जात चालल्या आहेत. फक्त संघटना म्हणजे काय हें मात्र अजून आपणांस कळलेलें नाहीं. मी दुसऱ्याच्या सुखावर आक्रमण करणार नाहीं ही न्यायाची एक बाजू झाली. पण त्याचप्रमाणें माझ्या कुटुंबाच्या आणि ज्या अशा कुटुंबानीं माझा समाज आणि माझें राष्ट्र बनलें आहे, त्यांच्या हक्कावर मी तसूमात्र आक्रमण होऊं देणार नाहीं, ही वृत्ति आपल्यांत पूर्णपणें बाणावयाची आहे. दुसऱ्यांच्या हल्ल्यांनीं आमचा नायनाट झालेला नाहीं व होणार नाहीं. पण आम्हीच आमचे शत्रू झालों तर आम्हांस कोण वांचवूं शकेल? आज पाहिलें तर सुशिक्षित हिंदु मनुष्य हा व्यवहारात फक्त स्वतः-पुरतें पाहाणारा, आणि व्यापक तत्त्वज्ञानाच्या गप्पा मारतांना जगांत कोणा-लाहि हार न जाणारा असा आहे. पण त्याचा परिणाम मात्र विपरीत झाला आहे. निदान यापुढें तरी आपण असा निश्चय केला पाहिजे कीं, ‘फोडा आणि झोडा’ हें तत्त्वज्ञान आमच्या समाजांत तरी यापुढें आम्हीं प्रभावी होऊं देणार नाहीं. माझें घर जसें माझ्या सुखासमाधानाचें केंद्र आहे, तशीं माझ्या बांधवांचीं घरें झालीं पाहिजेत. माझ्या सुखांत कमतरता भासूं लागली म्हणजे मग मी जागा होऊन जागतिक पुनर्घटनेच्या गोष्टी बोलूं लागतों. त्याऐवजीं अफाट पसरलेल्या पण विस्कळित झालेल्या माझ्या समाजाची संघटना करण्याकरितां मी माझा कांहीं वेळ घालवीन; माझ्या निकटच्या बांधवांचीं सुखदुःखें समजून घेण्याकरितां त्यांच्याशीं मी समरस होण्याचा प्रयत्न करीन. सुदैवानें संघटनेचीं सूत्रें सांगणारे पुढारी आपल्यांत झाले आहेत, होत आहेत. स्वतःच्या नैष्ठिक जीवनानें आणि लोकसेवेनें जनतेचीं मनें भारून टाकणारे महात्मे आपल्या डोळ्यांसमोर वावरत आहेत. अशा वेळीं मनांत आणलें तर आपल्यालाहि कार्यप्रवण होतां येईल.

दीपावली हा वद्य पक्षांत येणारा सण आहे. पहिल्या दिवशीं नरकासुराचा वध झाला अशी कथा आहे. दुष्ट कल्पना आणि रूढि निकालांत काढल्या-शिवाय नव्या कालाला योग्य अशा जोमदार नव्या कल्पना आपल्याला पत्क-रतां येणार नाहींत. दुसरा दिवस लक्ष्मीपूजनाचा. त्यादिवशीं गेल्या वर्षांतील हिशेब तपासून, संग्रहित केलेल्या संपत्तीचा आढावा घेऊन तिचें पूजन करावयाचें असतें. आणि नंतरच्या दोन दिवसांत पत्नी आणि भगिनी यांचेकडून ओंवा-

ळून घेऊन कुटुंबांतील स्नेहबंधनें आपण अधिक दृढ करीत असतों. आणि हे वद्यपक्षाचे चारी दिवस सृष्टींतला अंधःकार, पणत्या आणि आकाशदिवे लावून आपण उजळीत असतों. आणि जणूं काय निष्ठेनें चार दिवस हें अंधार उजळण्याचें आनंदाचें व्रत आपण पार पाडलें म्हणजे द्वितीयेची चंद्रकोर दिसून आपण उजळलेल्या प्रकाशात भर घालण्याकरितांच ईश्वरानें हा आकाशदिवा उंचावला आहे कीं काय अशी रम्य कल्पना मनांत येते.

वाङ्मयशोभा, दीपावली १९४४

---

मनोगत २

# गेलीं सहा वर्षें

१६

केल्यानें देशाटन पंडित-मैत्री, सभेंत संचार,
शास्त्रग्रंथविलोकन, मनुजा चातुर्य येतसें फार.

' अगदींच गरज असेल तेव्हां आणि जरूर तेवढाच प्रवास करा ' अशी युद्धकालीन शिकवण आमच्या रेल्वेसरकारनें जरी अलीकडे दोन तीन वर्षांतच दिली असली तरी मी मात्र हा युद्धकालीन आदेश अगदीं युद्धाच्या सुरुवातीपासून आचरणांत आणीत आहे. ' वाङ्मय-शोभा ' मासिक निघूं लागल्यानंतर तें अत्यंत नियमितपणें प्रसिद्ध करावयाचें असें मी मनोमन ठरविलें आणि आरंभीचीं तीन-चार वर्षें त्याच्या सर्व प्रकारच्या कामाचा बोजा बहुशः एकट्यावरच असल्यानें पुणें सोडून दूर कोठें तरी फार दिवस जाणें मला शक्य झालें नाहीं. मला अनेकांची अनेक तऱ्हेनें मदत झाली खरी; पण तिची जुळणी करण्याकरतां मला स्वतःला येथेंच राहावें लागे. आधींच मला प्रवासाची भयंकर हौस अशी नव्हतीच आणि त्यांतून वरील प्रकारची संवय झाल्यानंतर तर मग प्रवास नकोसाच वाटूं लागला आणि अलीकडे तर काय युद्धव्हातुकीमुळें ही प्रवृत्ति अधिकच बळावली.

तरी देखील रेडिओ, वर्तमानपत्रें, पुस्तकें आणि युद्धकालीन गरजेमुळें प्रवास करणाऱ्या लोकांचा सहवास यामुळें सामान्यपणें प्रत्येक माणसाच्या ज्ञानांत खूपच भर पडली आहे आणि शास्त्रीय शोधांनीं दोन ध्रुव इतके जवळ आले आहेत कीं, देशाटन न करतांहि ' पंडितमैत्री ' आणि ' सभेंत संचार ' हीं माणसाला साध्य झालेलीं आहेत. अर्थात् मनुष्याला चातुर्य

अगर शहाणपण मात्र आलेलें नाहीं हा भाग वेगळा. निदान गेल्या सहा वर्षांतील या बैठ्या प्रवासानें मला तरी असं वाटायला लागलं आहे कीं, या सहा वर्षांच्या जागतिक दंगलींत एकंदरींत, मानव कांहीं फारसा शहाणा झालेला नाहीं. कांहीं व्यक्ती शहाण्या झाल्या असतील, कांहीं व्यक्तिसमूह इतरांच्या मानानें पुढें गेले असतील, कांहीं राष्ट्रांनीं कांहीं तात्कालिक फायदा मिळविला असेल पण साकल्यानें विचार केला तर मनुष्याच्या शहाणपणाची उंची वाढलेली दिसत नाहीं, येवढें खरें !

गेल्या सहा वर्षांत ज्या गोष्टी पाहिल्या आणि अनुभव घेतले त्या शितांवरून भाताची परीक्षा करायची झाली तर जगात सर्वत्र हीच तऱ्हा चालू असावी असं वाटतं आणि जें वाचायला आणि ऐकायला मिळतं त्यावरूनहि याच विषण्ण विचाराची प्रचीति पटते. आपण एका मासिकाचे संपादक झालों म्हणून आरंभीं मला जो आनंद झाला होता त्याचा भर पुढचे कष्ट आणि निराशेचे क्षण याच्या माऱ्यांत लवकरच ओसरला. कारण, ज्यामुळें अड-चणींची तीव्रता वाढेल अशी परिस्थिति निर्माण होण्याचीं दुश्चिन्हें तेव्हा-पासूनच होऊं लागलीं होतीं.

सन १९३८ च्या ऑगस्टमध्येंच युद्धाचं फळ पिकत आलं होतं. अनपेक्षित रीतीनें ते पुढ ढकललं गेलं हें खरं असलं तरी १९३९ च्या जून-जुलैपासूनच पुन्हा ' लौकरच युद्ध होणार ' अशी खात्री वाटूं लागली होती. आणि माझ्यासारख्या सडेसोट ( अर्थात् त्या वेळीं ), फारशी आर्थिक विवंचना नसलेल्या आणि संपादक झाल्याच्या ऐटीनें कानात वारे भरलेल्या सुशिक्षित तरुणाला रोज सकाळीं शक्य तितक्या लौकर उठून ताजें वर्तमान-पत्र मिळवून इष्टमित्रांबरोबर आगामी युद्धाबद्दल चर्चा करण्याखेरीज दुसरा कार्यक्रम नसला तर नवल कसलें ! 'जर्मनीजवळ असे शोध आहेत कीं, हें युद्ध एका वर्षातच संपेल,' 'चेंबर्लेननें तयारीला एक वर्ष दिल्यामुळें इंग्लंडनेंहि खूप तयारी केली आहे,' 'काय हो भाई, आगामी युद्ध बोल्शेविझम् आणि नाझिझम् यांमध्यें होणार आहे ना ? मग आता हा अनाक्रमणाचा करार कसला ?' वगैरे वाग्शर या चर्चेत सुटत होते आणि शेवटीं जेव्हां पोलंड-वरील जर्मनीच्या आक्रमणामुळें युद्धाला तोंड लागलें तेव्हां मात्र तात्त्विक चर्चा बाजूस पडून प्रत्यक्ष काय घडतें इकडे सगळ्यांचें लक्ष लागलें.

पोलंडचा प्रश्न हा न्यायान्यायाचा निकष ठरला. बेचिराख झालेल्या पोलंडबद्दल आणि देशोधडीस लागलेल्या तेथील जनतेबद्दल जगास सहानुभूति वाटूं लागली. पण लवकरच असं आढळून आलं कीं, 'न्यायाचें परिपालन' 'आक्रमणाचा प्रतिकार' 'प्रत्येक राष्ट्राचा स्वातंत्र्याचा हक्क' या केवळ घोषणा आहेत. या घोषणा उच्चारणाऱ्या जिभा कितीहि लांब असल्या तरी या लांब जिभा काढून बोलणारांचें मन मात्र निर्मळ नाहीं. प्रत्येकाच्या ओठीं जरी सोज्ज्वल भाषा असली तरी पोटीं काळंबेरं वेगळंच आहे, असें दिसून येऊं लागलें.

जर्मनीच्या बरोबरीनें रशियानें पोलंडवर आक्रमण केलें. स्वतःच्या सोईला येतांच जर्मनीनें अनाक्रमणाचा करार मोडून रशियावर स्वारी केली, चर्चिलनें रूझवेल्टच्या ॲटलांटिक सनदेला संमति दिली, पण वेळ येतांच ती हिंदुस्थानला मात्र लागू नाहीं म्हणून सांगितलें. नाझी जर्मनीचा वेळोवेळीं निषेध करणाऱ्या कॉंग्रेस पुढाऱ्यांनीं युद्ध सुरू होतांच 'आम्हांला विचारल्याशिवाय युद्ध पुकारलें' म्हणून अधिकारत्याग केला, राज्यकर्त्यांच्याकडून स्वातंत्र्याचें आश्वासन मागितलें व स्वतःवर वेळ आली तेव्हां मात्र स्वातंत्र्याचा अर्थ काय आणि राज्यकर्त्यांशीं लढून काय मिळवावयाचें त्याचा खुलासा करावयाचें नाकारलें.

आणि मग अशा स्थितींत या घोषणांना किंमत काय? जागतिक राजकारणाच्या घोषणा आणि पुण्याच्या म्युनिसिपल राजकारणाच्या घोषणा यांत फरक काय? केवळ पैसा, सत्ता आणि कुटिलता यांत हीं माणसें त्या जगाचें राजकारण करणाऱ्या माणसांच्या मानानें खुजीं आहेत? सगळे सारखेच कर्तबगार असले तरी सगळ्यांना सारखी संधि मिळत नाहीं म्हणून त्यांचे महत्त्व कमी अधिक ठरतें?

मला वाटतें कीं, कर्तबगारी आणि कुटिलता या बाबतींत मोठीं माणसें आणि आम्ही प्रत्यक्ष पाहातों हीं छोटीं माणसें यांत फरक असेलहि. कारण जगांत उगीच सुखासुखी कोणी मोठा ठरत नाहीं. जें व्यक्तींच्या बाबतींत तेंच राष्ट्रांच्या बाबतींत. आज जगांत आघाडीवर जीं राष्ट्रें आहेत त्यांच्याकडे नजर टाकली तर त्या राष्ट्रांतील सर्वसामान्य माणसाची कर्तबगारी देखील आपल्याला केवढी तरी श्रेष्ठ आहे, असें दिसेल. पण या छोट्या आणि मोठ्या

लोकांत फरक नाहीं तर अगदीं पुष्कळ साम्य आहे अशी एक बाब आहे आणि ती म्हणजे ज्यांत स्वतःचें अंतःकरण नाहीं अशा खोट्या घोषणा लांब जिभा काढून उच्च स्वरानें उद्घोषिण्याची सवय. पोलंडच्या प्रश्नाला मानबिंदू करून इंग्लंड-फ्रान्सनें ज्या वेळीं जर्मनीबरोबर युद्ध पुकारलें त्या वेळीं अश्वमेध यज्ञाची घोषणा झाल्यानंतर पृथ्वीच्या पाठीवर मोकळा सोडलेला त्या अश्वराजाचा अभिमान पोलंडच्या अंगीं संचारला असेल. कारण त्या वेळीं पोलंड हें न्यायाचें प्रतीक होतें, आणि त्याच्या पाठीशीं इंग्लंड, फ्रान्स-सारखीं पहिल्या दर्जाचीं राष्ट्रें खड्ग परजीत उभीं होतीं. पण याल्टाच्या यज्ञभूमीवर खुद्द त्या अश्वाची आहुति देण्याची वेळ आल्याचें त्या अश्वाला कळल्यानंतर त्याची काय मनःस्थिति झाली असेल ?

आणि जी स्थिति पोलंडच्या प्रश्नाची आणि त्या बाबतच्या घोषणेची तीच स्थिति थोड्याफार फरकानें आमच्या भोंवतालच्या प्रश्नांची आणि त्याबाबतच्या घोषणांची. म्हणूनच मीं आरंभीं म्हटलें कीं, गेल्या सहा वर्षांत प्रत्यक्ष प्रवास न करतां किंवा साक्षात् जग न बघतां घरच्या घरीं बसून सगळं जग पाहिल्याचं मला सांगतां येतं. गेल्या सहा वर्षांत अनेक विलक्षण घटना डोळ्यासमोर घडलेल्या दिसल्या आणि त्याहूनहि विलक्षण अशा अनेक घडामोडी जगांत अनेक ठिकाणीं झाल्याचें ऐकिवांत आलें. बंड किंवा उठावणी हा प्रकार प्रत्यक्षांत पाह्यला मिळाला. त्यामुळें जगांत इतरत्र होणाऱ्या तसल्या प्रकारांची कल्पना करतां येऊं लागली. दुर्गादेवीच्या दुष्का-ळाचें नांव ऐकून खेद होतो. पण विजापूरचा दुष्काळ आणि बंगालचा दुष्काळ या गोष्टी डोळ्यासमोर घडल्या आणि त्यामुळें या दैवी ( वा मानवी आपत्तींची भेसुरता कळून आली. युद्धकार्यानें धुंद झालेल्या वातावरणांत सैनिकी अत्याचार म्हणजे काय असतात तो प्रकारहि नवीन कळावयाचा असा उरला नाहीं. पण इतक्या सगळ्या गोष्टी घडल्या आणि कालांतरानें त्या जुन्यापुराण्याहि होतील तरी देखील ज्यांना आम्ही आमचे प्रश्न म्हणून म्हणत होतों ते बहुधा आहेत तसेच आहेत. आणि जी गोष्ट आपल्या जीवनां-तल्या लहान प्रश्नांची तीच जगाच्या चावडीवरील मोठ्या प्रश्नांची.

ज्या वेळीं पोलंडचा प्रश्न जगाच्या वेशीवर टांगला गेला त्या वेळीं पुण्याचा राजरस्ता जो लक्ष्मीरोड तो रुंद करावयाचा प्रश्न लोंबकळत पड-

लेल्याच होता आणि पोलंडच्या प्रश्नामुळें उत्पन्न झालेल्या डाबराच्या टंचाई-मुळें लक्ष्मीरोडचा प्रश्न जरी तसाच राहिला तरी आपल्या आसपासचे बारके प्रश्न तरी निदान ताबडतोब सुटतील, अशी मला आशा वाटत होती. माझ्या घरापासून कांहीं अंतरावर जिथें चार रस्ते मिळतात त्या ठिकाणीं एका घराचा कोंपरा अशा तऱ्हेनें पुढें आलेला आहे कीं, त्या घराच्या दोन बाजूंनें येणाऱ्या वाहनांना समोरासमोर येईपर्यंत एकमेकाचें अस्तित्व जरासुद्धां कळूं नये. तो कोपरा काढून टाकावयाचा म्हटला तर घरमालकाचेंहि नुकसान नाहीं, त्याचा मोबदला देणें म्युनिसिपालिटीलाहि जड नाहीं. त्या घराचा मालक चांगला जबाबदार आणि थोर नागरीक आहे. त्याला पटणारें एखादें राष्ट्रकार्य निघालें तर मदत करायला तो प्रथम पुढे येईल. 'बन्नू'ला एखादी हिंदु मुलगी टोळीवाल्यांनीं पळवली आहे आणि या गोष्टीला प्रतिबंध करण्या-करता एखादा आश्रम तेथे स्थापन करायचा आहे अशी कल्पना कोणी काढली तर सदर घराचे मालक त्याची कोनशिला बसवतील. पण ज्या एका लहानशा कोंपऱ्यामुळे अपघात होण्याचा संभव आहे तो कोंपरा मात्र सहा वर्षांपूर्वीहि जसा होता तसाच आजहि कायम आहे. हा प्रश्न माझ्या घरा-पासून जरा लांबचा म्हणून सोडून दिला आणि त्याहून अलीकडे माझ्या घराच्या दिशेनें येऊं लागलों तरीहि सहा वर्षांपूर्वीचे प्रश्न आजहि कायम असलेले किंबहुना अधिक बिकट झालेले दृष्टीस पडतात. जागोजागीं ड्रेनेज फुटून पाणी वाहण्याचा क्रम तसाच चालू आहे आणि राजरस्त्यावरील ही नदी पाय ओले न होतां ओलांडून जाण्याचें कौशल्य आम्ही सर्व तसेंच प्रगट करीत आहोंत.

नागरिक-जीवनांतील हे प्रश्न सोडले आणि साहित्याकडे वळलें तरी तेंच दृष्टीस पडतें. अश्लिलतेच्या वादाची वाफ गेली असली तरी तो प्रश्न पुनः पुन्हा अशा रीतीनें डोकें वर काढतो कीं, इतकें वर्षांनंतरहि तो प्रश्न समा-धानकारक रीतीनें मिटलेला तर नाहींच, पण त्यातील मतभेदहि अजून स्पष्ट झालेले नाहींत, याची खात्री पटते. वैयक्तिक टीका व ग्राम्यविनोद यांचा विटाळ वाङ्मयाला सहसा न व्हावा असं सर्वांनाच वाटतं. तरी देखील त्या बाबतींत पाळावयाच्या शुचितेच्या मर्यादा ज्यांनीं अट्टाहासपूर्वक आखून दिल्या त्यांनींच त्या पाहता पाहतां पुसूनहि टाकल्या. सामाजिक प्रश्न

वाङ्मयद्वारा सोडविणाऱ्यांनीं 'विधवांनीं कुंकू कां लावूं नये' असे गंभीर प्रश्न उपस्थित करून त्यांच्यावरील चर्चा संपेपर्यंतच 'सधवानीं कुंकू कां पुसूं नये' असें त्याहून गंभीर प्रश्न उपस्थित करून, पहिल्या प्रश्नाचा निकाल लावून टाकला. मोरीच्या पाण्यावर अळू वाढावें त्याप्रमाणें पुष्कळशा वर्तमानपत्रांचें जिणें काळ्याबाजारात चौफेर फुगलेल्या धनिकांच्या मेहेरबानीवर अवलंबून आहे, हें माहीत असूनहि केवळ मोठेपणा मिरवण्याकरतां इतराना उपदेशाचे पाठ देण्याचें कार्य वर्तमानपत्रें करीत आहेत. राजकारणाच्या प्रश्नाची जास्त चिकित्सा न करतां एवढेंच म्हणतां येईल कीं, सहा वर्षांपूर्वी जे प्रश्न होते ते आज अधिकच बिकट झाले आहेत. फक्त घोषणांचे आवाज आज अधिकाधिक मोठे होत आहेत.

माझ्या एकट्यापुरतं पाहिलें तर स्वाभाविकपणें व्हावे एवढेच बदल झालेले आहेत. प्रत्येक मध्यम स्थितीच्या माणसाच्या आयुष्यात या अवधींत जे सुख-दुःखाचे क्षण येऊन जावेत तेच माझ्याहि आयुष्यात येऊन गेले आहेत. पण या सर्व घडामोडींची पार्श्वभूमि मात्र वरील प्रकारच्या विपण्ण विचाराची आहे. मनांत राहून राहून येतं कीं, जगांत पिढ्यान् पिढ्या हेंच चालू असेल का ? आपण जे नवे प्रश्न उत्साहानें सोडवावयास घेतले आणि ते आज सहा वर्षांत न सुटता राहिलेले दिसले तसेंच आपल्या आधीच्या सहा हजार वर्षांत झाले असेल का ? कीं खरोखरीच मनुष्य हळूहळू सुधारत आहे ? पण पुनः पुन्हा असें वाटतें कीं, मनुष्याची खरी प्रगति जर झाली असेल तर ती अगदीं थोडी आहे आणि ती देखील प्रचंड ध्येयवादी आणि कर्तबगार अशा थोड्या व्यक्तींच्या परिश्रमानेंच होय. बहुजनसमाजात आपली प्रगति व्हावी, आपल्यासकट सर्वांचें भलें व्हावें अशी स्पष्ट जाणीव नाहीं. अगदीं थोडे थोर लोक एखादी घोषणा करतात त्याचा फायदा दुय्यम दर्जाचे कुटिल लोक घेतात आणि त्या घोषणांच्या आधारावर समाजास झुलवीत राहातात. प्रे. रूझवेल्टसारखा थोर मनुष्य एकाएकीं या जगांतून उचलला जातो. तेव्हां मनांत येतें कीं, ईश्वराचा असा तर हेतु नसेल ना कीं जगाचं जर कांहीं खरोखर भलं व्हायचं असेल तर तें जगांतील सर्व मानवांनीं स्वतः खपून साधलें पाहिजे. रूझवेल्ट कितीहि मोठा असला तरी त्याच्या ओंजळींनीं पाणी पिऊन जगानें आपली तहान भागवणें ईश्वराला मान्य नाहीं !

जगांत मोठीं माणसं जन्माला येणं ही कांहीं अगदीं नवलाची गोष्ट नाहीं. भारताच्या पुराणांत आणि इतिहासांत तर असे थोर पुरुष किती तरी सांपडतील, पण त्यांपैकीं एकाला अगर सगळयांना मिळूनहि हें जग सुधारणें शक्य नाहीं. हीं मोठीं माणसं आपल्या आयुष्यांत ज्या मार्गानें जातात त्या मार्गानें खरोखरीच जाण्याचा सगळीं माणसें जेव्हां प्रयत्न करतील आणि दर क्षणीं ऐकूं येणाऱ्या घोषणा ज्या वेळीं आपल्या बुद्धीनें पारखून पत्करायला शिकतील त्या वेळीं अशा घोषणांचें पीक कमी होईल आणि मगच मनुष्य खरा शहाणा होऊन सुखी होईल.

—वाङ्मयशोभा, मे १९४५.

---

मनोगत ३

# कोजागिरीची रात्र

१७

आज कोजागिरीची रात्र. आजच्या चादण्या रात्रीची मौज कांहीं औरच. तसं पाहिलं तर दर महिन्याला पौर्णिमा येतेच आणि चांदणंहि पडतंच. पण कोजागिरीच्या टिपूर चादण्याची बरसात कांहीं न्यारीच. पावसाळा संपलेला असतो आणि थंडीची सुरुवात व्हायची असते. दसऱ्याच्या दिवशीं शिलंगणाहून परत याव तोंच आकाशात बऱ्याच वरती दिसणारा आणि अर्ध्याहून अधिक उजळलेला चद्रमा चारपांच दिवसांनीं येणाऱ्या कोजागिरीची आठवण करून देतो आणि त्या दिवशीं चांदण्यांत काय कार्यक्रम करायचे याचीं आपण मनोमन चित्रें रंगवूं लागतों.

पण माणसाच्या मनाप्रमाणें सगळ्या गोष्टी घडूं नयेत हा तर अनुभवसिद्ध दैवी न्याय आहे. आज सकाळपासूनच आभाळ काळवंडून गेलं होतं. पाऊस पडायला सुरुवात झाली आणि रात्रीं तर उन्मादकारी चांदण्यांत मनसोक्त हिंडून चंद्रप्रकाशांत न्हाऊन निघण्याऐवजीं जलधारांत न्हाऊन निघण्याची पाळी आली. रात्रीं दहा नंतर पाऊस थाबला आणि मी घराबाहेर पडलों. अभ्रें विरळ झालीं असलीं तरी त्यांचें अस्तित्व होतेंच, पण बाहेरचें वातावरण मात्र शांत होतें. घरांत बसून पत्ते खेळून अगर गाणें ऐकून कोजागरी गाजविणारे सोडले तर रस्त्यावर मात्र अगदीं रहदारी नसल्यानें एक प्रकारची भयाण शांतता होती. त्यांतच ढगांआडून डोकावणाऱ्या चांदण्यांमुळें एक तऱ्हेचा उदासपणाहि वातावरणांत आला होता.

आणि हळुहळू त्या उदासपणानं माझं मनहि कांहींसं विषण्ण झालं. मनुष्य निसर्गाचा एक सूक्ष्म घटक आहे म्हणूनच कीं काय, निसर्गातील विमनस्कता आणि उन्मनस्कता मानवी मनावरहि प्रभाव गाजवितात. निदान माझ्या बाबतींत तरी असं नेहेमीं घडतं. आताच पाहा ना, मला मानवाच्या क्षुद्र-पणाची जाणीव राहून राहून होऊं लागली. आजच पाहा ना, दुर्दिन नसता तर आकाशात चादणं फुलतांच हा सारा रस्ता माणसांनीं फुलून गेला असता. ठिकठिकाणीं मुलांचे आणि तरुणाचे खेळ व इतर कार्यक्रम यांची दंगल ऐकूं आली असती. आकाशांतल्या रांजणातलं दूध पिऊन कोजागिरी साजरी करणाऱ्या अदृश्य देवांदिकाबरोबर पृथ्वीवर मानवानींहि आटीव दूध पिऊन कोजागिरी जागविली असती. पण निसर्गानं आकाश आणि पृथ्वी यांच्या दरम्यान ढगाचा काळा पडदा धरून सगळा विरस करून टाकला होता.

आणि असाच विरस जीवनकलहांत आपणाला अनेकदा अनुभवावा लागतो. आपल्या हातांत नसलेलीं अशी अनेक लहानमोठीं कारणं अगर उपाधि अचानक निर्माण होऊन मानवी मनोरथाच्या पूर्तीला विघ्न आणतात. किंबहुना म्हणूनच मला वाटतं जीवनकलह हा शब्द प्रचलित झाला असावा. सगळ्याच गोष्टी सुरळीत आणि मनासारख्या घडल्यानंतर जीवनार्थ कलह निर्माण व्हायचं कारणच उरत नाहीं.

आणि माझ्या विचाराचे प्रात्यक्षिक दाखविण्याकरतां म्हणूनच कीं काय, हातात पलिते घेतलेलीं आणि तोंडाने आगामी निवडणुकीच्या निमित्तानें अनेक बऱ्यावाईट घोषणा करणारी बारा ते पंधरा वर्षे वयाच्या मुलाची ही मिरवणूक होती. त्याचा म्होरक्या सुमारें सतरा-अठरा वर्षांचा असेल. त्याच्या हातात सायकल, सायकलला बाधलेला ध्वज, व दुसऱ्या हातात पलिता होता. तो घोषणा देत होता, आणि मुलें तारस्वरांत ओरडत होतीं. त्यांत पुढाऱ्यांचे जयजयकार होते, सुभाषचंद्राचा जयजयकार होता, पत्रीसरकारचा जयजयकार होता, इतर पक्षीयांना 'मुर्दाबाद'चा आहेर होता. झिंदाबाद आणि मुर्दाबाद हे शब्द तर इतके उलटसुलट उच्चारले जात होते कीं, ते ओरडणाऱ्या मुलाना त्याचे अर्थहि नीट कळत नसले पाहिजेत असें स्पष्ट दिसत होतें आणि त्या अल्पवयी व निरक्षर मुलांना तें न कळावें हें

साहजिकच नाहीं काय ? त्या मुलांचा उत्साह आणि आपण देशाकरितां कांहींतरी करीत आहोंत ही त्याची भावना याखेरीज त्यांत स्पृहणीय असें कांहीच नव्हतें. आणि ती भावना तरी किती उथळ होती ! विस्तवानें पाणी तापतें आणि आगहि लावतां येते. दगडानीं ताजमहालहि बांधतां येतो आणि डोकींहि ठेंचतां येतात. या सद्गुणाची दारू एकदम शिलगावून दिली तर क्षणभर दिवाळीही साजरी होईल खरी; पण पुढें जन्मभर या पोरांचें आयुष्य जळून गेलेल्या दारूच्या कुंडीप्रमाणें भकास होणार नाहीं काय ?

युद्ध संपलेलें आहे त्यामुळें संत्रस्त मनावरील कांहींसा ताण कमी व्हावा हें योग्य आहे. गेल्या तीन वर्षांतील जुलूमजबरदस्तीची राजवट पूर्णपणें संपलेली नसली तरी आगामी निवडणुकीच्या निमित्तानें बरींचशीं बंधनें शिथिल होऊन जनतेंत कांहीं तरी चैतन्य खेळूं लागावें हेंहि सहजच आहे. तरी पण आमच्या वृत्ती बेलगाम व्हाव्या आणि स्वतःचा प्रश्न आला म्हणजे स्वार्थी डावपेंच लढविणाऱ्या पुढाऱ्यानीं सामान्य जनतेच्या उत्साहाचा आणि भोळया भावनांचा फायदा घेऊन त्यांस क्षणभरच्या आतषबाजीस प्रवृत्त करून पुढें दीर्घकाळपर्यंत निष्क्रिय आणि निरुपयोगी करून ठेवावें ही गोष्ट मात्र अत्यंत उद्वेगजनक आहे.

गेल्या सहा वर्षांत आपण किती गोष्टी गमावल्या आहेत याचा जर आमचे पुढारी मनोमन विचार करतील तर राष्ट्राचा आणखी शक्तिपात होऊं न देतां कांहीं तरी विधायक कार्य सर्वांमिळून घडावें असें त्यांनाहि वाटूं लागेल. सत्तात्यागाच्या चुकीनें सुरुवात करून, कांहीं स्वतःच्या कर्मानें आणि कांहीं दुर्दैवाच्या कलाटणीनें आम्ही घसरतच गेलो आहोंत. आमच्या चळवळी फसल्या आहेत; चुकीच्या मार्गानें गेलेले नेते शूर असूनहि दुर्दैवी ठरलेले आहेत. कोंडींत सांपडलेलें मांजरहि पलट खाऊन कोंडणाराचा गळा धरतें असें म्हणतात. तसेंच अन्न तोडलं तर सामान्य निरुपद्रवी जनता बंडखोर बनते असा कोणी सिद्धान्त सांगतात. पण परकीय अंमलानें पछाडलेल्या, आणि जातीय मंत्रिमंडळानें देशोधडीला लागून अन्नान्नदशा झालेल्या भुक्या बंगालनें हेहि सिद्धांत खोटे ठरविले आहेत. मुस्लीम जनतासंपर्काचा योग्य मार्ग केवळ खोट्या भीतीनें सोडून पुढाऱ्यांचा अनुनय करण्याचा मार्ग पत्करून त्यापायीं स्वतः शुद्ध राष्ट्रीयत्वाचा त्याग करण्याइतके आम्ही अराष्ट्रीय बनलों आणि

इतकेंहि करून निवडणुकीच्या वेळीं आज आमचें मुसलमान समाजावर मुळींच वजन नसल्यानें आम्हाला 'राष्ट्रीय मुसलमान' ही वेगळी जात निर्माण करावी लागत आहे.

या सर्व गोष्टींचा आम्हीं विचार केला पाहिजे. आतां ही जशी खर्चाची बाजू झाली, तशी जमेचीहि एक बाजू आहे. गांधीजींनीं राष्ट्रांत सर्वव्यापी जागृति केली, ही गोष्ट मान्य करूनहि त्याचा अतिव्यापी ध्येयवाद राष्ट्रहिताच्या दृष्टीनें निरुपयोगी ठरला आणि मानव्याच्या अंतिम कल्याणाच्या दृष्टीनें योग्य वाटणारें तत्त्वज्ञान राष्ट्रहितास प्रसंगीं मारकच ठरलें आहे, ही गोष्ट सुज्ञानीं मनोमन मान्य केलीच आहे. याचें प्रत्यक्ष उदाहरण म्हणजे पटेल-नेहरू प्रभृतींनीं 'यापुढें लीगचा अनुनय बंद—' असें म्हणण्यास सुरुवात केली आहे. दुसरें उदाहरण म्हणजे मुनशींच्या अध्यक्षतेखालीं उदयपुरास भरलेल्या हिंदी साहित्यसंमेलनांत हिंदी भाषा आणि नागरी लिपि याबद्दलचा शास्त्रीय व शुद्धराष्ट्रीय दृष्टिकोन मान्य करण्यांत आला, हें होय. आणखी एक महत्त्वाची आणि तितकीच आनंदाची गोष्ट आहे. सुभाष सैन्यापैकीं ज्या तिघांवर प्रथम खटला होणार आहे त्या तिघांपैकीं एक हिंदु, एक शीख व एक मुसलमान आहे. आणि या प्रश्नाबाबत कॉंग्रेस, हिंदुसभा आणि मुस्लीम लीग या सर्वांचें संपूर्ण एकमत आहे.

जमेच्या या बाजूचा विचार केला तर आमचें भवितव्यहि अगदींच काळवंडलेलें नाहीं, असें दिसून येईल. फक्त गरज आहे ती थोडासा संयम आणि पुष्कळसें शहाणपण यांचीच आहे. जें स्वातंत्र्य मिळवावयाचें तें मूलभूत मानवी हक्काच्या पायावर आधारलेलें असलें पाहिजे. तें केवळ एखाद्या वर्गाकरितां, एखाद्या जातीकरिता नसून सर्वांना सामावणारें असलें पाहिजे आणि म्हणूनच पुढाऱ्यांची वृत्ति अशा वर्गांचे आणि जातींचें हितसंबंध खऱ्या अर्थानें एकमेकांस मारक नाहींत हें त्यांस पटवून त्यांच्यांत सलोखा निर्माण करण्याची असली पाहिजे.

परवां जें युद्ध संपलें त्यांतील घोषणा आरंभापासूनच खोट्या होत्या हें सुज्ञानीं ओळखलें होतें. एखादा रूझवेल्ट सत्प्रवृत्ति असेलहि, पण अकबराबरोबरच जसे त्याच्या दिनेइलाहीचें दफन झालें तसेंच रूझवेल्टची चार स्वातंत्र्यें त्याच्या भोंवतालच्या माणसांनीं त्याच्याबरोबरच गाडून टाकलीं

आहेत. पण यांत दोष अकबराचाहि नाहीं अगर रूझवेल्टचाहि नाहीं. एकाच माणसांतील असत्प्रवृत्ति त्याच्या सत्प्रवृत्ति दाबून टाकतात हें जर खरें तर समाजांतहि तसेंच घडलें तर नवल नाहीं. याला उपाय एकच. बहुजनसमाजानें आपल्या सत्प्रवृत्ति जागविल्या पाहिजेत. आपल्यांतील थोर माणसें दिवंगत झालीं म्हणजे तीं ताऱ्यांच्या रूपानें प्रकाश देतात असें मानण्याची कल्पना आहे. जगांतील थोर लोकांनीं सत्प्रवृत्ति जगविण्याकरितां आणि वाढीस लावण्याकरितां झगडे केले व कष्ट सोसले. त्यांच्या जीवनांतील प्रकाश घेऊन बहुजन-समाजांतील लहान लहान माणसें जर जागृत होतील तरच भविष्यकाळ उजळतां येईल.

आमच्या आजच्या पुढाऱ्यांनींहि प्रामाणिकपणानें मदत केली पाहिजे. अन्याय, आक्रमण आणि जुलुमजबरदस्ती हीं जर वाईट असतील तर त्यांचा आश्रय करणारा कोणीहि असला तरी तो वाईटच ठरला पाहिजे. नंदुरबारचीं केतकर किंवा मेहता हीं अल्पवयी मुलें 'बेचाळीस सालीं' छातीठोकपणें गोळीबारास तोंड देऊन हुतात्मा ठरलीं तर जबरदस्तीनें मी गांधींचाहि जयजयकार करणार नाहीं असें म्हणून हाडें मोडेपर्यंत स्वकीयांकडून मार खाणारा चिमण अष्टेकरहि हुतात्माच आहे याची जाणीव सर्वांनीं बाळगिली पाहिजे. दिल्ली, लाहोरच्या तुरुंगांतील राजबंद्यांचे छळ जर माणुसकीला काळिमा आणणार असतील तर विपक्षीय तेवढे गुन्हेगार मानून त्यांच्या याद्या तयार करण्याच्या भापा बंद केल्या पाहिजेत. कारण ह्या भापाहि माणुसकीला काळिमा आणणाऱ्या आहेत.

आम्हास स्वातंत्र्यलालसा असावी हें स्वाभाविक आहे आणि स्वातंत्र्याच्या प्राप्तीकरितां आम्ही सिद्धहस्त होत आहों ही तर अत्यंत अभिमानाची गोष्ट आहे. पण जें स्वातंत्र्य आम्हांस पाहिजे तें आमच्या इतर बांधवांना देण्यास आम्हीं तयार असलें पाहिजे. कारण स्वातंत्र्याचा खरा गाभा म्हणजे प्रत्येक व्यक्तीचें स्वातंत्र्य-व्यक्तिविकासाला भरपूर वाव. आपल्या इतकेंच दुसऱ्यालाहि विचारस्वातंत्र्य, मतस्वातंत्र्य, आचारस्वातंत्र्य आहे याची जाणीव जर प्रत्येकानें ठेवली तरच या स्वातंत्र्ययज्ञाची खरी सांगता होईल. जर्मनाचा ज्यूंवरील जुलूम, अमेरिकनांचा निग्रोवरील जुलूम, गोऱ्यांचा काळयांवरील जुलूम हे जितके गर्हणीय आणि निंद्य तितकाच आमच्या देशांतील एका

जमातीनें दुसऱ्या जमातीवर केलेला जुलूम अथवा एका पक्षानें विपक्षीयांवर केलेली जबरदस्ती त्याज्य आणि तिरस्करणीय आहे. आम्हांस जर खऱ्या लोकस्वातंत्र्याचे योद्धे, भोक्ते आणि त्राते व्हावयाचे असेल तर आमच्याच बांधवावर अन्याय्य आक्रमण करण्यापासून आम्ही प्रथम परावृत्त झालें पाहिजे. तरच आमच्या संघटनांना बळ चढेल आणि जगाच्या बाजारांत आमची पत वाढेल.

—वाङ्मयशोभा, नोव्हेंबर १९४५.

मनोगत ४

# युद्धकाळांत आम्ही कसें जगलों !!! १८

युद्ध संपलें असलें तरी युद्धानें निर्माण केलेली परिस्थिति निवळलेली नाहीं. अमावास्येच्या रात्रीं लागलेली भयंकर आग, प्रतिपदा उजाडण्यापूर्वीच विझली आणि आग विझली म्हणून आपण निःश्वास सोडला तरी तें स्वास्थ्य क्षण–भंगुरच ठरतें. कारण त्या अंधाऱ्या भयाण रात्रीं धगधगणारा अंगार भेसूर दिसतो, तर पूर्ण विझलेल्या जळक्या सामानाचे ढीग विद्रूप दिसतात; आणि मग रात्रीच्या प्रचंड अग्निप्रक्षोभामुळें झालेल्या वाताहतीची कल्पना सकाळीं सूर्योदयानंतरच येणार आहे, हें मनांत आलें म्हणजे तर त्या कल्पनेनेंच छाती दडपून जाते.

गेल्या युद्धाचेंहि असेंच झालें आहे जर्मनीचा विनाश आणि ॲटमनें जपानची केलेली धूळ–धाण या दोन घटनामुळें युद्ध प्रत्यक्ष संपलें असलें तरी जीवन-कलहाची वाढलेली तीव्रता त्यामुळें मुळींच कमी झालेली नाहीं, तर अनेक बाबतींत उलट बेसुमार वाढलेली आहे. त्या गोष्टींची पूर्वी केवळ गुरगुर ऐकूं येत होती. त्यांचा एकदम स्फोट होऊन समाज–जीवन–सागरांत जणूं काय, भूकंपानें निर्माण व्हावींत अशीं अनेक नव्या प्रश्नांची बेटें वर येत आहेत आणि तीं इतकीं वाढत आहेत कीं, त्यावर जाऊन त्याचें सत्य स्वरूप समजून घेणेंहि आज शक्य नाहीं. युद्ध संपेपर्यंत सैनिकांचा प्रश्न आजच्या सारखा निकराला आला नव्हता. सैन्यांत जाणें हराम आहे असें कुणी म्हणत म्हणत आपण मिलिटरी अकौंटस अगर डेपोत नोकरी करून–आपल्या बायका, बहिणी, मुली यांनाहि युद्धकार्याला जुंपून स्वतःची आर्थिक परिस्थिति सुधारूं पाहात होते. पुरोगामी नियत कालिकांना, स्त्रिया सरसकट नोकऱ्या करूं लागल्या हें पाहून आपला 'प्रचार'

कशामुळें कां होईना कारणीं लागला असें वाटून फॅसिझमूच्या नांवानें पांच-जन्य करीत युद्धसहकार्याच्या बोळलेल्या गंगेंत ते इष्टमित्र, आप्तस्वकीयांसह अवगाहन करीत होते. पण युद्ध संपतांच सैनिकांचा प्रश्न 'आझाद सैनिकां' च्या आणि 'बंडखोर' नाविकांच्या रूपानें निकराला आला, आणि पोटार्थी कारकुनापेक्षां पोटार्थी सैनिक बरा तर एकंदरींत, असें लोकमत होऊं लागले.

युद्ध संपल्यानंतर फॅसिझम्‌विरोधाचा कार्यक्रम संपला. तेव्हां पुरो-गामी नियतकालिकें आणि साहित्यिक यांना नवीन जळता प्रश्न काय, असा नवा प्रश्न पडला होता. तेवढ्यात करुणरसाला भरपूर अवकाश देणारा सैनिकांच्या पाशवी वासनेला बळी पडलेल्या **'वॅकाय्'** बायांचा प्रश्न उप-स्थित झाला. या प्रश्नानें वाङ्मयाची फारच चांगली सोय झाली, यांत वाद नाहीं. कारण या वादांत **'धर्म-अर्थ–काम'** या विवाहसंस्थेच्या म्हणजेच पर्यायानें समाजाच्या आधारभूत मानल्या गेलेल्या तीन गोष्टींचे वाभाडे काढा-वयास मिळतील आणि जुन्या-नव्या पाश्चात्य लेखकांच्या आधारानें मराठींत किती तरी **'ओरिजिनल'** अशा जागतिक वाङ्मयाची भर घालतां येईल. आतांपर्यंत जागतिक राजकारणाखेरीज 'जागतिक आवळेल' आणि 'जागतिक मसाला' या दोनच गोष्टी, जाहिरातींवरून जगाची माहिती घेणा-रांना उपलब्ध होत्या, त्यांत आतां या 'ओरिजिनलअने' जागतिक वाङ्मयाची भर पडणार.

घरातल्या घरांत राहणाऱ्या स्त्रीला फार तर कटुंबाचे काबाड कष्ट आणि नवऱ्याची सेवा या गोष्टी कराव्या लागत असतील; पण त्या मोबदल्यांत तिच्या ( Legitimate ) वासनांचें शमन आणि कोमल भावनांचें विकसन होण्याला कमी-जास्त प्रमाणांत अवसर मिळे. युद्धकालांत नोकरी करणारी स्त्री घरात कमावती या दृष्टीनें महत्त्व पावली तरी 'घरचा देशपांड्या' असला तरी तो * 'गांवचा पांड्या'च हा पुरुषाबाबतचा नियम मग तिलाहि लागू झाला. घरीं खरी ताबेदारी एकाची असेल तर ती बाहेर अनेकांची आणि बदलती ताबेदारी आली. आजचा मेजर अगर क्वार्टर–मास्तर अगर एखादा दुसरा वरिष्ठ, उद्यां त्या जागीं असेलच असें नाहीं. शिवाय नवऱ्याला

* गावचा पांड्या पण घरचा देशपाड्या.

घरांत बायको ताबेदार असली तरी ती एकच नोकर असल्यानें आणि आपलें घर नीट चालावें अशी त्याचीहि भावना असल्यानें गृहव्यवस्थेकरितां तरी तो सन्माननीय समेटास बहुधा तयार असतो. पण येथें स्पर्धा ( Competitian ) दांडगी. आणि त्यातून सगळाच टेंपरवारी खाक्या. आणि प्रत्येक गोष्टीवर 'आतां अगर केव्हांच नाहीं' (Now or Never) या युद्धकालीन मनोवृत्तीची छाया. मग काय विचारतां !

युद्धप्रयत्नाबद्दल आपलेपणा नाहींच नाहीं व तो शक्यहि नाहीं, मिशनऱ्यांची सेवावृत्ति बाणलेली नाहीं, कमीअधिक छचोरपणाच्या मोबदल्यांत कामचुकारपणा करावयाची भरपूर सवलत, आणि अखेरची जबाबदारी कोणावरच नाहीं. नाहीं व्यक्तीवर, नाहीं सरकारवर ? व्यक्तीचं बरंवाईट झालं तर सरकारला खंत नाहीं, सरकारचं वाटोळें झालं तरी व्यक्ती तेवढ्याच उदास. त्याशिवाय काय अशी बजबजपुरी माजते ? आणि अंदाधुंदी कारभार वर्षानुवर्षे चालू राहतो ? व्यापाऱ्यांनीं काळा-बाजार करून पैसे मिळविले, नोटाचा कायदा काढून सरकारनें त्यापैकीं कैक कोटी परत मिळविलें. ती एक मोठी गम्मत झाली खरी ! आग लागल्याची आवई उठावी, पण पेठेंतील कांहीं घरं पेटलेली दिसून बाकीच्या घरांतील लोक शांतपणानें झोंपलेले दिसावे तसें त्या वेळीं वाटलें. नोटांचा हुकूम निघाला मात्र आणि काळा—बाजारवाले नोटा सांठविणारे पार गडबडले. कोणी नोटा जाळल्या; कोणी वेडे झाले; कोणी उरी फुटून मेले; कोणी त्यातहि पैसे केले. पण 'साखर व रॉकेल' कसें पुरेल याचीं रोज नव्यानें चिंता करणाऱ्या समाजाला मात्र कोठेंच धक्का बसला नाहीं. सांठेबाजांची धांवपळ पाहून गंमत मात्र वाटली.

कायदे आणि कायद्यांतील पळवाटा ( Laws aud Loopholes ) हीं बहुधा एकदम जन्माला येतात, ही गोष्ट युद्ध--काळात तर उत्तम तऱ्हेनें प्रत्ययास आलेली आहे. वटहुकुमांच्या विणींतच काळ्या—बाजारांतले ढेकूण निवास करीत होते आणि त्यांनींच समाजाचें रक्तशोषण केलें. जबाबदार लोकप्रतिनिधींनीं स्वखुषीनें सत्ता—केंद्रें सोडून दिलीं होतीं. आणि आम्ही वनवासांत जाऊन येतों तोंवर तुम्हीं घर संभाळा असा जणू काय चोरांना राजरोस आदेश दिला होता. कांबळीं आणि कमावलेलीं कातडीं सैनिकांना

विकावयाला महात्म्याकडून मुभा मिळाल्यावर, त्या पाठोपाठ त्यांनीं माणुसकीहि विकावयाला काढली.

पैसा गोळा करताना पाठोपाठ आपपरभाव सर्वच अर्थानीं नाहींसा झाला होता. पक्षभेद, मतभेद, तत्त्वभेद हेहि कधीं आड आले नाहींत. पांढरी टोपी घालणारा गांधीवादी असो, टोपी न घालणारा आधुनिक असो, भगवी टोपी घालणारा सभावादी असो, लाल गोंड्याची टोपी घालणारा लीगवादी असो किंवा माळ घालणारा भक्तिवादी वारकरी असो सर्वजण पैसा जमा करतांना मतभेदांच्या पातळीच्या वर राहून एकदिलानं आणि एकजुटीनं काम करीत. सहकार्य ही काय चीज आहे हें युद्ध-काळांतच आम्हांस कळलं. तात्त्विक मतभेदासारख्या क्षुल्लक गोष्टी या कामीं कधींच आड आल्या नाहींत. 'अनंत हस्तें कमलावराने, देता किती घेशिल दो करानें' अशी अनेकांची स्थिति झाली. मात्र थोड्याचीं घरें भरणारा हा परमेश्वर आपण ज्याची भक्ति करतों त्याच्यापेक्षा वेगळा असला पाहिजे, असें पीडित जनतेला फार तीव्रतेनें वाटूं लागलें.

सत्तात्याग केल्यानंतरहि काँग्रेसनें वनवास पत्करण्यापूर्वी जनतेला एक प्रकारचा धीर वाटत असे, आणि अन्यायाशीं लढलों तर पाठपुरावा करायला कोणी तरी आहे असा विश्वास वाटे. शत्रुपक्षहि थोडा दबून असे. पण एकदा उघडपणें वैर पत्करल्यानंतर पहिल्या फेरींतच जेव्हां बऱ्याचशा कार्यकर्त्यांचा निकाल लागला—आणि विषम शक्तींच्या लढाईत हें साहजिकच होतें—तेव्हा तर काय प्रतिगामी प्रवृत्तींना रान मोकाट सांपडलें. दडपशाहीचा वरवंटा अतिवेगानें फिरत होता, आणि अन्यायाची दाद लागणें जवळजवळ अशक्यच होतें. कोणी नेता नाहीं; कोणी त्राता नाहीं अशा परिस्थितींत लोकहि उदासीन बनले. पुण्यासारख्या शहरांत, राजरस्त्यावर सायकलवर मिलिटरी मोटार आदळली तर लोक सायकलवाल्याला म्हणत, 'अरे, तूं मेला नाहींस हेंच सुदैव तुझें. आतां शहाणा असलास तर ईश्वराचे आणि जिवें न मारल्याबद्दल त्या ड्रायव्हरचे आभार मान आणि गप्प बैस.' बरें, या गाड्या हांकणारे सगळेच कांहीं सोजीर नसत. आणि जिथें स्वकीयच वैरी झाले, तिथें परक्यांना कोणत्या तोंडानें नांवें ठेवावींत !

आज काळ बदलला आहे. 'ऑगस्टवाद्याचा' जयजयकार सर्वत्र चालू आहे. त्यांचा त्याग, त्यांनीं केलेली सेवा आणि निर्मिलेली जागृति हीं तिन्ही थोर आहेत यात शंका नाहीं. पण त्याच वेळी मागची नीट आठवण ठेवणें हेंहि जरूर आहे. शंभर किंवा दोनशें विद्यार्थ्यांपैकीं चळवळींत भाग घेणारा एखादाच निघाला तरी देखील ती कमी समाधानाची गोष्ट नाहीं. पण त्याच्यावर पाळत ठेवणारे चार निघावे हें केवढें दुर्दैव ! महात्माजीचे प्राण आगाखान-राजवाड्यात टांगणीस लागले होते, त्या वेळीं 'युद्धस्य रम्या वार्ता' ऐकण्याची वृत्तीच अनेक लोकात दिसून येत नव्हती काय ? कारकुनी अगर तत्सम इतर व्यवसाय करून राज्याचा गाडा सुरळीत चालू राहण्यास मदत करणाऱ्या प्रत्येकाकडून क्रांतीची अपेक्षा कोणी झालें तरी करीत नाहीं. पण महात्माजींना भारताचे पितामह मानणाऱ्या लाखों लोकानीं अगदीं कमींत कमी स्वरूपाचे आपलें असमाधान दाखविणारें निदर्शन केलें असतें तर राज्यकर्त्यांना देखील विचारच करावा लागला असता आणि निदर्शन म्हणजे काहीं मिरवणुकी किंवा मोर्चेच नव्हेत. गांधीजींच्यावर भक्ति असणाऱ्या लाखों लोकानीं आपली विकल मनःस्थिति पत्ररूपानें सरकारला कळविली असती आणि गांधीजी मरणाच्या दारीं असता स्वस्थ मनानें जेवण-खाण करणें अगर संथपणानें काम करणें आपणास शक्य नाहीं हें त्यानीं कृतीनें दाखविलें असतें तर त्याचाहि परिणाम झाला असता. याकरतां कोणत्याहि कटाची अगर कारस्थानाची आवश्यकता नव्हती. लाखों लोकांना एकाद्या थोर तत्त्वाबद्दल अगर व्यक्तीबद्दल मनापासून आदर असणें हा समाजाच्या सांस्कृतिक प्रगतीचा एक टप्पा आहे, आणि हा आदर या सगळ्या लोकांच्या कृतींत एकदम प्रतीत होणें हा समाजाच्या सांस्कृतिक प्रगतीचा दुसरा आणि महत्त्वाचा टप्पा आहे. जी लोकशाही आपलें उद्दिष्ट आहे, आणि ज्याकरितां आपण झगडत आलो त्या लोकशाहीचा अर्थ जर 'लोकांचें लोकाकरितां राज्य' असाच अगदीं साधासुधा घ्यावयाचा असेल तर राज्य करूं इच्छिणारे जे 'लोक' त्यांनीं स्वतः कर्तृत्वसंपन्न आणि जबाबदार असावयास नको काय ? पण युद्धकाळांत मात्र एकंदरीनें जागृति आणि जबाबदारीची जाणीव अभावानेंच आढळली असेंच म्हटलें पाहिजे.

युद्धकाळातील जीवनाचें कटु चित्र रंगवितांना युद्ध-काळांत घडलेल्या दोन तेजस्वी घटनांची आम्हांस विस्मृति झालेली नाहीं. औरंगजेबाच्या हातावर तुरी देणाऱ्यांच्या वारसदारीवर जर कुणी खरोखर हक्क सांगू शकेल तर अद्‌भुत पराक्रम करणारे सुभाषबाबूच! भारताच्या सीमेबाहेर स्वतंत्र हिंदी राज्याची स्थापना करून भारताच्या स्वातंत्र्यलढ्याच्या इतिहासांत एका नव्या पर्वाला त्यानीं सुरुवात केली. त्याचप्रमाणें बेचाळीस सालीं पुढारी तुरुंगांत गेल्यावर हताशपणें स्वस्थ न बसतां स्वतःच्या सदसद्विवेक बुद्धीला पटेल त्याप्रमाणें लोकसेवा आणि देशसेवा करून स्वातंत्र्य-लढ्याची ज्योत त्यांनीं तेंवत ठेवली त्या ऑगस्टवादी कार्यकर्त्यांचा पराक्रम ही दुसरी महत्त्वाची घटनाहि आमच्या पूर्णपणें स्मरणांत आहे. तरी देखील साकल्यानें विचार केला तर युद्धकाळात आम्ही जें जीवन जगलों, तें फारसें उज्ज्वल तर नव्हतेंच, तर निराशा, भीति, उदासीनता, अस्थिरपणा अश्रद्धा इत्यादींनीं गढूळ झालेलें आणि काळवंडलेलेंच होतें असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं.

पुण्या-मुंबईसारख्या शहरांत विशीच्या आंतल्या मुलांना भराभर नोकऱ्या लागल्या. त्यांपैकीं अनेकांनीं मिळेल ती एक-अर्धी खोली घेऊन, लवकर लग्न करून संसार थाटले. मुलींच्या बापानींहि मुलींचीं रेशन-कार्डें आनंदानें मुलांच्या कुटुंबात बदलून दिलीं. पण याचा अर्थ गेलीं कांहीं वर्षें कठिण होत चाललेला मध्यमवर्गातील मुलामुलींच्या विवाहाचा प्रश्न सुटला असा होत नाहीं. त्याचप्रमाणें पैसा स्वस्त झाल्यानें बाह्यतः चैन-चंगळ वाढलेली दिसली तरी एकंदरींत रहाणीचें मान निकृष्ट होत चालल्याचेंच सूक्ष्म दृष्टीनें पाहणारास आढळून येईल. कांहीं थोड्या लोकांना अगदीं थोड्या अवधींत भरमसाट पैसा मिळाला असला तरी सर्वसामान्य माणसाची ओढगरस्तीची स्थिति सुधारलेली नाहीं तर उलट वाढतच आहे. आणि त्याचा प्रत्यय युद्ध संपून तात्पुरती वाढलेली उत्पन्नाची खातीं कमी होतांच कुटुंबाकुटुंबांतून येऊं लागलाच आहे. क्वचित् कोठें स्वातंत्र्याकरितां मोठा त्याग करण्याची आणि कष्ट सोसण्याची तयारी दिसते, तर दुसरीकडे कुतूहलापेक्षां जास्त उत्साह दिसत नाहीं. राजकीय जागृति वाढत्या प्रमाणांत आहे याबद्दल वाद नाहीं. कॅप्टन लक्ष्मी हिंदी स्त्रियांना यापुढें

कोणत्या तऱ्हेनें मार्गदर्शन करणार या कुतूहलापेक्षां ती लग्न कोणाशीं करणार याच्या चांभारचौकशा करण्याचीच प्रवृत्ति जास्त प्रमाणात दिसून येते.

या युद्धकालांत कांहीं देशांवर बॉंब पडले, कांहींत यादवी माजली, कांहींची लाडगेतोड झाली, आणि कांहींची लचकेतोड बुभुक्षित कोल्ह्यांनीं आजही चालविली आहे. – एका अर्थी युद्धाच्या प्रत्यक्ष झळा या देशाला फारशा लागलेल्या नाहींत. इजिप्तला पोहोंचेपर्यंतच जर्मनीची लाट परतविली गेली, आणि इंफाळ–कोहिमाच्या सीमेंतच जपान कोलमडला. पण या देशांत उपासमारी आणि रोगराई यांनींच बळींच्या संख्येंत हिंदुस्थानला अग्रभागीं आणून ठेविलें. सत्ताधारी, प्रतिगामी; कार्यकर्ते; वनवासी, गुंडांना प्रत्यक्ष आणि धनिकांना अप्रत्यक्ष रान मोकाट अशा स्थितींत या देशांत जे आम्ही जगलों तें विलक्षण ओढगस्तींत आणि संत्रस्त मनःस्थितींत एका टोंकास ज्वलंत जागृतीच्या उडणाऱ्या ठिणग्या तर दुसरीकडे औदासीन्याचा बारेमाप धूर; क्वचित् कोठें अफाट पैसा तर दुसरीकडे दारुण दारिद्र्य आणि उपासमार. एकीकडे आर्थिक प्रश्न जरा सुटल्यासारखे वाटावेत; तर दुसरीकडे त्या स्वातंत्र्याला पुरून उरणारे नवे अवघड प्रश्न उत्पन्न झालेले दिसावेत ! कदाचित् बॉंबचे धक्के येथें प्रत्यक्ष बसले नसतील; तरी पण अन्यत्र झालेल्या बॉंबवर्षावाचे धक्के आम्हांला हि इतके जाणवले कीं, गांवांच्या, प्रांतांच्या आणि देशांच्या मर्यादा ओलांडून व्यक्तिजीवनाचे धागे मानवी जीवनवस्त्राच्या एकंदर विणींत अधिकाधिक निगडित होत असल्याची जाणीव आम्हांला झालेली आहे; आणि त्याबरोबरच आम्हांला हेंहि कळलें कीं, यापुढें आमच्या देशांत घडणारे उत्पातही इतरत्र असलेल्या मानवी समाजांना जाणवल्यावांचून राहणार नाहींत; आणि त्यांनाही हें मनोमन पटलेलें आहे. पण इतकें कळूनही जणूं आम्हांला कांहींच उमजलें नाहीं अशा आंधळेपणानें एका नवीन दरीच्या तोंडाशीं आंधळ्याची माळ करून आम्ही उभे आहोंत, आणि युद्धकालांत जगतांना सुखदुःखांबद्दलची जी आध्यात्मिक उदासीनता आमच्या अंगीं बाणली आहे, तिच्याच पुण्याईनें अगदीं शांतपणें आमच्या म्होरक्याच्या वाटींत ( वाटीबाहेर? ) कोणचा पैसा पडतो याची वाट पाहात आहोंत.

वाङ्मयशोभा, मे १९४६

———

# भाषाशुद्धीविषयीं कांहीं विचार 

प्रतिभेच्या ता. १५ जुलैच्या अंकात श्री. रामशास्त्री यांनीं श्री. कृ. पां. कुलकर्ण्यांचें भाषाशुद्धीवरील भाषणातील कांहीं उतारे उद्धृत केले आहेत. आणि त्याला अनुलक्षूनच ‘ फुलपात्र ’ ( Flower-pot ) या शब्दाच्या युक्तायुक्ततेसंबंधीं थोडक्यांत चर्चा केली आहे. त्या ठिकाणीं जी व्यवहारदृष्टि उपयोजिली आहे ती कदाचित् भाषाशुद्धीच्या कट्टर पुरस्कर्त्यांना पटणार नाहीं तरीपण ती खरोखरच उपयुक्त असल्यानें लोकांना पटल्यावांचून रहाणार नाहीं.

फुलपात्र शब्दाची चर्चा या दृष्टीनें मोठी गमतीची ठरेल. श्री. पटवर्धनांनीं ज्यावेळीं तो शब्द सुचविला त्याचवेळीं “ तो शब्द बरोबर नाहीं, कारण निराळया अर्थानें तो भाषेंत पूर्वीच रूढ आहे; निराळाच शब्द करावयाचा तर ‘ पुष्पपात्र ’ असा शब्द करावा, ” असें श्री. तात्यासाहेब केळकर शेजारी बसलेल्या श्री. अत्र्यांना म्हणाले असें खात्रीलायक माहितीवरून कळतें. आणि त्या शब्दाची प्रतिभेंतील चर्चा याच मुद्याचें स्पष्टीकरण नाहीं काय ?

परवा तात्यासाहेब केळकर कोंकणांत असतांना एक गृहस्थ त्याना भेटावयास गेले होते. त्या वेळीं हाच विषय निघाला होता. केळकरांच्या नवीन प्रसिद्ध होणाऱ्या विनोदावरील पुस्तकांत हास्यक हा नवीन शब्द ‘ हास्य उत्पन्न करणारें तें ’ या अर्थानें वापरला आहे.त्याचप्रमाणें त्या ठिकाणीं एकानें Tragic या अर्थी खेदक हा शब्द सुचविला; त्यावर उलट अर्थानें तात्यासाहेबानीं मोदक हा शब्द सुचविला. त्यावर त्याचा हंशा पिकला. तेव्हां ते म्हणाले, ‘ ह्या मोदकानें तुम्हाला खायचा मोदक आठवला आणि म्हणून तुम्ही हंसलात तेव्हां आपण प्रमादक हा शब्द वापरूं म्हणजे हा घोंटाळा होणार नाहीं.’

बऱ्याच वर्षांपूर्वी याच विषयावर लिहिलेल्या " सुभाषित आणि विनोद या पुस्तकांत वापरलेला ' सुभाषित ' हा शब्द ' Wit ' या शब्दाला प्रतिशब्द म्हणून दिलेला आहे. परंतु तो भाषेंत आधींच निराळ्या अर्थानें—चांगले बोल—रूढ असल्यानें आपली भाषा तो पचवूं शकली नाहीं. त्यामुळें अर्थबोध न होता घोंटाळा मात्र झाला, होतो व पुढेंहि होईल. पुस्तक प्रसिद्ध झालेल्याला तीस वर्षें झालीं तरी ज्या अर्थी तो भाषेत रूढ होत नाहीं त्याअर्थी तो एक तऱ्हेनें त्या शब्दाचा पराभव समजून मी तो परत घेणार आहे " असें केळकर म्हणाल्याचें त्या गृहस्थानीं सांगितलें.

जे नवीन शब्द घ्यावयाचे ते शक्य तितके सोपे व सुटसुटीत असावेत; कानाला मधुर लागणारे असावेत. नवीन शब्द आणताना निराळा अर्थ व्यक्त करणारा तोच शब्द प्रचारांत नाहीं ना हें बघावें, कारण एका शब्दाला दोन अर्थ असणें हा गुन्हा नसला तरी निरनिराळया छटा व्यक्त करणारे निरनिराळे शब्द असल्यास चांगलें. जुने नोकर काढूं नका पण नवे ठेवताना जास्त काळजी घ्या. ' श्यामची आई ' या पुस्तकांत Fountain pen याला ' झरणी ' हा प्रतिशब्द वाचला. त्यापेक्षां ' कलमझरी ' ( झरी=A Rivulet ) हा शब्द जास्त बरा असें दुसरे एक गृहस्थ सुचावितात. पहिला लहान आहे खरा, पण दुसऱ्यामुळें लेखणीची कल्पना स्पष्टपणें येते. पण ' कलम ' शब्दच परकी म्हटला तर हा शब्द फुकट गेला. दुसरा एखादा कट्टर शुद्ध मराठी ' गळू ' हा शब्द सुचवील. आता ' तो गळूनें लिहितो ' ' खाली पडून त्याचें गळूं फुटलें ' हा वाक्यप्रयोग कसा लागेल पहा. वरच्या ' मोदका ' चाच हा एक प्रकार; पण ' मोदक ' निदान गोड तरी आहे. असो. Strature या शब्दाला 'उचली' हा शब्द कुठें तरी नुकताच आलेला आहे. खरोखरच मोठा मार्मिक आहे. साधा, सोपा, सुंदर वगैरे विशेषणें त्याला खात्रीनें लागूं पडतील. Shamfight याला मराठी शब्द नाहीं. ' लुटपटीची लढाई ' हा योग्य शब्द खास होणार नाहीं. ते दोन शब्द होतात व बोजड होतात. श्री. य. न. केळकर यांनीं कुठेंसा 'झुंटा-जंग' हा शब्द सुचविला आहे. पण तो मराठी नाहीं. वरचा 'कलमझरी' हा शब्द त्यांचाच आहे. जुन्या मराठी इतिहासाचे अभ्यासक असल्यानें अशा शब्दांचा उपयोग त्यांनीं करावा हें साहजिकच आहे. आतां

फक्त इंग्रजी शब्दांचा आव्हेर करावयाचा कीं,सर्व परकी शब्दांचा करावयाचा हें ठरण्यावर हे शब्द घ्यायचे किंवा नाहींत तें अवलंबून राहील. नवीन शब्द कसे करावेत हें दाखविण्यापुरताच त्यांचा येथें उपयोग अभिप्रेत आहे. Sham-Fight याला 'महाराष्ट्रां'च्या एका अंकांत 'लटकी लढाई' हा शब्द वाचला. त्यांत जर मुद्रणदोष नसेल तर त्यापेक्षां कदाचित् 'लटकी लढाई' हा शब्दप्रयोग जास्त बरोबर होईल असे वाटतें. जिभेला 'चव आणणारी' या अर्थी रसना शब्द वापरतात. "जंव रसना नाहिं जिंकिली." आतां 'बोलणारी' या अर्थी 'वचना' हा शब्दप्रयोग जिभेबद्दल कां करूं नये? Over-boundbry याला पट्कार शब्द वापरलेला आढळतो, परंतु तो कानाला चमत्कारिक लागतो व योग्य अर्थबोधहि करीत नाहीं. असो.

हीं जी सगळीं उदाहरणें दिलीं त्याचें तात्पर्य येवढेंच कीं, भाषा समृद्ध करावयाची असेल तर असे नवीन शब्द केलेच पाहिजेत आणि परीक्षेकरतां ते तज्ज्ञ आणि वाचक वर्ग यांचेपुढें ठवावेत. तज्ज्ञ योग्यता ठरवितील. जनता ते कितपत रुचतात तें सांगेल व शेवटीं ते कितपत पचतात याचा निर्णय काळ देईलच.

भाषाशुद्धीची ही मोहीम (परकी शब्द!) बॅ. सावरकर व त्यांच्या जोडीला श्री. पटवर्धन या आघाडीवरच्या (पुन्हां परकी शब्द!)योद्धयांनी रेटीत रेटीत खूप पुढें चालविली आहे यांत शंका नाहीं आणि त्यांची निष्ठा, धडाडी, विशिष्ट प्रकृति, आणि कर्तृत्वशक्ति हीं बघितली म्हणजे या गोष्टी अपेक्षितच होत. परंतु त्यामुळें ही चळवळ एकांतिक होत चालली आहे हेंहि तितकेंच खरें. आतां कांहीं लोक म्हणतात त्या प्रमाणें "कुठल्याहि गोष्टीचा प्रचार करावयाचा म्हणजे हें असें पाहिजेच, त्याशिवाय खळबळ माजत नाहीं आणि खळबळी शिवाय क्रांति (असूं दे कां हा शब्द येथें!) होत नाहीं;" असें जर असेल तर प्रश्न निराळा. पण तरी देखील इतर माणसांनीं, ज्यांना व्यवहार करावयाचा आहे व व्यवहारकरतां भाषा उपयोगांत आणावयाची आहे त्यांनीं, व्यवहारदृष्टीनें, जर नवीन शब्द स्वीकारावयाचे असतील तर, वर म्हटल्याप्रमाणें सोपे, सुटसुटित, रुचतील व पचतील असेच शब्द नकोत कां स्वीकारावयाला? आमच्या भाषेच्या

अंगावर घालावयाला सोन्याचे साज आमच्याजवळ नाहींत म्हणून अपुऱ्या सुतळीनें गळफांस का आंवळायचा आहे ?

घरांत नसेल सोनें तर लुटावयाला जायला पाहिजे. पण आजच्या नव्या मनूंत जर लुटारुपणा वाईट ठरत असेल तर स्वतःच्या हद्दींतच कुठेंतरी सोन्याच्या खाणी हुडकल्या पाहिजेत. पण दागिना घालायचा तो नसेल तरी चालेल पण तो नाहीं म्हणून बेगड खास फांसावयाची नाहीं. आमची भाषासुंदरी दागिन्याविरहित साध्या वस्त्रप्रावरणांतहि आपल्या नैसर्गिक सौंदर्यानें शोभून दिसेल.

जर लुटालूट करावयाची नसेल, परकी शब्द घ्यावयाचे नसतील तर कुलकर्णी म्हणतात त्याप्रमाणें दुसरा खडतर मार्ग अवलंबिला पाहिजे. त्या-करतां आपणाला निरनिराळे उद्योग व व्यवहार उत्पन्न करावे लागतील. आपले स्वतःचे संकेत उत्पन्न करावे लागतील, आणि मग त्यांचे दर्शक शब्द आपोआपच आमचे होतील व परकीय देखील ते घेतील; हें त्यांचें म्हणणें कुणालाहि पटण्यासारखेंच आहे. वर जे अनेक गुण नवीन शब्दाच्या अंगीं पाहिजेत असें म्हटलें त्याबरोबर नवीन शब्द सामर्थ्यवान हवा असें म्हटलें पाहिजे. त्यानें गरज व्यवस्थितपणें भागविली पाहिजे. पण हें सगळें म्हणून काय उपयोग ? जिथें आमचें जीवनच दरिद्री तिथें भाषा तरी कोठून संपन्न असणार ! वाङ्मय जीवनाच्या दुधावरची साय आहे. ज्या मानानें हें दूध सकस त्या मानानें साय चांगली. आमचे व्याप ज्या प्रमाणांत वाढतील, व्यवसाय भरभराटांतील त्या प्रमाणांत वाङ्मय जास्त जास्त व्यापक आणि समृद्ध होईल आणि अर्थातूच आमच्या भाषेचेंहि दैन्य नाहींसें होईल.

पण हें सर्व होण्याच्या आधीं केवळ हट्टानें जर आम्ही असतील नसतील ते परकी शब्द काढून टाकूं लागलों आणि कटु, बोजड व एकंदरींत भाषेला असह्य होण्याजोगे शब्दप्रयोग जर तिच्यावर लादूं लागलों तर तेंहि घातुक नव्हे काय ? भाषाशुद्धीची चळवळ आजची आहे असें नाहीं. शिवाजी महाराजांच्या वेळचा राज्यव्यवहारकोश जरी सोडला तरी अलीकडे चिपळूणकरांपासून तरी ती चळवळ चालू आहे. जुन्या मराठी पुस्त-कांत, 'म्हणतात जे मराठी भाषा होणार ही असें नष्ट' ही जी कविता

शिकवीत ती त्याचेंच द्योतक होय. या चळवळीची आवश्यकता आहे हें खरें; पण ज्या अर्थी इतकी वर्षे परकी शब्द भाषेंत दृढमूल होऊन बसले आहेत त्याअर्थी व तोंपर्यंत वर म्हटल्याप्रमाणें आमच्या जीवनाचें संकुचितत्व व दारिद्र्य या गोष्टी कटू असल्या तरी सत्य आहेत तोंपर्यंत ही चळवळ जपूनच केली पाहिजे. आजचा पश्चाताप होण्यापूर्वी भरमसाट फारसी शब्द घालून केलेल्या कविता स्वतःच जाळायला कदाचित् आज पटवर्धन स्वतः तयार होतील. परंतु त्या जरी तशा असल्या तरी महाराष्ट्राचे आवडते कवि 'माधव जूलियन' यांच्या सामर्थ्यवान प्रतिभेच्या मुशींतून ओतलेलें तें सोनें आहे, आणि म्हणूनच पटवर्धनांना पश्चात्ताप झाला आहे, या सबबीवर महाराष्ट्र तरी ते मातीमोल मानायला खास तयार होणार नाही.

शेवटीं येवढेंच म्हणावेसें वाटतें कीं, सावरकर व पटवर्धन यांचें प्रचारकार्य त्यांना करूं द्या. ते खरोखरीच भाषेची मोठी सेवा आज करीत आहेत. पण आपण मात्र शिकतांना त्यानीं शिकविलेली प्रवृत्ति स्वीकारावी. त्यांचे सर्वच शब्द घ्यावेत असें नाहीं व तेहि सूज्ञास सूज्ञ असल्यामुळें असा आग्रह धरणार नाहींत व धरल्यास तें योग्यहि होणार नाहीं. कारण प्रचारक या नात्यानें एकांतिकपणा जरी त्याना एक वेळ क्षम्य आहे असें मानलें तरी इतरांनीं मात्र तसें होऊन चालणार नाहीं. आमच्या भाषामंदिरांत परके शब्द शिरून भेद करीत आहेत हें खरें व त्याकरतां जागृति अवश्य हवी. आणि ती जागृति रहावी म्हणून कर्तव्यतत्पर जागले, जरी 'घरवाले सावध' असें ओरडून, रात्रीची शांतता भंग करीत असले तरी उगीच सगळ्यांनींच आवाजाला आवाज मिळविला तर सर्वत्र एकच हलकल्लोळ माजून वास्तविक पाहातां काय होतें तेंच कळेनासें होईल; आणि म्हणूनच त्यांनीं दिलेल्या इषाऱ्यांनीं सावध होऊन, उगाच धामधूम न करतां, गंभीरपणानें प्रत्येकानें आपली दारें तपासलीं तरच जास्त कार्य केल्यासारखें होणार आहे. *

प्रतिभा, सप्टेंबर १९३६

* निबंधमालाकार कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं 'भाषादूषण' नांवाच्या निबंधांत भाषा शुद्ध असावी व राहावी हें ग्राह्य मानून कांहीं चिकित्सा केली

आहे. त्याच निबंधाचें पहिलें वाक्य 'भाषादूषण म्हणजे भाषेचें खराब होणें' असें आहे. आणि याच वाक्यानें त्यांच्या भाषाशुद्धीच्या प्रचाराला गालबोट लागलें आहे.

हें गमतीचे उदाहरण देण्याचा हेतु एवढाच कीं, मनुष्याची कृति ही सर्वस्वीं त्याच्या ध्येयाला अनुसरून घडत नाहीं. आणि हें अनेक वेळीं सहजगत्या होऊन जाते. त्याचें कारण येवढेंच कीं ध्येय हें भावी कालांत साध्य व्हावयाचें असते आणि आचार जुन्या संस्कारांच्या आणि अभ्यासाच्या बराच आधीन असतो. भाषाशुद्धीच्या सर्वच पुरस्कर्त्यांनीं हें सत्य ध्यानांत घेतलें तर आपसांतले किती तरी वाद टळतील. अर्थात् भाषाशुद्धीचें तत्त्व सर्वसामान्यपणें मान्य असणारापुरतेंच हें विधान मर्यादित आहे. पण सर्वसामान्य माणसाला भाषाशुद्धीचें तत्त्व पटलेलें आहे आणि वादधुरंधरांच्या वादाकडे बघतांना सर्वसामान्य मनुष्य आपला विवेक कायम ठेवील तर त्याचा बुद्धिभेद व्हायचें कारण नाहीं.

अर्थात् एखाद्या महत्कार्याचें ज्यांनीं कंकण बांधलें त्यांचे हातून एकांतिकपणा घडणें संभवनीय आहे, आणि इष्टहि आहे.नाहींतर बहुजन समाजाच्या गळीं ती सुधारणा उतरणेंच शक्य होणार नाहीं. सावरकरांचा एकसष्टीनिमित्त साहित्यिकांनीं सत्कार केला तेव्हां कै. वा. म. जोशी यांनींच सांगितलें कीं 'विधिमंडळ' शब्दाची पहिल्या दोन अक्षरांवर जोर देऊन लोक प्रथम थट्टा करीत, पण नंतर तो शब्द रूढ झाल्याचेंहि त्यांनीं मान्य केलें. एकान्तिकपणाबद्दलची होणारी थोडीफार थट्टा सहन करावयाची पुरस्कर्त्यांचीहि तयारी असावी.कारण त्यामुळें कार्यसिद्धि होते. 'इंटरव्हल' या शब्दाऐवजीं सावरकरांनीं सुचविलेला 'मध्यंतर' हा शब्द तर अतिशय झपाट्यानें लोकांनीं आत्मसात केला आहे. व त्याची थट्टाहि झाली नाहीं. यावरून साधा, सोपा, सुंदर व सटसुटीत शब्द लोकांकडूनहि चटकन् आत्मसात् केला जातो हें लक्षांत येईल.

दि. १-१०-४६

---

## ही कुणाची कर्मदशा ? २०

भिकू जामखेडकर गेल्या दोन पिढ्या आमच्या गांवांत चर्मकाराचा व्यवसाय करीत असे. त्याचा म्हातारा बाजारपेठेंत एका रस्त्याच्या कडेला पोतं टाकून आणि पेटी मांडून बसायचा, शेजारच्या चहावाल्याकडून मधून मधून चहा मागवायचा, त्याच्या पोऱ्यानं टमरेल्यांत आणून ओतायचा आणि पीत पीत यानं वर आलेले वहाणांचे खिळे परत आंत ठोकायचे हा कार्यक्रम माझ्या लहानपणापसून मीहि पाहात आलों आहें. भिकू ह' म्हाताऱ्याचा लहान मुलगा. तो आणि मी बरोबरच लहानपणीं शाळेंत शिकलों. पण माझे वडील शाळेचे हेडमास्तर, पहिल्यापासूनच थोडेसे पुढारलेले म्हणजे हल्लीच्या भाषेंत पुरोगामी आणि म्हणूनच भिकूला शाळेंत वर्गाबाहेर पोत्यावर न बसवता ते वर्गांत पण बाजूला बसवीत आमच्या जवळसुद्धां त्यानं बसायला त्यांची हरकत नव्हती. आणि तो घरीं आला म्हणजे ते त्याला तसें बसवीतहि. पण शाळेंत इतर मुलांच्या पालकांनीं तक्रार केली. खुद्द भिकूचा म्हातारा बाबांना म्हणाला, " मास्तर तुमची व्हते सुधारना पन हतं माजा जीव लागलाय टांगणीला. हा ब्रह्मसमंध कां चेतावताय उगाच ? माझ्या गरिबांच्या पोटावर पाय ठेवतील ह्ये ! माज्या रागांवर एकादा मुस्लमान मोची पैसा देऊन हतं आनतील, त्यापक्षी माजा पोरगा ना शिकला तरी बेस." बाबांना हें मुळींच पटलें नाहीं.ते म्हणाले, "अरे, अशी ह्यांची वृत्ति आहे म्हणूनच तर आपला समाज रसातळाला गेला आहे. पण म्हणावं कर्मदशा चुकायची नाहीं. व्यक्तीचं कर्म व्यक्तीला भोवतं तसं समाजाचं कर्म समाजाला पण भोंवल्याशिवाय राहणार नाहीं ! ! ! पण शेवटीं तडजोड म्हणून भिकूला वर्गात पण बाजूला बसवायचं ठरल.

* * *

अशी चार दोन वर्षे गेलीं. मीं फायनल होऊन ट्रेनिंगला गेलों. भिकूचा म्हातारा वारला म्हणून भिकूनं शाळा सोडून धंदा हातीं घेतला. मी ट्रेनिंग स्कूल मधला कोर्स संपवून परत येतों तों भिकून पेठेंत दुकान भाड्यानं घेऊन धंदा थाटला होता.

* * *

बाबांच्या वशील्यानं त्याच शाळेंत मला नोकरी मिळाली होती. पुढे दहापांच वर्षे गेलीं. तेवढयांत गांवाला म्युनिसिपालटी मिळाली होती. पुष्कळांना मतं मिळालीं होतीं. लोकशाहीच्या दिवसांत मतं असणं ही केवढी शक्ति आहे ! भिकूनं आतां चांगला जम बसवला होता. आणि तो येत्या निवडणुकींत उभाहि राहाणार होता. तोहि बोलण्याचालण्यांत गोड होता. पण इतर ब्राह्मणांबद्दलची त्याची तुच्छता माझ्या बाबतींतहि थोडीफार जाणवे. त्याचे दोघे भाऊ माझ्या शाळेंत होते. आणि त्यांच्या मनांतले विचार ऐकून टाकायला सुशिक्षित समाजापैकीं मीच त्यांचा मित्र असल्यानें तोहि माझा स्नेसंबंध टिकवून असे.

निवडणूक झाली आणि भिकू निवडून आला. आता तो मेहेरबान भिकू-शेट झाला होता. या निवडणुकींत बरेच ब्राह्मणेतर आणि हरिजन निवडून आले होते. एका परीनें हें बघून माझ्यासारख्याला आनंद झाला होता. पण दुसऱ्या बाजूनें विचार करता केवळ माताच्या जोरावर मोठेपणाला चढलेलीं हीं माणसें माणुसकीला पारखी होतील अशीच जास्त भीति वाटे ना शिक्षणाचा संस्कार ना संस्कृतीचा संपर्क, असे हे कित्येक मेहेरबान त्या छोट्याशा गांवांत कर्ते करविते झाले होते. पण शिक्षणाचा अभिमान तरी आम्ही कां धरायचा ! कारण चार सुशिक्षित मेहेरबानांनीं बाकीच्या मेहेरबानांना हाताशीं धरून स्वतःच्या तुंबड्या भरायचे ' पॉलिटिक्स ' सुरु केलें होतें. अशाच कारवायी-पायीं म्युनिसिपालीटींतले दोन तीन सज्जन आणि सुशिक्षित मेहेरबान बाजूस पडले होते. आणि त्यांची कुचंबणा पाहात बसण्यांत वर सांगितलेले मुत्सद्दी मेहेरबान आनंद मानीत होते. म्युनिसिपालिटीच्या अधिकारपदाच्या पुन्हां निवडणुकी झाल्या. आणि मुत्सद्दी मेहेरबानांनी हाताशीं धरल्यामुळें भिकूशेट म्युनिसिपालिटीचे व्हाइस चेअरमन झाले.

ते आतां माझे अन्नदाते झाले होते. भिकूशेट आतां दुकानांतल्या बाकावर पाय सोडून आणि धोतर गुडघ्याइतकें वर ओढून, पायावरील केस कुरतडत बसलेले दिसत. कारागिरी त्यांनीं सोडूनच दिली होती. त्या कामाकरता दोन नोकर ठेवले होते. आता तर ते मला नेहमीं हांक मारीत आणि चहा प्यायचा आग्रह करीत, त्यांच्या दुकानांत आतां कपबशाचा सेट होता. आणि किटली घेऊन पोऱ्या समोरच्या दुकानांतून चहा घेऊन येत असे. त्याला मी प्रथम प्रथम थट्टेनें आणि नंतर तसें म्हट-ल्यानें त्याला आनंद होतोसें पाहिल्यावर मुद्दामच साहेब म्हणत असे. आरंभीच्या माझ्या साहेब म्हणण्यांत कांहीं खरोखरीच कौतुकाचा भाग होता. आणि नंतर त्यांत थोडा तिरस्कार आणि मग मात्र करुणा उत्पन्न झाली. मला खरोखरोच या मेहेरबानांची कींव येऊ लागली. माझे वडील म्हणत, व्यक्तीला कर्मदशेचें फल चुकत नाहीं तसं समाजालाहि चुकत नाहीं. आणि म्हणून डोळयाला झांपड बांधून शतका शतकें वावारणाऱ्या रुढिप्रिय आणि दलितांना उतरोतर अधिकच दलित बनवीत जाणाऱ्या समाजाच्या डोळयांत अंजन घालण्याकरितां पददलितांना दैवगतीनें बरे दिवस यावेत. इथपर्यंत मला हें कर्मदशेचं तत्त्वज्ञान पटत असे. प्रण त्याचा दलितांनीं बरी स्थिति आल्यानंतर पुन्हां आपल्या मूर्खपणानें आपल्या संचित पुण्याचा क्षय करून दैवाच्या रहाट गाडग्यांत दुर्दशेचं कर्मफल पुनरपि भोगण्याची तयारी करावी याचा मला विषाद वाटे.

मुलाच्या शाळेतच दोन वेगळया खोल्या देऊन म्युनिसिपालिटीनें नवीनच मुलींची शाळा नुकतीच सुरू केली होती. मुलींच्या वर्गांना लागूनच मुलींना खेळण्याकरितां थोडीशी मोकळी जागा होती आणि पलीकडे एक विटाची भिंत होती. भिंतीपलीकडे एक जुनी धर्मशाळा होती. मुलींच्या शाळेंत यायचं झालं तर मुख्य दरवाजानं आंत येऊन आमची शाळा ओलांडून पुढं जावं लागे. एक दिवस दुपारीं दोन वाजतां मधल्या सुट्टीच्या वेळीं मी मास्तरांच्या खोलींत बसलों होतों. येवढ्यांत थोडासा गलका आणि कांहीं रागाचे शब्द ऐकूं आले, म्हणून बाहेर येऊन पाहूं लागलों तों मुलींच्या वर्गापाशीं थोडी गर्दी दिसली. आणि मास्तरीण-

बाई कुणा नवीनच आलेल्या दोन तीन माणसांना रागानें बोलत असलेल्या दिसल्या. हे ' जी भाऊ लोक ' आंत आले केव्हां आणि हा गोंधळ कसला तें मला कांहींच कळेना. समोरच्या दारानें तर यांना येताना मीं बधितलें नव्हतें. मग हे आले कुठून ? मी पुढें झालों आणि पाहातों तों या ' पाहुणे ' लोकात म्युनिसिपालिटींत नवीनच निवडून आलेले गावातील एक मेहेरबान दिसत होते. आणि घरीं आलेल्या अेक दोन सोबत्याना घेऊन धर्मशाळेच्या बाजूनें भिंतीवरून शाळा पाहायला आणि दाखवायला आले होते. मेहेरबानांना ओळखतांच मी मास्तरीणबाईंना आणि मुलींना वर्गांत पाठवून दिले आणि सन्माननीय पाहुण्यांना घेऊन ऑफिसांत आलों. सर्वांना खुर्च्यांवर स्थानापन्न करून नम्रपणानें आगमनाच्या कारण ची चौकशी केली. तेव्हां कळलं कीं जेवण झाल्यानंतर सदर मेहेरबान पाहुणे मंडळींना धर्मशाळेच्या कोपऱ्यावरील दुकानांत पान देत होते. तेव-ढ्यात ' आपल्या कमिटीची शाळा बघायला जाऊं ' असा बूट निघाला. आणि भिंतीवरून जाण्याचा रस्ता सगळ्यात जवळ असल्यानें ते तिकडून आंत आले होते. त्याचा एवढा बाऊ करण्याचें मास्तरीणबाईंना कांहींच कारण नव्हते. ' आमी मेंब्र आहोंत मेंब्र. आमी कुटूनबी येऊं ' असं ते मास्तरीणबाईंना ठासून सांगत होते. आणि त्या बिचारीला कांहीं तें समजेना. आणि ती बेशिस्तपणाबद्दल ' थांबा, पोलिसांत कळवते ' असा त्यांनाच उलट दम देत होती. सदर बाईच्या उर्मटपणाबद्दल तिची बदली करायला नको काय, असा मलाच प्रश्न विचारून व शाळा नीट चालवायला सांगून सदर मेहेरबान आपल्या दोस्तांसह कांहीं वेळानें निघून गेले. सदर प्रकाराचा विचार करीत संध्याकाळीं मी घरीं चाललों होतों. तोंच भिकूशेटची परिचित हांक कानावर आली. मी आंत जात म्हटलें, ' काय साहेब, काय हुकूम आहे ? ' तेव्हां मला बाकावर बसण्याची खूण करीत मेहेरबान म्हणाले, ' काय मास्तर, आज शाळेंत लई गंमत झाली नव्ह का ? अहो, त्या हसन कोष्टयाचा सारा जलम् गेला गांव उंडारण्यांत, सरळ दारानं आंत आला तर तो हसन कसला ? ' मी म्हणालों, ' अहो पण साहेब, शाळा बघायची होती तर सरळ दारानं माझ्याकडे यायचं होतं. मी सगळी शाळा

असती. भिंतीवरून आलेला माणूस तो मेहेरबान आहे हें त्या बाईनं कसं ओळखायचं ?' भिकोबांनीं पायाची फक्त अढी बदलली. खालचा पाय वर घेतला आणि त्या पायाचे केस कुरतडत म्हणाला, 'ते काई नाई. तुमा मास्तर लोकांची जातच लई उर्मट झालीया. कमिटीचा पगार खाता आणि मेहेरबानांना वळखीत नाहीं ! तुमास्नी चांगला हिस्का दावला पाहिजे !' मी मनांतून खूप संतापलों होतों. पण सर्व राग गिळून शांतपणें विचारले, 'मग साहेबांनी काय करायचं ठरवलंय् ?'

'तुमा मास्तर लोकांचा अर्ज आला आहे ना, या २८ तारखेला दिवाळी हाये तवा म्होरल्या महिन्याचा पगार ह्या महिन्यांत द्या म्हून.' मी प्रश्नार्थक दृष्टि तशीच कायम ठेवली. तेव्हां भिकोबा पुढें म्हणाले, 'अन् प्रेशिडेंटसाहेब गेलेत गावाला. तवा अर्जावर म्याच लिवलं, या अर्जाचा इच्यार म्होरल्या महिन्यांत करा. अन् सही केलीन काय !'

मी मुकाट्यानें उठलों, अन् घरच्या दिशेनें चालायला लागलों. बाबांचे कर्मफलाचें तत्त्वज्ञान माझ्या डोक्यात थैमान घालीत होतें. समाजाच्या कर्म-फलाचं काय असेल तें असो, पण या भिकोबाला माणुसकीनं वागवावयास पहिली सुरुवात आमच्या बाबांनीं केली. आणि त्यांच्याच नातवंडांना ही दिवाळी तेलाशिवाय आणि साखरेशिवाय काढावी लागणार होती. भिकोबा-जवळ माझें वजन असल्यामुळें आमच्या अर्जाला नक्की होकार मिळणार या आशेनं बिचाऱ्या मास्तर मंडळींनीं तो अर्ज माझ्या मार्फत दिला होता. त्या अर्जाचा असा निकाल लागला. भिकोबा आपल्या अधिकारमदांत होते. त्यांची समजूत पटण्यासारखी नव्हती. तेव्हां राहिलेल्या शिक्षकांच्या, माझ्या, आणि भिकोबाच्या कर्मफलाचा विचार करीत मी उदास मनानं घराकडे परतलों.

दैनिक काळ, ९ जुलै १९४५.

———

# विस्तारवेल



आधारवडाची कल्पना मला जितकी भव्योदात्त वाटते तितकीच विस्तार-वेलाची कल्पनाहि हृद्य आणि मनोरम वाटते. पहिलीमध्यें माझ्या गत जीवनांतील आणि कुटुंबाच्या गतेतिहासांतील अनेक प्रसंग त्या भव्य वडाच्या पारंब्यांच्या रूपानें साकार झालेले दिसतात. तर नुकत्याच वाढीस लागलेल्या वेलाची तुरळक पानें आणि रेशमाच्या धाग्याप्रमाणें मृदु पण लांब सडक अंकुर पाहून 'उद्यांची' कल्पना माझ्या मनांत आकार धरूं लागते. आधारवडाच्या छायेखालीं विसावतांना जीव सुखावतो तर विस्तारवेलाची जपणूक करतांना मन हळुवार बनतं.

निजामानं नाना फडणिसांकडे एक मडकं पाठवलं आणि तें भरून अक्कल मागवली. एका महिन्याच्या अवधींत नानांनीं तें परत केलं आणि 'मडकं न फोडतां अक्कल सबंध काढून घ्या 'असा निजामाला उलट निरोप पाठवला. नानांनीं तें मडकं एका भोपळ्याच्या वेलाजवळ ठेवलं आणि एक छोटा भोपळा आंत सोडून महिनाभर मडक्यांत वाढूं दिला. मडक्याच्या तोंडांतून भोपळा बाहेर येणार नाहीं येवढा मोठा झाल्याबरोबर देंठ कापून मडक्यासकट भोपळा निजामाकडे पाठवला व बरोबरचा वरील निरोप सांगितला. त्या मडक्यांतला भोपळा मडकं न फोडतां निजामाला सबंधच्या सबंध काढतां आला किंवा नाहीं मला माहीत नाहीं; पण माझ्या विस्तारवेलाचं-अविनाशचं-संगोपन करतांना असे अवघड प्रश्न अनेक वेळां माझ्या पुढं उभे राहतात. कांहीं परिस्थितीनं आणि कांहीं त्याच्या विलक्षण कल्पकतेनं; आणि बालमन म्हणजे काय त्याची मला मग बरोबर कल्पना येते.

ज्याचं बाल्यपण निष्काळजी स्थितींत गेलेलं असतं त्याचं मन लग्नापूर्वी आणि लग्नानंतरहि पहिले कांहीं दिवस कल्पनेच्या आकाशांत वाळूचे किल्ले बांधीत असतं. लहानपणीं बांधलेले वाळूचे किल्ले अजाणपणीं बांधलेले आणि निदान जमिनीला तरी टेंकलेले असतात. पण अल्लड तारुण्यांतले कल्पना वाळूचे किल्ले तर त्रिशंकूप्रमाणें अधांतरीच लोंबकळत राहतात. एकदां कां लग्न होऊन सासारिक जबाबदारीच्या दोऱ्यांनीं मनुष्य बांधला गेला कीं, मग माणसाला सहजीवनाचं खरं सुख कळतं. अर्थात् तें कळायला एक मूल होईपर्यंतचा अवधि मात्र ज्यूनियरच्या वर्षाप्रमाणं सुखानं जातो. निदान घरच्या सुखवस्तु मुलाच्या बाबतींत तरी असं घडतं. ' आतां तुमचं तुम्ही बघा हं ' असं पिताजींनीं स्वच्छ सांगितलेलं नसतं. मनावरचं ध्येयवादाचं वस्त्र विरलेलं नसतं, व्यवहाराच्या जमिनीला पाय लागायचे असतात. पण त्यानंतर–थोडक्याच काळानंतर–वरील गोष्टी भूतकाळांत जमा होतात. आणि दोघांचीच नव्हे तर तिघांचीहि जबाबदारी अंगावर पडण्याची वेळ येऊन ठेपलेली असते.

पुत्रप्राप्तीचा आनंद अद्वितीय असतो असं मानलं जातं. मग कुणी हत्तीवरून साखर वाटो, वा नुसती साखर वाटो. पण मला वाटतं हा आनंद इतरेजनानाच होत असावा. माझ्या एका स्नेह्यानं स्वानुभव सांगितला तो असा—एकोणिसाव्या वर्षी त्याचं लग्न झालं आणि बाविसाव्या वर्षी पितृपद प्राप्त होऊन त्याच्या सासऱ्यानं जेव्हां त्याचा मुलगा त्याच्या मांडीवर ठेवला ठेवला तेव्हां तो लाजेनं नव्या नवरीपेक्षांहि लालीलाल होऊन गेला. त्या मित्रानं सांगितल्याप्रमाणें मी लाजेनं चूर जरी झालों नाहीं–कारण मी तिशीला आलों होतों—तरी माझ्या मनांत पुत्रदर्शनानं प्रथम जी भावना उत्पन्न झाली ती आनंदापेक्षां संकोचाचीच होती. आणि माझ्या कल्पनेप्रमाणें आईचीदेखील पहिली भावना एका पणांतून सुखरूप पार पडल्यामुळें 'सुटके'च्या आनंदाचीच असावी.

पण प्रथम जेव्हां दोन महिन्याच्या चिमुरड्या अविनाशच्या संगतींत चार सहा दिवस राहून मी परत निघालों तेव्हांपासून एका वेगळ्याच विरह-व्यथेची–रूढार्थामुळं शब्द कानाला जरा कसासाच लागतो–जाणीव होऊं लागली. आणि ' वात्सल्य, वात्सल्य ' म्हणतात तें हेंच तर नसेल ना असा

प्रश्न मी माझ्या मनाला राहून राहून केला. गेल्या तीन वर्षांत या विस्तार वेलाचा पसारा खूपच वाढलेला आहे व त्याच्या धुमाऱ्यांनीं? माझ्या-जीवनाला कितीतरी वेढे बसले आहेत. आणि रोज नवीन नवीन वेढे बसत आहेत. बालजीवनाचा रोज नवीन आविष्कार करणारे ते मृदु नाजुक बंध जितके सुखद आणि ऊबदार आहेत तितकेच उलगडायला अवघड आणि संभाळायला कठीण आहेत.

फूल कसं फुलतं आणि मूल कसं वाढतं तें खरोखरीच परमेश्वरालाच माहीत. मुलाच्या खस्ता आईबाप काढतात हें खरं असलं तरी मूल मोठं झाल्यावर तें बालपणाच्या पैलतीराला कसं आलं त्याचं साग्रसंगीत स्मरण आईबापांना—निदान सगळ्याच-तरी असेल कीं नाहीं कोण जाणे! मला स्वतःचं जें बालपण काहींसं तुटक आठवतं आणि त्यांत जे माझं मन तदाकार होतं त्यावरनं वाटे कीं, आईबाप जर आपल्या मुलाची दैनंदिनी ठेवतील तर ती केवढी मोठी गोष्ट होईल. बालमानसशास्त्राच्या अभ्यासकांना अगर वैद्यांना त्याचा उपयोग किती होईल मला माहीत नाहीं. पण खुद्द आईबापांना आणि नंतर मोठेपणीं त्या मुलालाहि ती दैनंदिनी म्हणजे मोठा ठेवा वाटेल, यांत मला संशय वाटत नाहीं.

प्रत्येक सुशिक्षित कुटुंबांत आपल्या मुलाची अशी दैनंदिनी असावी आणि त्यांत मुलाच्या जन्मापासूनच्या महत्त्वाच्या घडामोडी अधूनमधून का होईना लिहीत जाव्या अशी कल्पना माझ्या मनात फार दिवसापासून होती. मी ती कांहींना बोलूनहि दाखविली होती. पण माझ्या माहितीपैकीं कांहीं कुणी ती अमलांत आणली नाहीं. आणि मी स्वतःदेखील जेव्हां ती अमलांत आणली तेव्हादेखील माझ्या आळशी स्वभावाला अनुसरून नियमितपणें निदान दर आठवड्याला कांहीं ती लिहिली गेली नाहीं; पण मला मनापासून ती कल्पना आवडली होती आणि अविनाशच्या जन्माबरोबरच मी या कामाला सुरुवातहि केली होती. म्हणूनच आज तीन वर्षांनीं त्या वहीची कांहीं पानें मी व माझ्या पत्नीनें मधून मधून लिहिलेलीं आढळतात. त्या पानांवर पुन्हां नजर फिरविली तरी दुहेरी आनंद होतो. गेल्या तीन वर्षांत अविनाशच्या संगतींत जे दिवस गेले त्यांची रम्य आठवण पुन्हां होते म्हणून एकपट आनंद होतो तर आपली कल्पना खरोखरच उत्तम होती

आणि म्हणूनच एका नव्या आनंदाचा पुनः पुन्हां प्रत्यय येऊं शकतो व पुढेंहि येईल हें मनात घेऊन माझा आनंद दुणावतो.

अविनाशची रोजनिशी मी जेव्हां वाचतो तेव्हां असं वाटतं कीं, त्यांतल्या किती तरी गोष्टी त्या रोजनिशींत नोंदलेल्या नसत्या तर त्या काहीं मला आठवल्या नसत्या आणि त्या रम्य प्रसंगाच्या पुनःस्मरणानें होणाऱ्या आनंदाला मी मुकलों असतों.

वर लिहिल्याप्रमाणं मुलं कशीं वाढतात हें काहीं कुणालाहि नीट खुलासेवार सांगतां येणार नाहीं. पण तें अनुभवायचं म्हटलं तर अनुभवायला मात्र येतं. अविनाशच्या जन्मापासून मला किती तरी दुखण्यांचीं नांवं माहीत झाली. ज्याला आपल्या यातना बोलूनहि दाखवता येत नाहींत अशा लहानग्याला या सर्व दुःखभोगांतून जावं लागतं आणि हें सर्व आपल्याला घट्ट मन करून उघड्या डोळयांनीं पहावं लागतं. पण याच कठोर अनुभवाबरोबरच तर जीवन म्हणजे काय आणि ताजेपणा म्हणजे काय याचाहि साक्षात्कार होतो.

तो दिवस मला आठवतो. सकाळपासून अविनाशला खोकल्याची उबळ येत होती. डॉक्टरनीं संथपणें सांगितलं कीं, ' पहायला यायची कांहीं जरूर नाहीं. मी दिलं आहे तेंच औषध द्या. ' पण आम्हांला घरांत चैन पडेना. मी दुपारीं कामावर गेलों तो अस्वस्थ मनःस्थितींतच. माझ्या एका स्नेह्यानं विचारलं, ' तुम्हांला बरं नाहींसं दिसतं, मग आलांत कशाला आज ? '

' मला काहीं होत नाहीं पण अविनाशला बरं नाहीं ' येवढंच मी विमनस्कपणें उत्तरलों. कांहीं वेळानें कामाकडेहि लक्ष लागेना. म्हणून घरीं परत आलों. घरीं तर आणखीच अवघड परिस्थिति माझी वाट पहात होती. औषधांतल्या गुंगीच्या औषधानें तो जवळजवळ निपचीत पडला होता. त्याची छाती वाजत होती. चार महिन्यांच्या जीवाच्या त्या यातना बघवताहि नव्हत्या आणि कांहीं उपचारहि सुचत नव्हते. शेवटीं निश्चयानं डॉक्टरचं औषध बाजूला सारलं आणि नात्यांतल्या एका वडील बाईना बोलवून आणलं आणि मुलाची आई, मी आणि त्या बाई या तिघांच्या कमिटीला जे उपाय सुचले ते केले. अर्ध्या तासाच्या अवधींतच त्यानें डोळे उघडले आणि आमच्याकडे बघून तो हंसला. त्याला बरं वाटत होतं आणि त्यानं तें

आम्हांला सांगितलं होतं. अंधारून आलेलं आभाळ मोकळं व्हावं तशी आमची मनोवृत्तीहि खुलली होती. आणि तशातच सूर्यदर्शन व्हावं त्याप्रमाणं सकाळीं आजारी होता कीं नव्हता असं तिऱ्हाइताला वाटावं अशा रीतीनं अत्री खेळत होता आणि हंसत होता.

निर्व्याज हास्याचा उल्लेख आपणांस अनेक ठिकाणीं आढळतो. पण निर्व्याज हास्य आपल्याला बालकाच्या ठिकाणींच आढळतें.

बोलकीं करण्याकरतां किंवा मनातलं दुःख अगर विचार लपविण्याकरतां बालक कधींच हंसणार नाहीं. त्याच्या वृत्तींत संकोच आणि Hypocracy अजून निर्माण व्हायची असते. ज्या वेळीं त्याच्या मनात अपेक्षा निर्माण होईल, एखादी गरज उत्पन्न होईल त्या वेळी तें बालकाच्या राजमार्गाचाच आश्रय करील. मोठ्यानें रडून ती अपेक्षा व्यक्त करील. पण एरवीं अव्याज मनोहर स्मिताचे गुलाब त्याच्या गालावर तिन्ही त्रिकाळ, जागृतींत वा झोपेंत फुलतच राहतील. यावरनं सहज आठवण झाली. मी लिहीत बसलों होतों. बाहेरच्या बाजूस बोलत असलेल्या दोन पंधरा सोळा वर्षांच्या समवयस्क मैत्रिणींचें संभापण मधून मधून कानांवर पडत होतें. त्यात एकीनें एक प्रश्न दुसरीला विचारला, 'का ग, लहान मूल झोपेंत कां हंसतं?' हातातलें लिखाण बाजूस सारून मी एका कागदावर हा प्रश्न लिहिला. आणि लगेच पुढें उत्तर लिहिलें, 'दिवसभर मोठीं माणसं किती मूर्खा-सारखं वागतात तें आठवून तें हंसतं.' ती थट्टा म्हणून सोडून देऊं पण अनेक वेळीं जेव्हां माझ्या मनांत मूल झोपेंत कां खुदकन् हसतं असा प्रश्न येतो त्या वेळीं गतजन्माची आठवण त्याला होऊन तें हंसत असावं असं उत्तर सुचतं. पण तेंहि मनाला पटत नाहीं. कारण त्याला कांहीं पुरावा आहे असं बुद्धि सांगत नाहीं. दुसरं असं कीं पूर्वी जर त्याचा मनुष्यजन्मच असेल तर तो तरी इतका सुखी असेल कशावरून कीं ज्याच्या आठवणीनं माणसाला सुखच व्हावं. मानवी जीवनाची जी उलघाल आपण बघतों त्यावरून तरी असा धाडसी अंदाज करायला मन धजत नाहीं. पण तरी देखील जागेपणीच्या हास्यापेक्षां लहान बछड्याचं झोपेंतलं स्मित अधिक आकर्षक असतं, ही गोष्ट मला मनोमन पटली आहे.

अविनाशच्या सहवासात हाचसा काय पण इतरहि आनंद मी किती तरी अनुभवले आहेत. काहीं आयुष्य गेलं त्यांत सुखहि भोगलं आणि दुःखहि सोसलं. पुढें कसे दिवस जातील हें कोण सागूं शकेल? पण जे भोगून संपले त्यात हे जे सुखाचे क्षण मी व्यतीत केले आणि आनंदाचे कण गोळा केले त्याची स्मृति मात्र कायम राहील आणि येवढ्या सुखा-बद्दल तरी मी विधात्याशीं कृतज्ञच राहीन.

अविनाशला माणूस ओळखायला लागून त्याच्या बाजूनें स्नेहबंधन केव्हां निर्माण झाले तें मला नक्की आठवत नाहीं. पण थोडीशी पुसट आठवण आहे ती तो पाच महिन्याचा असतानाची. त्याच वेळेपासून तो ओळखूं लागला कीं, कपडे घातले कीं नाना बाहेर जातात. त्यानंतरची पायरी म्हणजे त्याला चुकवून मी माझी मुबईची फेरी करायला गेलों कीं जेमतेम एक दिवस तो घरातल्या माणसाच्या भूलथापाना मानीत असे. पण दुसऱ्या दिवशीं रात्रीं जर का मी परतलों नाहीं तर कुलूप घातलेल्या माझ्या खोली-बाहेर बसून ' नाना दाखव ' म्हणून आईपाशीं धरणें धरून बसूं लागला. आणि तें रडणें मग झोंप लागल्यानंतरच थांबायचें. अर्थात् लवकर किंवा उशीरा, आपण परत आल्यानंतर आणि त्याच्यापुढें खाऊचे खिसे रिकामे केल्यानंतर मागचा सारा राग तो क्षणार्धांत विसरत असे. त्याच्या पुढची पायरी म्हणजे स्वतःच टांगा, आगगाडी व व्हिक्टोरिया इत्यादि सर्व साधनें कल्पनेनें निर्माण करून तो मुंबईस जाऊं येऊं लागला. पण आतां या काल्पनिक प्रवासांत रममाण होण्याच्याहि मर्यादेपलीकडे तो गेला आहे. आणि मी मुंबईस जाणार आहें याचा थोडासा जरी सुगावा लागला तरी ' मलाच कुशुमताईकडे न्या, मला बाबुराव मोटारींत बछवीन, छायाकडे नेईन' वगैरे गोष्टी तो सागूं लागतो.

त्याच्या कुशुमताईकडे एक रेडिओकाका आहे. त्या रेडिओकाकाला एक मिनिटभर—बटन दाबून होईपर्यंत—हात जोडून नमस्कार केला कीं, तो बोलूं लागतो अशी त्याची कुशुमताईच्या बाबुरावांनीं ठाम समजूत करून दिली आहे. बाबूरावांच्या वशिल्यानें रेडिओकाका बोलूं लागतात आणि त्यांच्या मोटारीमध्येंहि बसायला मिळतें म्हणून तो अर्थातच त्यांच्यावर खुष असतो आणि आपले खास खेळ त्यांना करून दाखवितो.

त्याच्या खेळांत विविधता तरी किती प्रकारची आहे ! तो अगदीं लहान वर्ष—सव्वा वर्षाचा असतांना त्याला मांजराचं विलक्षण वेड होतं. सबंध गोवरानें फुललेला, अंगाची लाही होत होती आणि दिवसरात्र अलगद कडे-खांद्यावर हिंडवून त्याला गप्प करावं लागत होतं. असाच एक दिवस मी त्याला घराच्या चौकांत हिंडवीत होतो. तो कण्हत होता. इतक्यांत गच्चीच्या कठड्यावर त्याला मांजर दिसलं. त्याबरोबर सगळं दुःख विसरून, एकदम हंसून त्यानं ' माऊ ' म्हणून हांक दिली आमच्या तात्यांच्या घरीं मांजरी व्याली होती. तिची गोजिरवाणीं पिलं दोन हातांत दोन घेऊन तो बसत असे. कुठलाहि खेळ त्याला प्रिय वाटला नाहीं इतकं मांजर त्याला त्यावेळीं प्रि' होतं. कपड्याच्या हत्तीपेक्षां कपड्याचं मांजरच त्याला खेळायला आवडत असे.

त्यानंतर तो थोडा मोठा झाला. आणि त्याला त्याच्या ' श्री दादाची ' गोष्ट सांगितलेली आवडू लागली त्याला खांद्यावर थोपटत थोपटत मी सांगायचा, ' बाळकाकाचा श्रीदादा विमानांत बसून येणार आहे, मग तो अवीला घेऊन जळगांवला जाईल, मग मोठ्या आईला आणि अप्पाछाय-बांना घेऊन श्री-अवीचं विमा‌न भूर जाईल. ' एवढी गोष्ट रंगवून सांगून होईपर्यंत हुंकार देत स्वारी झोपी जायची.

मग जसजशी त्याची स्वारी हुंकाराच्या नादब्रह्मांतून उच्चाराच्या शब्द-ब्रह्मांत प्रविष्ट होऊं लागली तसतशी गोष्टी ऐकण्यांतहि त्याची प्रगति होऊं लागली. मग तोच म्हणूं लागला, ' मला छुईची गोत्त सांगा ! मोद-काची गोत्त सांगा ! ' सगळी गोष्ट सांगून संपली कीं मी म्हणायचा, ' आमची गोष्ट आंखूड, तुमच्या पाठींत लांकूड ! ' कीं तो लगेच मला अडवून म्हणे,' नाहीं, आमची गोत्त आंखुड आणि तुमच्या पाठींत लांकूड !' आणि या चिमुकल्या कोर्टाच्या असल्या निकालावर अर्थातच आमच्या घरांत अपील नाहीं.

कांहीं वेळां तो आमचा डाव तर आमच्यावर याहिपेक्षां सफाईनें उलटावितो. एका रात्रीं तो रडत उठला. खिडकींतून चंद्र दिसत होता. त्याला चंदू मामाचं अतिशय वेड. त्याला गप्प करण्याकरिता मी म्हटलं, ' अवी' तो पाहिलास का चंदू ? तूं गप्प राहून निजलास तर मी तुला सकाळीं आंब्याची बर्फी देणार आहे. आणि जर रडलास तर ती या चंदूला

देऊन टाकीन.' या आमीषानं तो गप्प झाला पण मला म्हणालाच, 'नाना, बर्फी खायला चंदूला तोंड कुठं आहे?' त्याच्या सदऱ्याचं बटन तुटलं होतं आणि दुसरं बटन सांपडत नव्हतं. पण खोलीतलं दिव्याचं बटन लावायला सांगून त्यानं आमची अडचण ताबडतोब दूर केली.

एकदां तो हट्ट आणि रडणं थांबवीना म्हणून त्याच्या आईनं त्याला गॅलरींत कोळशाच्या पोत्याजवळ नेऊन बसवलं आणि सांगितलं कीं, रडणं थांबलं म्हणजे घरांत ये!' काहीं वेळानं डोळे पुसून दार उघडून तो आंत आला. पुढें चार दिवसांनीं त्याची आई गॅलरींत कोळसे काढून घेत होती. लगेच अवीनं खोलीचं दार लावून घेतलं आणि आई जेव्हां दार उघडून आंत येऊं लागली तेव्हां तो तिला म्हणाला, 'थांब, झालं कां तुझं रडून? मग डोळें पूस, आणि मग आंत ये!'

जरा चांगलं चालतां येऊं लागून जिन्याची चढउतार करायला यायला लागल्यावर स्वारी खालीं खाऊन चार पानं ओरबाडून एकां दुरडीत घालून भाजी विकूं लागली. घरांत येणाऱ्या प्रत्येक भाजीवालीची नक्कल करून, तस्से हेल काढून तो भाजी विकूं लागला. केव्हा केव्हां तो भाजी शिजवूनहि घालूं लागला आणि द्रौपदीच्या थाळींतल्या एका पानानं जशी अनेकांची भूक भागली तशी अवीनं वाढलेली भाजी खाऊन आमच्या चाळींतलीं सगळीं माणसं तृप्तीची ढेकर देऊं लागलीं. पण थंड शेगडीवरून पेटलेल्या शेगडीवर भाजीचं भांडं ठेवण्याइतकी जेव्हां त्याची प्रगति झाली तेव्हां त्याचा तो नाद नाहींसा करता करतां आमच्या नाकीं नऊ आलें.

टांग्याला तो प्रथम 'का' कां म्हणत असे हें मला अजून कळत नाहीं. रस्त्यांत 'का' दिसला रे दिसला कीं, 'आपण का बसून जाऊं' हें गाणं सुरू व्हायचं. त्यावर उतारा म्हणून मी एकदां म्हटलं, 'अवी, हा 'का' आपला नाहीं.' झालं. तेवढा शब्द त्याला पुरला. त्यानंतर केव्हांहि रस्त्यांत टांगा दिसला कीं, यानं 'हा का आप्पा नाहीं?' असं विचारायचं आणि त्या प्रत्येक प्रश्नाचं उत्तर सक्तीनं वसूल करून घ्यायचं.

हल्लीं मात्र तो परस्पर टांगेवाले व बस कंडक्टर्स यांच्याशीं दोस्ती करतो आणि सर्व प्रश्नांचा भडिमार त्यांच्यावरच करतो. टांग्यांतून कुठेंहि

जाताना याची जागा पुढें टांगेवाल्याजवळ असते. टांग्यांतून किंवा बस-मधून उतरतांच ' अच्छा बस, बाय् बाय् बस ! ' असा निरोप द्यायला तो विसरत नाहीं आणि मग घरीं येताच माझ्या शेजारी कोचावर बसून चाबूक फटकारीत ' जल्दी चलो रे घोडे ' किंवा ' चली मोटार पम् पम् ' असे तालासुरावर म्हणत तो मला त्याच्या माहितीच्या सर्व जगांतून हिंडवून आणतो.

विलक्षण पाठांतर शक्तीमुळं कुठेंहि एखाद्या गाण्याचा चरण ऐकला कीं, तो येईल तसा तो पाठ करतो. एक दिवस अंथरुणावर पडल्या पडल्या तो कांहीं तरी ठराविक कडवं गुणगुणत होता. मी विचारलं, ' अवी, काय रे म्हणतो आहेस ? ' त्यानं लगेच म्हणून दाखवलं,

' अखिया मिलाके जिया भर माके, चले नाहि जाना—ओ ऽऽ
चले नहि जाना ! '

मी विचारलं, ' अविनाश, हें गाणं तुला कुणी शिकवलं ? ' तेव्हां मला कळलं, कीं शेजारच्या एका गड्याचं ऐकून त्यानं तें पाठ केलं होतं. या गाण्याचे बरोबर शब्द काय आहेत तें मला माहीत नाहीं आणि फार उशीरा सुचविलेली कुठलीहि दुरुस्ती अवि पत्करायला तयार नसतो. त्याच्या या धारणाशक्तीचा सदुपयोग करून घ्यावा म्हणून मराठी आणि संस्कृत सुभाषितें शिकवावयास सुरुवात केली आणि आज साडेतीन वर्षांच्या वयाला ' शुभं करोति ' ' शांताकारं ' इथपासून ' या कुंदेंदु तुषार-हारधवला ' इथपर्यंत पंधरावीस श्लोक त्यानं पाठ केले आहेत. या पाठांतराचा उपयोग श्लोकार्ध उलटे सुलटे करून किंवा त्यांत कांहीं तरी बदल करून म्हणण्यांत तो करतो. ' येरे येरे पावसा ' ऐवजीं ' येरे येरे टांगा ' असंहि गाणं तो रचतो आणि कुठेंतरी अडला किंवा कांहीं आठवेनासं झालं म्हणजे ' पुढें काय ? ' म्हणून तो मला विचारतो.

एकदां आम्ही एका गायनसमाजावरून येत होतों. तिथं कांहीं तरी गाण्याचा सूर त्यानं ऐकला. आणि मला थांबवून त्यानं एकदम विचारलं, 'नाना, पुढं काय ? ' हा येवढा तात्विक प्रश्न एकदम ऐकून मी भांबावलोंच. मी विचारलं, ' अवी, कशाच्या पुढं ? ' माझा प्रश्न त्यालाहि नीटसा कळला नाहीं. पण कांहीं वेळानं तो म्हणाला, ' ये चांद छुपना जाना.' मग

माझ्या लक्षांत आलं कीं, कुठला तरी सूर ऐकून त्याला तें गाणं आठवलं होतं. पण सबंध म्हणतां येत नव्हतं.

त्याचा कुठल्याहि खेळाचा नाद चार दिवसांहून अधिक टिकत नाहीं. पण त्यामुळंच त्याचे 'पुढें काय ?' आणि 'म्हणजे काय ?' हे तात्विक प्रश्न कधींच संपत नाहींत. टेबलावरच्या विजेच्या दिव्यावर तो मेणबत्ती पेटवूं लागतो आणि ती पेटली नाहीं म्हणजे ती कां पेटत नाहीं हें त्यास समजून सांगतांना आपली मति कुंठित होते. कारण मग काडीनें सिगरेट कशी पेटते, हा त्याचा प्रश्न असतोच. लहानपणीं त्याच्या दुखण्यांनीं त्यानं मला त्रस्त केलं आणि आज या प्रश्नांनीं तो मला जर्जर करीत आहे. पण त्याच्या सहवासांतच मला या कलहांतून—या संघर्षांतूनच जीवन कसं विकसित होत असतं तें अनुभवास आलं. महिन्याकांठीं शैंपन्नास रुपये मिळवणं हाच जर जीवनकलह असेल तर ज्यांच्याजवळ ते आधींच आहेत त्यांच्या जीवनांत कलहच नाहीं असं मानावं लागेल. त्याहून अधिक मिळविणं हाच जीवन-कलह असेल तर त्याहूनहि अधिक ज्यांच्याजवळ आहे त्यांच्या जीवनांत कलह नाहीं असं म्हणावं लागेल पण ही धांवपळ म्हणजे जीवनकलह खासच नव्हे. प्राप्त परिस्थितींत जीवनाचा विकास हाच खरा जीवनकलह ! धांवपळ म्हणजेच जीवनकलह मानणारे अनेकदां, 'जगांत असलेलें' जीवनच विसरतात. निदान माझ्या स्वतःवरून मला सांगतां येईल कीं, भूतकाळांत काय लाभलं नाहीं याची खंत करतांना आणि भविष्यकाल कसा जाईल याची विवंचना करतांना वर्तमानकाळाचा अनेकदां मला विसर पडतो. अविनाशच्या सहवासांत वर्तमानकाळहि आनंदाचा आहे याची मला जाणीव होते. त्याच्याकरतां ज्या खस्ता खाल्ल्या आणि कष्ट सोसले ते सोसतांना आपल्याकरतां आपल्या आईवडिलांनीं सोसलेल्या कष्टांची जाणीव होते.

आचारवडाच्या आसऱ्याला आपण विसावतों तेव्हां या विस्तारवेलाची जपणूक किती कृतज्ञतेनं, जिव्हाळ्यानं आणि दक्षतेनं केली पाहिजे हें मनांत येऊन थोडी काळजी वाटली तरी त्याच्या संगोपनांत केवढा आनंद सामावलेला आहे हें अनुभवानंच कळलेलं असल्यामुळें ती चिंता कुठल्या-कुठें नाहींशी होऊन मन उल्हासानंभरून येतं.